# अकबराचें वेदसाधन.

लेखक--

विठ्ठल कृष्ण नेरूरकर, बी. ए.



मुद्रक व प्रकाशक

रा. रा. शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस,
१०२६ सदाशिव पेठ, पुणें.



सन १९३०.

किंमत १ रुपया.

# असें पहा—

कीं ' **अकबराचें वेदसाधन** ' ही कादंबरी ऐतिहासिक कादंबऱ्यांत गणली जाणारी आहे. तेव्हां प्रस्तुत कथानकास ऐतिहासिक आधार घेऊनच ती लिहिली आहे हें निराळें सांगावयास नकोच. दे. भ. तात्यासाहेब केळकरांसारख्यांचेंही लक्ष ही कादंबरी ' **चित्रमयजगत्** 'मधून क्रमशः प्रसिद्ध होतांना वेधलें होतें. अनेक रसिक व विद्वान् वाचकांनीं ही कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत असतां वाचून मला उत्तेजित केलें आहे. आज ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध होऊन वाचकांच्या भेटीस येत आहे.

अकबराच्या चरित्राची फारशी बखरींमधून माहिती घेऊन ऐतिहासिक सत्यास धरून अकबराची भूमिका रंगविली आहे. आजच्या परिस्थितींत हिंदीलोकांमध्यें सर्वतोपरि ऐक्य उत्पन्न होणें आवश्यक असल्यामुळें हिंदुमुसलमानांचेंच नव्हे, तर सर्व धर्मांचें ऐक्य करणाऱ्या अकबरबादशहाचे प्रयत्न कथानकरूपानें जनतेसमोर ठेवणें इष्ट वाटलें, म्हणून या कथानकाची जुळणी केली. वाचकांस ती आवडेल अशी आशा आहे.

या कथानकांतील किरकोळ दोन चार व्यक्तीच काल्पनिक असतील. बाकी साऱ्याच ऐतिहासिक आहेत; व कथानकाचे बरेचसे धागेदोरे ऐतिहासिक सत्याशीं संलग्न असे आहेत. ही कादंबरी चित्रशाळेचे व चित्रमयजगत्चे मालक श्री. जोशी यांनीं हौसेनें प्रकाशित केल्यामुळें मी त्यांचा फार आभारी आहें.

रसिकांचा नम्र,

सावंतवाडी,
कार्तिक शु. प्रतिपदा
शके १८५२.

**विठ्ठल कृष्ण नेरूरकर.**

# अकबराचें वेदसाधन.

[ लेखकः—श्री. वि. कृ. नेरूरकर, बी. ए. ]

## प्रकरण १ लें.

### जगांतील श्रेष्ठ धर्म

" हिंदुधर्म हा जगांतील एक अत्यंत उज्ज्वल, उदात्त, उदार व म्हणूनच श्रेष्ठ धर्म आहे. "

सभागृहांतून मौलवी आणि पंडित भराभर उठून गेल्यावर इतर सभ्यगृहस्थही निघून गेले होते. सम्राट अकबर तर मधाशींच उठून गेला होता. मधून मधून धर्मतत्त्वविवादांच्या ज्या सभा भरविण्यांत येत असत, त्या सभांच्या गेल्या खेपांच्या दोन तीन बैठकांत असाच निकाल, सर्वमान्य नसला तरी निरुत्तर करणारा, झाला होता. सर्व धर्मांचे प्रख्यात प्रतिनिधी व ज्ञाते असे या बैठकीस हजर रहात असत. कोणतेंहि एकादें तत्त्व घेऊन त्याच्यावर वादविवाद करण्याचा प्रघात असे व कोणीहि आपली बाजू पुढें मांडून संशयनिवृत्ति करून घ्यावी, अशी बादशहाची मोकळीक असे. त्यामुळें या सभेच्या कार्यक्रमास मनमोकळेपणाचा पाठिंबा मिळून खरीखुरी तत्त्वचर्चा होत असे. आजच्या बैठकींतहि असाच खडाजंगी वादविवाद होऊन हिंदुधर्मीय पंडितांनीं आपलें म्हणणें अन्य धर्मीय पंडितांना कबूल करावयास लावलें होतें, व शिरोभागीं दिलेलें वचन हें आज सम्राट अकबरशहाच्या धर्मसभेंत सर्वमान्य झालें होतें. हिंदु पंडितांचें वाक्चातुर्य मुद्देसूद व विवादपद्धति तर्कशुद्ध आणि बिनतोड असल्यामुळें जरी तें तत्त्व अन्य धर्मीय प्रतिनिधींना कबूल करणें-इच्छेविरुद्धहि कबूल करणें—भाग पडलें, तरी तेवढयानें वितंडवाद्यांचें थोडेंच समाधान होणार होतें ! अन्य धर्मीयांना ही गोष्ट लागल्याशिवाय राहिली नाहीं. या बाबतींत हिंदु पंडितांना नामोहरम करण्याची कांहीं

युक्ति सांपडते कीं काय, याचा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला होता. पण खुद्द अकबरशहाची मनःस्थिति कशी होती ? खुद्द बादशहाच्या मनांत कोणते विचार येत होते बरें ?

सर्व इतिहासज्ञांना विदितच आहे कीं अकबर बादशहा धर्मवेडा नव्हता; उलट त्याला सर्व धर्मतत्त्वांचा अभ्यास करण्याची अत्यंत आवड होती. तो तत्त्व-जिज्ञासू असला तरी, आधीं राजकारण आणि मग तत्त्वज्ञान असें मानणारा जिज्ञासू होता. धर्मतत्त्वें अधिक उदात्त कोणत्या धर्मांत, या प्रश्नाचा उलगडा झाल्यानंतर आपला स्वतःचा एक निराळाच धर्म प्रस्थापित करण्याचा मार्ग रेखाटण्यास त्याला सोपें जाणार होतें ! आणि नवीन धर्म तरी कशासाठीं ? कशासाठीं बरें एवढी तत्त्वचिंतनाची हौस या मुसलमान बादशहाला ? काय तो जगांतील प्रख्यात धर्म-प्रणेत्यांपैकीं एक होता ? काय तो जनक राजाप्रमाणें एक पाय मऊ गिरदीवर आणि एक पाय अग्नींत धरून बसणारा, व अशा प्रकारें सुखदुःखाची समता स्वतःच्या आत्म्यास व सर्व जगतास पटविणारा राजर्षि होता ? काय तो स्वप्नांतल्या दानास देखील प्रमाण मानून साम्राज्यवैभवावर तिळांजुळी देऊन डोंबाच्या घरीं स्वतः राबणारा व किंकरवृत्तीचे हाल आपल्या राणीस व युवराजासही भोगावयास लावणारा हरिश्चंद्र होता ? काय तो अक्षक्रीडेंतल्या ठरावांस वज्रलेप; ब्रह्मलिखित समजून केवळ शब्दाच्या सत्यतेसाठीं बारा वर्षें वनवास बंधुस्त्रीजनांसह भोगणारा युधिष्ठिर होता, कीं बापाच्या वचनासाठीं दंडकारण्यांत चौदा वर्षें सीतालक्ष्मणांसह वनवास भोगणारा श्रीरामचंद्राचा अवतार होता ? नाहीं. तो यांपैकीं कोणीहि नव्हता. पण सत्याची चाड बाळगणारा होता. कारणाशिवाय केवळ चढेलपणानें दुसऱ्याच्या धर्मभावना दुखविणारा नव्हता. राजकारणांत दंडनीतीपेक्षां भेदनीतीचा अवलंब करणें त्यास अधिक आवडे. निग्रहापेक्षां अनुग्रहानें कार्यभाग साधणें त्याला अधिक पसंत पडे. तो सर्वांना प्रेमवश करून घेण्यांत पटाईत होता यांत मुळींच शंका नाहीं.

हिंदुधर्माच्या तत्त्वांनीं त्याची मनोभूमिका काबीज करून टाकली होती. हिंदुधर्मतत्त्वांचे ग्रंथ मिळविण्याची त्याची धडपड सुरू होती, पण ते मिळाले तरी त्यांचें तत्त्व आणि स्पष्टीकरण त्याला कोण करणार ? खरोखरच त्याच्यापुढें हा मोठा प्रश्न होता ! पण एवढ्या मोठ्या सर्वशक्तिमान् सम्राटाला ही गोष्ट इतकी अशक्य कां वाटावी ? आज सम्राटाच्या मनांत सभेंतून उठून गेल्यानंतरही हेच विचार एकसारखे घोळत होते.

धर्म-विवेचनाचें सभामंदीर सोडून अकबरशहा खास राजमहालांत गेला. झोंपावयास जाण्याच्या पूर्वी आपल्या वाचनमंदिरांत बसून एखाद्या ग्रंथाचें वाचन केल्याशिवाय तो राहत नसे. बादशहाला यावेळीं ग्रंथ वाचून दाखविणारा फारसी पंडित बरोबर होता. शिवाय शेक मुबारिक व आणखीही एक दोन गृहस्थ हजर होते.

आज गुरुवारचा दिवस. सरासरी दीड प्रहर रात्र उलटून गेली होती. बादशहाचें वाचनाकडे लक्ष लागेना. त्याच्या मनांत सभामंदिरांतून बाहेर पडल्यावर जे शब्द कानांत पडले, ते उच्चारणाऱ्या व्यक्तीसंबंधीं विचार आले होते. त्यांत एका गोष्टीनें आज त्याचें लक्ष वेधून घेतलें होतें. हिंदुधर्मांतील उच्च तत्त्वज्ञानाचें मर्म ज्या ज्या ग्रंथांत असेल त्या त्या ग्रंथांचें भाषांतर फारसींत करून घेण्याची त्याची महत्त्वाकांक्षा आज कितीतरी दिवसांची होती. पण ती पूर्ण होण्याचा कांहीं रंग

दिसेना. दहा घटका रात्र झाल्याची इषारत पहारेकऱ्यांनीं दिलेली शहाच्या कानांत पडली. त्याबरोबर वाचन बंद करावयास त्यानें खूण केली. पंडितानें ग्रंथ गुंडाळून ठेवला. बादशहाच्या मनांत बरोबरच्या मंडळीशीं कांहीं बोलावयाचें होतें म्हणून त्यांस बोलावलें होतें; पण शेक मुबारिकाशिवाय बाकी सर्वांस त्यानें जावयास रजा दिली. या गोष्टीचें त्या सर्वांना नवल वाटलें. ते सगळे आपापल्या मकाणाला निघून गेले.

ते गेल्यावर बादशहांची स्वारी महालाच्या समोरच्या बगीच्यांतील मुख्य हौदापाशीं गेली. हा हौद फारच विस्तीर्ण व सुशोभित होता. मध्यभागीं कारंजें थुईथुई उडत होतें. सभोंवार फुलझाडांच्या कुंड्यांतील विकसित झालेल्या पुष्पांनीं वातावरणांत सुवास उधळून दिला होता. चांदणें स्वच्छ पडलें होतें. त्यामुळें तर त्या उपवनांतील पुष्करिणीस फारच शोभा आली होती. ती वेळ आणि तें स्थळ फारच मनोहर आणि उल्हासकारक होतें. पुष्करिणीचा मुख्य कांठ उच व रुंद असला तरी त्याला लागून एकाहून कमी उंचीच्या अशा उतरत्या प्रमाणांत आठ दहा पायऱ्या तलावाच्या घाटाप्रमाणें जमिनपर्यंत केलेल्या होत्या. या संगमरवरी दगडाच्या बांधणींत शिल्पकलेचें काम केलेलें खरोखरीच प्रेक्षणीय होतें. कारंज्याच्या सभोंवारच्या पाण्यांत पुष्करिणीमध्यें जागोजाग संगमरवरी बनविलेले हंस या चांदण्यांत खरोखरीच्या हंसाहूनहि विशेष गमतीचे दिसत होते. आणि या सर्व देखाव्यानें कोणाचेंही मन प्रसन्न झाल्याशिवाय राहिलें नसतें.

पुष्करिणीच्या मुख्य काठांवर समोरासमोर अशीं चार आसनें संगमरवरी दगडाचींच खोदलेलीं होतीं. हें नक्षीकाम अतिशय सुबक आणि कुशलतेचें होतें. हीं आसनें खुद्द बादशहाकरितांच बनविण्यांत आलीं होतीं. उपवनशोभा पहाण्याकरितां रात्रीच्या वेळीं केव्हां केव्हां आकाशाची सजावट पहात बसण्याची बादशहाची लहर लागत असे. आज बादशहांना शेक मुबारिकाशीं कांहींतरी गुजगोष्टी बोलावयाच्या होत्या, यांत शंकाच नाहीं. बादशहा पुष्करिणीवरील एका आसनावर बसला आणि शेकसाहेब तसेच जवळ उभे राहिले. बादशहा बराच विमनस्क स्थितींत असावा असें शेकसाहेबांसही वाटलें. आपल्याला बादशहा आज काय विचारणार आहेत याची त्याला नीटसी कल्पनाच होईना.

बादशहानें प्रथम आग्र्याच्या पाठशाळेची आस्थापूर्वक चौकशी केली. त्या पाठशाळेंतील विद्यार्थ्यांची माहितीही त्यानें विचारावयास कमी केलें नाहीं. आग्र्याच्या पाठशाळेची हकीगत इतकी खोदखोदून बादशहा कां विचारतात याचा बोध शेकसाहेबांस होत नव्हता. पाठशाळेंत सर्वांत हुषार मुलगा कोण आहे? असा जेव्हां बादशहानें प्रश्न विचारला, तेव्हां तर शेकसाहेब अधिकच बुचकळयांत पडला. बराच वेळ तो बोलत नाहींसें पाहून अकबरानें विचारिलें.

" कां ? शेकसाहेब ! आपण उत्तर देत नाहींत तें ? "

या प्रश्नानें शेकसाहेब भानावर आले. तथापि तरीही त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. यावर अकबरास अधिकच नवल वाटलें.

" उत्तर न देण्यासारखें यांत अवघड काय वाटलें. आम्हाला समजत नाहीं " भुवई वक्र करून अकबरशहा म्हणाला.

" उत्तर काय द्यावें हेंच समजेना, खाविंद ! "

" पाठशाळेंत सर्वांत हुषार मुलगा कोण ? एवढ्या साध्या आणि सरळ प्रश्नाचें उत्तर काय द्यावें हें आपणांस समजत नाहीं म्हणतां ? मोठेंच अजब आहे, नाहीं कां ? "

" त्याला दोन कारणें आहेत, हुजूर. एक गोष्ट अशी कीं पाठशाळेंत सर्वांत हुषार अशीं दोन मुलें आहेत. पण,—"

" कां थांबतां कां, मधेंच असें ? बोला ना ! "

" पण ते दोघेही मुलगे माझेच आहेत. "

" मग त्यांत गुन्हा काय झाला बोलायला ? बरं आणि दुसरं काय कारण ? "

" दुसरी गोष्ट अशी कीं त्या दोघांतही अधिक हुषार कोण याचा मी मनाशींच विचार करीत होतों. "

" बरं मग काय ठरलं शेवटीं ? "

" त्यांतला अधिक हुषार कोण तो ठरला.! "

" आज आपल्याबरोबर आला आहे दिल्लींत तोच ना ? "

" आपल्याला कसं कळलं हें खाविंद ? शेक साहेबानें विस्मित होऊन विचारलें.

" तें कळेल आपणाला. पण त्याचं नांव काय बरं ? "

" त्याचं नांव फैझी. मी माझ्याच मुलांची हुषारी हुजूरसमोर स्वतःच्याच तोंडानें कशी सांगावी याचा मला विचार पडला. माझा फझल देखील कमी हुषार आहे असं नाहीं. पण हा फैझी अगदीं एकपाठी आणि विलक्षण स्मरणशक्तीचा पोरगा आहे. अल्लानें त्याला आयुष्य भरपूर दिलं तर तो जगांत नांव काढल्याशिवाय राहणार नाहीं, असा विश्वास वाटतो."

" बरं शेक ! आग्र्यांत संस्कृत पाठशाळा आहे कीं नाहीं ?"

" आहे एक लहानशी पण ती एका देवालयांत आहे. "

" त्या ठिकाणीं तुमचा फैझी कधीं जात येत असतो काय ? "

हा प्रश्न ऐकून शेक मुबारिकला धास्ती वाटूं लागली. आपल्याविरुद्ध कोणीं तक्रार तर केली नसेल ना बादशहापाशीं, अशी भीति त्याला उत्पन्न झाली. कारण फैझीचा स्वभाव जरासा हूड असून तो ब्राह्मणवस्तीच्या भागांत व सकाळसंध्याकाळ यमुनेच्या घाटावर जातयेत असे. त्यावेळीं ब्राह्मणकुमार घाटावर संध्येला बसत असत. आणि तो भाग हिंदूंचा पवित्र असल्याकारणानें त्या ठिकाणीं आपल्या हिंदू प्रजेला आपल्या इस्लामी प्रजेनें मुद्दाम कोणीही त्रास देऊं नये, अशी बादशहाची ताकीद असे. एकदोन वेळां फैझी पकडला गेला होता, पण त्याला बजावून समजून ब्राह्मणांनीं सोडून दिलें होतें. फैझी कधीं कधीं देवालयांतील पाठशाळेभोंवतींही फेरी घालीत असे व तेथें चाललेलें शिक्षण तो कान लावून ऐकत राही. आणि घरीं येऊन पुनः एकांतांत बसे. एकांतांत तो आपल्या बापाच्या शिक्षणांतलि तत्त्वें व त्या देवालयांतलि शिक्षकानें प्रतिपादिलेली तत्त्वें यांची सांगड घाली. त्या गोष्टी मग भाषाविषयक, गणिताविषयक अथवा तत्वज्ञानाविषयक असोत कीं, धर्मविषयक असोत. तो त्यांचा आपल्या मनाशीं विचार करीत बसे; आणि आलेल्या शंका तो आपल्या बापाला विचारी. त्याच्या शंका इतक्या गहन असत कीं, त्या सर्वांचींच उत्तरें शेक मुबारिक यांस समाधानकारक देतां येत नसत. पण आपल्या मुलाच्या बुद्धीचें त्यांना

खरोखरच मोठें कौतुक वाटत असे. त्याच्या या देवालयाभोंवतीं फिरण्यानें हिंदू लोकांचा व विशेषतः कर्मठ ब्राह्मणांचा फार गैरसमज होत असे. त्यामुळें खुद्द शेक साहेबांकडे फैझीविरुद्ध एकदोनदां तक्रारीही आल्या होत्या. त्या सर्व गोष्टींची आतां शेक साहेबांस आठवण होऊन ते घाबरून गेले. अकबर बादशहाचा धाक सर्वांना असे त्याचे गुप्त हेर सर्वत्र पसरलेले असत. राज्यांत घडणारी कोणतीही महत्वाची गोष्ट त्याच्या कानापर्यंत गेल्याशिवाय सहसा राहत नसे. शेकसाहेब भीतभीतच म्हणाले—

" खाविंद ! माफी असावी. पोरग्याचा स्वभाव हूड आहे, हें मी मघाशींच म्हणालों. तो केव्हां केव्हां संस्कृत पाठशाळेच्या देवालयाच्या बाजूस फिरतो खरा पण, त्यांच्या देवालयांत त्यानें कधींच प्रवेश केलेला नाहीं. "

या उत्तरावरून शेक मुबारिकची मनःस्थिति अकबरानें ओळखली. हिंदूंच्या वस्तींत इतर कांहीं उपद्व्यापी उनाड मुसलमान गुंडाप्रमाणें ब्राह्मणांची खोडी आपल्या मुलानें काढलेली नाहीं, हें सांगण्याचा शेकचा मुख्य भावार्थ शहानें ओळखला. आपल्या प्रश्नाचा शेकवर भलताच व अनपेक्षित परिणाम झालेला पाहून अकबरास गालांतल्या गालांत हंसूं कोसळत होतें. पण चांदण्यांत तें वृद्ध मुबारिकास दिसलें नाहीं. नाहीं तर त्याची भीति पार उडाली असती.

आपल्या राज्यांतील सर्व धर्मांच्या प्रजेनें एकमेकांची खोडीकुरापत काढल्याशिवाय गुण्यागोविंदानें रहावें अशीं अकबरशहाची इच्छा होती व तदनुरूप त्याची शासनपद्धतीही होती.

" पण तुमचा फैझी त्या बाजूस फिरतो इतकं खरं तर ! अं ! आणखी कुठं कुठं फिरतो. "

झालें ! या प्रश्नानें तर शेक मुबारिकची घाबरगुंडीच उडाली. त्याचे पाय लटलटूं लागले. पण ती स्थिति त्यानें बाहेर दिसूं दिलीं नाहीं. तो प्रसंगावधानी पण सत्यभाषणी होता. तसेंच त्याचें आचरण देखील कित्ता घेण्यासारखें होतें. म्हणूनच त्याच्यावर अकबर बादशहाचा फार विश्वास होता. याचसाठीं त्यानें त्याला आग्र्याच्या मुख्य पाठशाळेवर मुख्याध्यापक नेमलें होतें. अकबराला शिक्षणाचें महत्त्व समजत होतें. चांगल्या शिक्षणाशिवाय राज्याला बरे दिवस येत नाहींत ही त्याची ठाम समजूत होती. शिक्षकाच्या आचरणाचा परिणाम शिक्षितांवर झाल्याशिवाय राहत नाहीं, हें तो जाणून होता. विद्वत्तेला तो बहुमान देई, पण विद्वत्तेबरोबरच जर पापभीरुता आणि सदाचरण असलें तर त्या व्यक्तीस तो पूज्य मानीत असे. शेक मुबारिक अकबराच्या या कसोटीस पूर्ण उतरला होता. पण शेक मुबारिकची उगीच्या उगीच उडालेली गाळण पाहून अकबराला मौज वाटली. थोडासा विनोद करण्याच्याच उद्देशानें त्यानें आणखी विचारलें:—

" सांगा, शेक ! तुमचा फैझी आणखी कोणातरी ब्राह्मणाच्या घराच्या आसपास फिरतो कीं नाहीं ? "

शेक मुबारिकला आजचा प्रसंग कोठवर जाणार याचें अनुमान करतां येईना. अजूनपर्यंत त्यानें कसा तरी धीर धरला होता पण आतां त्याचें अवसान गळूं लागलें. आपल्या आवडत्या फैझीवर कोणीं तरी आळ घेतला आहे अशी त्याची

आतां पक्की खातरी होऊन चुकली. त्याच्या तोंडांतून आतां नीटपणें शब्द निघणें शक्य नव्हतें. तथापि आपलें सर्व धैर्य एकवटून तो बोलूं लागला.

" जहांपन्हाह् ! माझा फैझी केव्हां केव्हां बाहेर जातो व तो कोणातरी ब्राह्मणाचें संध्याकर्म अथवा मंत्रपाठ चालला असतां अडून ऐकतो, असं मला त्याच्याचकडून समजलं आहे. मी तो ब्राह्मण कोण व तें स्थान कोणतें याबद्दल फारशी चौकशी केली नाहीं. मात्र तसें न करण्याबद्दल मी त्याला बजावून ठेविलें होतें. "

" कां संस्कृत मंत्र कानानें ऐकणं अथवा तोंडानं म्हणणं पाप आहे ? " शहानें उलट विचारलें.

" नाहीं–नाहीं. तसं नाहीं. " कांहीं तरी उत्तर दिलेंच पाहिजे अशा समजुतीनें शेख म्हणाला.

" मग फैझीला तुम्ही अशी तंबी कां दिलीत. "

शेख मुबारिक अधिक घुटमळूं लागला. बादशहाच्या एकंदर भाषणाचा रोख तरी काय आहे, याचा प्रकाश त्याच्या शून्य मस्तकांत मुळींच पडेना. तो अगदीं निरुत्तर झाला.

" पण, फैजी असा वारंवार तिकडे जाऊन संस्कृत मंत्रपाठ वगैरे ऐकतो तो कां बरं ? तो तुम्हांला त्याविषयीं काय सांगतो ? "

" तो छोकरा सारा बारा वर्षांचा, त्याचा त्यांत कांहीं वाईट हेतु मुळींच नाहीं. तो सांगणार तरी काय ? त्याला ते उच्चार, ते शब्द मोठे गमतीचे व रसाळ वाटतात. केवळ ते ऐकण्यांत त्याला एक प्रकारची मौज वाटते, म्हणूनच तो आवडीनें तिकडे केव्हां तरी जातो. "

" तो जे संस्कृत श्लोक पाठ म्हणतो त्यांतील तुमच्या लक्षांत कांहीं आहेत काय ? "

" नाहींत. "

" मुळींच नाहींत ? त्याच्या तोंडीं नेहमीं असणारा श्लोक अगर एखादें संस्कृत वाक्य तुम्ही सांगूं शकाल काय ? "

" मला कांहीं इतकेंसें आतां आठवत नाहीं. " असें म्हणून मुबारिक जरासा अडखळला. कारण तो एखादें श्लोकार्ध आठवीत होता. तें आठवतांच तो एकदम म्हणाला.

" होय ! आठवतें हुजूर. एक ओळ मला माझ्या फैझच्या तोंडची आठवत आहे. म्हणूं कां ? "

" हो हो ! "

" अपक्रामंतु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम्, हाच चरण तो केव्हां तरी म्हणतो. "

" बरोबर ! हाच तो चरण " अकबरबादशहा एकदम म्हणाला, मीं आज ऐकला तो चरण हाच. याचा अर्थ तुम्हाला समजतो काय ? "

" नाहीं, हजरत ! मला याचा अर्थ कळत नाहीं. मुलाच्या तोंडून बरेच वेळां ऐकल्यामुळें तो माझ्या लक्ष्यांत राहिला एवढेंच. "

या चरणाचा अर्थ कांहीं फारसा अवघड नाहीं " भूतपिशाच्च कोणी असतील ते सर्व दूर दिशाला पळून जावोत " एवढाच त्या चरणाचा भावार्थ आहे. परंतु

आश्चर्याची गोष्ट अशी कीं तो चरण म्हटला जात आहे, तोंच थेट पिशाच्चासारखी एक आकृति अंधुक चांदण्यांत एका मंडपाच्या जाळीआडून येत असल्याचें शेख मुबारिकास दिसून आलें ! तो जागच्या जागीं भयभीत झाला.

बादशहा कोणा तरी दुसऱ्या व्यक्तीशीं बोलत आहे, म्हणूनच कीं काय ती कृष्णवर्ण आकृति पुनः जाळीआड आणि नंतर लतामंडपाआड गुप्त झाली. चंद्राआड आलेला मेघ बाजूस झाला आणि पुनः स्वच्छ चांदणें चोंहोकडे पडलें.

" फैझीशिवाय आपल्याला दुसरा मुलगा आहे ना ? "

" होय, हजरत ! त्याचं नांव फाजल. "

" तोहि हुशार असेल नाहीं ? "

" असेल कां, आहेच; पण एकपाठीपणा आणि संस्कृत शब्द लक्षांत ठेवण्याची शक्ति फैझीइतकी त्याच्यांत नाहीं. "

" बरं आहे. आतां बरीच रात्र झाली. तुम्ही चला–तुमच्याशीं आम्हाला पुनः कांहीं गोष्टी बोलावयाच्या आहेत. पण आग्र्याला आल्यावरच त्या बोलूं. "

शेख मुबारिकानें मुजरा करून तेथून पाय काढला. त्याला मुक्कामाला पोचवायला शिपाई वाट पहात होताच. तो आपल्या बिऱ्हाडीं जात असतांना कसलासा आवाज त्याच्या कानीं आला, म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें तों, बादशहा बसल्या जागींच अद्याप असून ती पिशाचाप्रमाणें भासणारी काळी आकृति हळुहळु कारंज्याकडेच जात आहे असा त्याला भास झाला. पण ती आकृति पाहून त्याला पुन्हा एकवार भीति वाटली आणि तो आपलीं पावलें झपाझप उचलूं लागला.

शेख मुबारिकला ज्या भुताची इतकी भीति वाटली त्याची शहाला यत्किंचित्‌तही भीति वाटूं नये हें आश्चर्य नव्हे काय ? ती आकृति कारंजाजवळून अगदीं थेट बादशहाजवळ जाऊन उभी राहिली तरी अद्याप अकबर बादशहा हूं कीं चूं न करतां अथवा अगदीं आंगहि न हालवितां जागच्या जागीं स्वस्थ बसतो, याचा अर्थ काय ?

---

# प्रकरण दुसरें.

## " मुबारिकला खालीं पाडणार ! "

ती पिशाचासारखी दिसणारी काळी आकृति थेट अकबर बादशहासमोर गेली हें शेख मुबारिकनें पाहिलें होतेंच. तो यंत्राप्रमाणें चालला होता, पण त्याचें डोकें पाहिलेल्या व घडलेल्या प्रकाराच्या विचारांत सारखें भ्रमण करीत राहिलें होतें. होतां होतां तो आपल्या मकाणाकडे येऊन ठेपला. त्याच्या बिऱ्हाडांत त्याचे दोघे मुलगे फाझल व फैझी हे त्याचीच वाट पहात बसले होते. पण तें बिऱ्हाड त्याचें

नव्हतें. त्या घरांत तो पाहुणा म्हणून उतरला होता. शेख मुबारिक आग्र्याच्या पाठशाळेचा मुख्याध्यापक असल्यामुळें त्याला तेथेंच रहावें लागत असे. अकबरशहाच्या धर्मविवेचनाच्या सभा दर आठवड्यास बहुधा गुरुवारीं भरत असत. पण जेव्हां विशेष महत्त्वाच्या एखाद्या प्रश्नाची शहानिशा करावी लागे, तेव्हां आपल्या मुसलमानी धर्माच्या विद्वान् पंडितास तो दूरदूरहून देखील मुद्दाम बोलावणें पाठवून आणवीत असे.

दीने–इलाही या धर्माची स्थापना अकबरानें केली. पण त्याच्या मनांत या कल्पनेचें बीज फार पूर्वीपासून रुजून राहिलें होतें. आपल्यापूर्वीं भरतखंडांत जे मोठमोठे महान् कीर्तिमान् राजे होऊन गेले, त्यांच्या प्रमाणेंच किंबहुना त्यांच्याहून कांकणभर जास्त कीर्तिमान् आपण व्हावें, ही महत्त्वाकांक्षा अकबराच्या मनांत मूळ धरून बसली होती, त्या महत्त्वाकांक्षेनेंच त्याच्या हातून लोकोत्तर कृत्यें घडविलीं. हिंदी राष्ट्रांत आपणांस राज्य करावयाचें तर त्यांचें प्रेम संपादूनच तें केल्यास फायदेशीर होईल. हें धोरण त्यानें आरंभींच बांधून ठेविलें होतें. परंतु हातीं धरलेलें काम तडीस नेण्याची त्याची ईर्षा देखील अवर्णनीय होती. मनुष्य एकदा ईर्षेस चढल्यावर तो कारस्थानी असूनहि केव्हां केव्हां वाहवत असतो. अकबरानें सर्व धर्मांच्या मूळ ग्रंथांचें भाषांतर फारशींत करण्याचा निर्धारच केला होता. बायबलचें भाषांतर फारशी भाषेंत उतरण्याचा त्याचा प्रयत्न सुरूच होता व त्यांत त्याला यश येण्याची बरीच आशा वाटत होती. तथापि वेदांचीं भाषांतरें फारशींत कशीं होतात, ही विवंचना त्याला सारखी पडून राहिली होती. आपल्या पदरच्या मोठमोठ्या विद्वानांस त्यानें जहागिरींच्या व अन्य पारितोषिकांच्या लालुची दाखवून या कामास जोडलें होतें.

हिंदुस्थान पादाक्रांत करण्याचें कार्य अकबर अशा प्रकारें दोंहातीं करीत होता. लढाया मारून देश जिंकणें ही त्या कार्याची एक बाजू आणि हिंदूंच्या धर्मालाहि आत्मसात् करण्याची त्या कार्याची दुसरी बाजू होती. हिंदूंच्या धर्माचीं इतर पुस्तकें त्याला इतकीं महत्त्वाचीं वाटत नव्हतीं. वेद भाषांतरित होऊन आपल्यासमोर केव्हां येतील, हाच त्याला आतां सारखा निदिध्यास लागला होता. यासाठीं त्यानें प्रचंड खटाटोप चालविला होता. आपल्या पदरच्या कित्येक पंडितांस त्यानें दुरप्रयत्नानें संस्कृत शिकावयास लावलें होतें व शिवाय हिंदुधर्माचे ब्राह्मणांस वश करून घेण्याचें तर त्याचे विश्वप्रयत्न सुरू होते.

ज्यावेळीं राजमहालांतून शेख मुबारिक निघाला त्याच वेळीं शेख बदाउनी आपल्या वाड्यांतील एका खोलींत एका ब्राह्मणाशीं खलबत करीत बसला होता. शेख मुबारिक हा शेख बदाउनीचा पाहुणा होता. शेख मुबारिक जाडा विद्वान् होता, पण त्याच्यापाशीं कारस्थानीपणा नव्हता. तो आपला सिध्या मार्गानें जाणारा मनुष्य होता. शिवाय वांकडा मार्ग तर त्याला मुळींच पसंत पडत नसे. तथापि तो धीराचा खंबीर नव्हता. स्वभावानें भिडस्त असल्यामुळें प्रसंगीं आपल्या मताच्या विरुद्ध असलेली एखादी गोष्ट केवळ भिडेखातर नाइलाजानें करणें त्याला भाग पडे. हा त्याचा स्वभाव बादशहाला ठाऊक होता. म्हणून तो कारस्थानाची एखादी गोष्ट त्याच्याकडें एकदम उघड करीत नसे. पण बदाउनीचें अगदीं याच्या विरुद्ध होतें. तो फार धूर्त आणि धोरणी होता. शेख मुबारिकप्रमाणेंच तोहि विद्वान् होता पण शिवाय तो गुप्त कारस्थान करण्यांत प्रवीण होता. शिवाय त्याला मुसलमानी धर्माचा हट्टी दुराग्रही

अभिमान होता. अकबर मुसलमानी धर्माचा अभिमानी नव्हता असें कोणीहि म्हणत नाहीं. पण न्यायाधिशाची विवेकी दृष्टि अकबराची होती. कोणत्याही गोष्टींकडे सारासार दृष्टीनें पाहण्याची विवेचनशक्ति त्याच्या ठिकाणीं होती. निव्वळ दोषैकदृष्टीनें तो पहाणारा नव्हता. तथापि बदाउनी हा कट्टा मुसलमान असून अन्य धर्मतत्त्वांकडे केवळ दोषदृष्टीनें पहाणारा होता. यासाठींच अकबराला आपल्या धर्मसभांच्या कामांत भाग घेण्यासाठीं अनेक मुसलमानी पंडित नेमावे लागले होते. प्रत्येकाच्या आंगांतले गुणदोष तो ओळखून होता. ज्याच्या आंगांत जेवढा गुण असेल, तेवढ्याचा उपयोग करून घेण्यांत तो फार प्रवीण होता. बदाउनीचा फायदा आपल्याला कितपत होईल व शेक मुबारिकचा किती होईल, याचा अंदाज त्याला नव्हता असें नाहीं, पण बदाउनीला आपल्या योग्यतेची फाजील खात्री होती. शिवाय त्याला आपल्या अनेक प्रतिस्पर्ध्यांशीं टक्कर द्यावयाची होती. या प्रतिस्पर्ध्यांत कोणी त्याच्याहून एखाद्या गुणांत वरचढ होते, कोणी बरोबरीचे होते, व कोणी कमी प्रतीचे होते. या सर्व विद्वानांची एकमेकांत गुप्त चुरस होती.

बदाउनी, शेक मुबारिकशीं अत्यंत स्नेहबुद्धी व आदर दाखवीत असे. भोळ्या मुबारिकला त्याची मख्खी तितकिशी वळत नव्हती. नाहींतर दोन्ही मुलांना घेऊन तो असा बदाउनच्या घरीं वारंवार पाहुणचार घेत राहिला नसता. अकबरशहा आणि बदाउनी यांचें एकमत एकाच बाबतीपुरतें होत असे, आणि ती बाबत म्हणजे हिंदुधर्माचे प्रसिद्ध ग्रंथ भाषांतरित करून फारशींत उतरणें एवढीच होय. पण ही गोष्ट साधण्यांत प्रत्येकाची भावना निरनिराळी होती. अकबराला त्या धर्मांत काय आहे तें पाहून त्यांतील चांगल्या तेवढ्या गोष्टी आपल्या दीने-इलाहीकरतां घ्यावयाच्या होत्या. शेक-बदाउनीला याच्या उलट त्यांत वाईट व दोषास्पद कांहीं असल्यास तेवढेंच घेऊन तो धर्म वाईट आहे असा डांगोरा प्रसिद्धपणें पिटून हिंदूस त्या उपायानें मुसलमान बनवावयाचा जो कट सुरू होता, त्यांत सामील होऊन कांहींतरी प्रत्यक्ष कार्य घडवून आणावयाचें होतें. अकबराचा हेतु उदात्त होता तसा बदाउनीचा नव्हता, म्हणूनच अकबराचा दीने-इलाही आस्तित्वांत यावा, अशी त्याची मनापासूनची इच्छाच नव्हती.

आज रात्रौ मुबारिक बादशहाच्या भेटीस गेल्यावर तो तिथें बराच वेळ अडकून बसणार इतका अजमास बदाउनीस होता. फैझी आणि फाझल आतां आपल्या खोलींत पेंगू लागले होते. तथापि आपला बाप नेल्यानंतर कांहीं वेळानें एक ब्राह्मण वाड्यांत शिरतांना फैजीला अर्धवट दिसला, त्यामुळें साहाजिकपणें त्याची नेहमींची चिकित्साबुद्धि जागृत झाली. तो थोड्या वेळानें मागें परतला आणि फाझलला त्यानें ती हकीगत सांगितली. फाझल हा फैझीचा मोठा भाऊ असून तो सरासरी पंचवीस सव्वीस वर्षांचा होता. फैझीचें वय बारा तेरा वर्षांच्या मानानें होते. फाझलला झोंप येऊं लागली होती फाझल थोडक्याच वेळांत झोंपला. पण फैझीला झोंप येईना. तितक्यांत एक संस्कृत मंत्र व कांहीं संस्कृत वाक्यें त्याच्या कानीं पडलीं. त्याबरोबर तो आपल्या जागेवरून उठून हळूहळू कानोसा घेत ज्या ठिकाणीं तो ब्राह्मण आणि बदाउनी बोलत बसले होते तिथपर्यंत आला. ही खोली तिसऱ्या मजल्यावर होती. आणि या दोघांना दिलेली खोली दुसऱ्या मजल्यावर होती जिना चढून वर गेल्यावर ज्या खोलींत ते दोघे बोलत बसले होते, त्याच्या डावे बाजूस गच्ची असून तिच्यावरून एक नागमोडी वळणाचा दादर वरती गेला होता. ह्या दादरानें वर गेल्यावर आणखी एक गच्ची लागत असे व तिच्या-

वरून त्या चांदण्या रात्रीं सर्व दिल्ली शहराचा देखावा मोठा गमतीचा दिसत होता. त्याच्या खालची गच्ची देखील हवाशीर असून ती राजमहालाच्याच बाजूला होती. फैझी गच्चीवर थोडा वेळ शोभा पहात व हवा घेत त्या ठिकाणीं बसला. त्या वेळच्या निसर्गशोभेनें तो मोहून गेला होता. तो इकडच्या या बाजूवर यापूर्वी कधीं चढला नव्हता. त्याचा बाप क्वचितच त्याला बरोबर घेऊन येत असे. या ठिकाणीं बसल्यावर त्याला मोठी मौज वाटली. बसल्या ठिकाणीं तो तन्मय होऊन गेला. इतक्यांत त्याला आपल्या बापाचें नांव ऐकून आश्चर्य वाटलें. आंतील दोघां व्यक्तींचा संवाद अगदीं रंगांत आला होता.

" शेख मुबारिकपेक्षां मी जास्त रक्कम देईन."

" जास्त म्हणजे किती ?"

" किती तें करार नक्की करतांना सांगेन. पण पोथी आमच्या हातीं अगोदर आली पाहिजे."

" रक्कम समजल्याशिवाय पोथी कशी हातीं येईल ?"

" पण तुम्ही किती रक्कम पाहिजे तें अगोदर आपल्या मालकांकडून ठरवून या शेक मुबारिक आज इथें आले आहेत. माझ्याच घरीं ते पाहुणे आहेत. मी त्यांना प्रत्यक्ष विचारतों, त्यांनीं किती रक्कम देऊं केली आहे, तें मला समजणार नाहीं असें आपण मानूं नका. तें मला समजेलच.—"

" काय शेख मुबारिक इथं आले आहेत?" त्या ब्राह्मणानें आश्चर्यानें विचारलें.

" कधीं आले ते ?"

" ते कालच आले, आणि उद्यांच इथून पुनः आग्र्याला जातील. आतां ते बादशहांच्या मुलाखतीला गेले आहेत. इतक्यांत येतील बहुतकरून."

" अस्सं! आपणाला आरंभींच आणखी एक गोष्ट सांगून ठेवतों. या पोथीवर अकबरशहाच्या दरबारांतील आपल्यासारख्या आणखी अनेक विद्वानांची दृष्टि असून त्यांत एक फार सुप्रसिद्ध व विद्वान् पंडित आहे, हें विसरूं नका."

हें वाक्य ऐकून बदाउनीला थोडासा विचार पडला. पण तो बाहेर दाखवूं न देतां तो म्हणाला—

" असतील. पुष्कळ असतील. नाहीं कोण म्हणतो ? माल आहे तिथें गिऱ्हाईक असणारच. त्यांत काय ? पण त्याचें नांव काय ?"

" नांव मला ठाऊक नाहीं. आमच्या शास्त्रीबोवांना माहीत आहे. शास्त्रीबोवांना काल त्यांच्याकडून बोलावणें आलें होतें."

" बोलावणें आलें होतें ? कशासाठीं ? त्यांचें बोलणें तुमच्या मार्फतच झालें कीं स्वतः शास्त्रीबोवाच तिकडे गेले होते ?"

बदाउनीची उत्सुकता वाढविण्याकरितांच ब्राह्मणानें हा डाव टाकला होता. अपेक्षित परिणाम झालेला पाहून ब्राह्मणाला आनंद झाला.

" शास्त्रीबोवा स्वतःच त्यांच्याकडे गेले होते."

" स्वतःच गेले होते म्हणतां ? मग कामही तसंच महत्त्वाचं कांहीं तरी असलं पाहिजे."

" बहुधा याच पोथीबद्दल असावं असा माझा तर्क आहे."

" कशावरून म्हणतां हें तुम्ही ? "

" तसं माझं अनुमान आहे व तें चुकीचंही नाहीं. "

" बरं शास्त्रीबोवा दाक्षिणेंत फिरून कधीं जाणार आहेत ? "

" इतक्यांत जायचें नाहींतसें दिसतं. "

" मग मला त्यांना एकांतांत भेटायला मिळेल कां ? "

" शक्य नाहीं. "

" कां बरं ! "

" शास्त्रीबोवा माझ्याशिवाय कोणालाही परस्पर भेटणारच नाहींत कधीं. "

" पण आतांच तुम्ही म्हणालांत नां, कीं ते एकटेच त्या गृहस्थांना भेटायला गेले म्हणून ? "

" बरं मग ? ते कां गेले हें मला ठाऊक आहे. तसे तुम्हांलाही भेटतील, पण तो विषय माझ्या जाणीवेला मात्र आल्याशिवाय राहणार नाहीं. मला जर तुम्हाला टाळायचं असेल तर तें शक्य नाहीं. असा माझ्या बोलण्याचा भावार्थ. "

" पण एकांतांत म्हणजे तुम्हाला वगळून असं मी केव्हां म्हटलं ? "

वास्तविक पहातां बदाउनीचा हेतु तसाच होता. पण चुकलेली बाजू तो आतां सांवरून घेत होता.

" तर मग शास्त्रीबोवांची एकांतांत भेट आपणाला कशाकरितां घ्यावयाची आहे, तें आपण मलाच सांगा ना ? "

बदाउनीला मोठा पेंच पडला. हा ब्राह्मण आपल्या डोक्याबर बसूं पहात आहे, हें त्याला कळून चुकलें होतें. आपण ब्राह्मणाच्या आहारीं नकळत हळूहळू जात चाललों आहोंत, हेंही त्याच्या लक्षांत आलें. पण त्याला काम साधून घ्यावयाचें होतें. आणि तेव्हां धर्मबुडवे ब्राह्मण फारसे नव्हते म्हणून भेयांना फार किंमत असे. अकबरशहा-प्रमाणेंच बहुतेक मुसलमान विद्वानांचा निश्चय ठरला होता कीं हिंदूंचे धार्मिक व शास्त्रिय ग्रंथ येनकेन प्रकारेण फारशींत उतरून घ्यावयाचेच. सर्वांच्या पेक्षां आपण अधिक कामगिरी करून दाखवून बादशहाला खूष करणारा व त्याची मर्जी संपादन करणार, असा बदाउनीचा इरादा होता. याच इरायानें तो या ब्राह्मणाशीं खलबत करीत होता. ही वाटाघाट चाललीं असतां एक अगदीं निराळींच कल्पना बदाउनीच्या मनांत आली. ती कल्पनाच फार निराळ्या प्रकारची होती, ती साधेल कीं काय याचा कयास बांधण्यास त्याला या दक्षिणेंतून आलेल्या शास्त्रीबोवांची प्रत्यक्षच गांठ घेणें जरूर होतें. म्हणूनच त्यानें तो एकांतीं भेटण्याचा विषय मध्येंच उपस्थित केला होता. पण आतां बदाउनीला विचार पडला कीं ही नवी सुचलेली कल्पना अमलांत आणावयाची तिचा स्फोट या ब्राह्मणाशीं करणें योग्य होईल कीं काय ?

पण त्याला आतां अधिक वेळ घेतां येण्यासारखा नव्हता. कारण शेक मुबारिक येण्याची वेळ जवळ येत चालली होती. आपलें हें खलबत मुबारिकच्या लक्षांत येऊं नये, अशी तर त्याची फारच इच्छा होती; पण हा ब्राह्मण आजच आला त्याला तो तरी काय करणार ?

" बरं ! आतां तुम्ही जा. आपण हा सौदा ठरवूं. पण आपणामार्फत मला आपल्या शास्त्रीबोवांची गांठही घ्यावयाची आहे. त्या बाबतींत आपणाशीं मला

आणखी वरेंच बोलायचें आहे. आपण पुनः भेटायचा बेत ठरवूं. तुम्ही आमच्या माणसास ठराविक स्थळीं भेटत चला. आमचा निरोप गेल्याबरोबर भेटायला या."

"बरं आहे" असें म्हणून ब्राह्मण जावयास उठला. बाहेर बसलेल्या फैझीच्या कानीं हा बहुतेक संवाद पडला. पण आपल्या बापाच्या नांवाऐवजीं त्याला त्यांत कांहीं विशेष समजलें नाहीं. कारण त्याचें लक्ष दुसरीकडे लागलेलें होतें. दूर काळोखांत एक कोणीतरी व्यक्ति त्या बदाउनींच्या वाड्याच्या आसपास घिरट्या घालीत होती. आणि फैजीला पाहिल्यावर ती तेथून अदृश्य झाली होती. आणि दुसऱ्या दिशेस दोन माणसें बदाउनीच्याच वाड्याकडे हळुहळु चालत येत होतीं. त्यांच्याकडे तो टक लावून पाहात राहिला होता. इतक्यांत जिन्यांतून तो ब्राह्मण खालीं उतरत असल्याचा आवाज झाला. त्यावरून आपणही खालीं जावें असें त्यास वाटलें, तोंच त्या येणाऱ्या व्यक्ति दुसऱ्या कोणी नसून शेख मुबारिक व त्याच्या सोबतीस गेलेला त्याचा माणूस मात्र होता. त्यांना वाड्याकडे येतांना पाहून तो मागें वळणार तोंच त्या काळोखांत लपणाऱ्या व्यक्तीनें त्या ब्राह्मणास गांठून घेतलें व त्याच्याशीं बोलत ती जाऊं लागली हें त्यानें पाहिलें. जणूं काय ती व्यक्ति वाड्यांत गेलेल्या ब्राह्मणाची वाटच पहात होती. हा सगळा प्रकार पाहून त्याला मघांपासून आंत चाललेल्या संवादाचें आतां महत्त्व वाटूं लागलें व तो आपण ऐकला नाहीं ही मोठी चूक झाली असें मानून तो स्वतःस दोष देऊं लागला.

इतक्या अवधींत बदाउनीसाहेब ब्राह्मणाला खालीं पोंचवून आपल्या शय्यागृहांत चालले होते. त्यांना त्या वेळीं एक नवी कल्पना सुचली होती व ती केव्हां एकदांची अमलांत येते असें झालें होतें. निदान त्या दिशेनें प्रयत्न तरी लगेच सुरू व्हावा अशी त्यांची इच्छा होती. त्यांना आपल्या प्रतिस्पर्ध्यांवरही मात करावयाची होती. आपल्या खलबतखान्याच्या दालनांत पाऊल टाकल्यावर त्यानीं म्हटलें—

"शेख मुबारिकला खालीं पाडणार!"

हे शब्द बदाउनीनें उच्चारले त्याच वेळीं शेख मुबारिक देवडीपाशीं प्रवेशद्वारांत आले होते. आणि त्याच वेळीं फैझी त्यांना गाठण्यासाठीं जिना उतरून चालला होता. फैझीच्या कानांत हे शब्द पडले. तें ऐकून त्याला भीति व आश्चर्य वाटलें.

बदाउनीला त्या रात्रीं चैन नव्हतें. त्याच्या बातमीदारांनीं त्याला कांहीं तशाच बातम्या आणून पोंचविल्या होत्या. शेख मुबारिकच्या दोन्ही मुलांसंबंधीं बादशहांच्या मनांत चांगला ग्रह होत चालला आहे, हें त्याला ठाऊक होतें. फाझलला लवकरच दरबारांत एखादी असामी मिळणार, अशी गुणगुण त्याच्या कानीं आली होती. फाझल फार हुशार आहे, हें त्याला ठाऊक होतें.

शेख मुबारिक बदाउनीच्या वाड्यांत येत असता आपल्या पूर्वीं कोणी तरी ब्राह्मण बाहेर पडून गेल्यासारखा त्याला दिसला. पण त्याबद्दल त्याला विशेष कांहीं वाटलें नाहीं. त्याला वाटत होतें तें एवढेंच कीं तें पिशाच्च ज्या ठिकाणीं बादशहा बसला होता त्या कारंजावरील आसनाकडे कां आणि कसें गेलें?

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आग्र्यास जावयाचा त्याचा बेत ठरला होता. रात्रीं त्यानें बदाउनीस जागें केलें नाहीं. फैझीही बापाला काहींएक बोलला नाहीं. आग्र्यास जावयासाठीं बाहेर पडल्यावर आपण आपल्या बापास सर्व कांहीं सांगूं असें ठरवून तो

झोंपीं गेला. सकाळीं त्या सर्वांना उठावयास बराच उशीर झाला. दिवस बराच वर आला होता. आंथरुणांतून कोणी नुकते उठताहेत. तोंच दिल्ली शहरांत तोफांचा धडाका सुरू झालेला पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें व जो तो एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागला ! हें परचक्र कीं काय ?

---

# प्रकरण तिसरें.

## कर्णभेदक किंकाळी !

या तोफा कसल्या ? दिल्ली शहरांत काल रात्रौ मध्यरात्र उलटून जाईपर्यंत कसलीच गडबड नव्हती. आणि आज सकाळींच हा तोफांचा प्रचंड गडगडाट कसला झाला ! दिल्ली नगरींतील पौरजन अंथरुणांतून उठून मुखमार्जनादि विधी उरकताहेत तोंच तोफांची सरबत्ती होत असलेली पाहून अनेकांच्या मनांत अनेक विचार उत्पन्न होऊं लागले. ही कोणा शत्रूची स्वारी असेल काय ? असेंही कोणाला वाटूं लागलें. पण असें फारच थोड्यांस वाटत होतें. कारण अकबरशहाच्या खुद्द राजधानींत चालून येणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. अकबरशहाला तख्तनशीन होऊन आतांपर्यंत सतरा अठरा वर्षें मागें पडलीं होतीं. एवढ्या अवधींत अकबराचे सर्व शत्रू नामोहरम होऊन त्याचा धाक घेऊन बसले होते. एकामागून एक असे निरनिराळे प्रांत तो जिंकीत व आपल्या साम्राज्यांत सामील करीत चालला होता. नुकताच गुजराथ प्रांत त्याच्या अंमलाखालीं आला होता व आतां आज दोन तीन वर्षें बंगाल, बहार आणि ओरिसा हे प्रांत घशांत टाकण्याची अकबराची धडपड चालली होती. ही स्वारी खात्रीनें यशस्वी होणार अशी त्याची मनोदेवता त्यास सांगत होती. कारण त्या स्वारीवर त्यानें तशाच सरदाराची योजना केली होती. त्याला अद्याप पश्चिमेची पट्टी अमलाखालीं आणावयाची होती.

या पश्चिमेकडच्या पट्टींत काबूल, काश्मीर आणि सिंध हे तीन प्रांत प्रमुख असून शिवाय कंदाहारवर देखील त्याचा डोळा होताच. इतकें झालें कीं नर्मदेपर्यंत सर्वच्या सर्व हिंदुस्थान अकबराच्या छत्राखालीं येणार होतें. या कामगिरीची आतां

त्याला फारशी फिकीर वाटत नव्हती. म्हणूनच तो आतां आपलें थोडथोडें लक्ष राज्यकारभाराची व्यवस्था बसाविण्यांत व धर्मैक्यता स्थापन करण्यांत घालूं लागला होता. तथापि त्याचें मन स्वस्थ होतें असें मात्र नाहीं. कारण चितोड पडला पण उदेसिंग अद्याप उभाच होता. अकबराला उदेपुरावर सैन्य वारंवार पाठवावें लागत होतें. गेलेलें सैन्य कत्तल होऊन तरी जाइ अथवा उपासमार, थंडीवारा, उष्णतापाऊस, रोग–उपद्रव किंवा उदेसिंगाचे अचानक हल्ले ह्यांतून एकाद्याच्या भक्ष्यस्थानीं पडून जाई आणि उरलेसुरले लोक अपजयाची कर्मकथा सांगण्यापुरते मागें परतत असत. या प्रकाराचा अकबराला वीट आला होता. पण त्याचें कांहींच चालण्यासारखें नव्हतें.

अरवलीचा तो डोंगराळ मुलूख. ते मोठमोठे उंच कडे. हिंस्रश्वापदांनीं भरलेलीं तीं घनदाट निबिड अरण्यें. असल्या घोर कांताराला आपलें विश्वासस्थान मानून उदेसिंह मोंगल सेनेला टक्कर देत दिवस काढीत होता. तो मोंगलास शरणही गेला नाहीं, कीं तहाचें बोलणेंही लावलें नाहीं. आपला देश आणि आपला धर्म हीं त्याला क्षणभंगूर शरीराच्या सुखापेक्षां अधिक प्यार वाटत होतीं. शत्रूला शरण जाऊन अथवा सोयरीक जोडून स्वातंत्र्य गमावणें हें त्याला स्वप्नांतही पसंत वाटत नव्हतें. त्याच्यापुढें अकबराचा नाइलाज होत होता.

अकबराच्या पदरीं अनेक मुसलमान सरदार होते. आपला पूर्वीचा कारभारी बहरामखान याचें शासन करून त्याला नाखुष केल्यामुळें तो मक्केच्या यात्रेस निघून गेला. परंतु वाटेंत त्याचा सुरत येथें खून झाला अशी वदंता आली. बहरामखानच्या मुलाला ही बातमी खरी वाटेना. या खुनाच्या मुळाशीं खुद्द बादशहाचा हात तर नसेल ना! अशी शंका त्याच्या मनांत सारखी वावरत होती. त्याला जरी बादशहानें बहुमानाची सरदारी दिली होती, तरी आपल्या बापाच्या मृत्युचा उलगडा निःशंकपणें न झाल्यामुळें तो एकप्रकारें नाखूषच होता. अकबराच्या लक्षांत हा त्याचा संशयीपणा आल्याशिवाय कसा राहील?

अकबराला अशा अनेक टोंचण्या होत्या. जयपूर आणि जोधपूर येथील रजपूत राजांना जर्जर करून त्यांना टेकीस आणलें व त्यांच्याशीं शरीरसंबंध जोडून मातबर व शूर रजपुतांना त्यानें बहुमानाच्या सरदाऱ्या देऊन त्यांच्या बाहुबलाची जोड आपल्या राज्यास मिळविली. हा त्याचा दूरदर्शीपणा त्याला फार कल्याणावह झाला ही गोष्ट खरी. तथापि रजपुतांचा सिंह उदेसिंह हा अद्याप अजिंक्यच होता. तेव्हां आपल्याला वश असलेले रजपूत पुढें मागें स्वाभिमान जागृत होऊन बिथरतील आणि उदेसिंहाला सामील होतील काय? अशींहि रुखरुख त्याच्या मनाला लागलेली होती.

पूर्वदेश पादाक्रांत झाल्यावर पश्चिमभाग आणि नंतर दक्षिण हिंदुस्थान अशी क्रमवारी त्यानें आपल्या मनाशीं ठरविली होती. पूर्वभागावर राज्यकारभार पहाण्याकरितां तोडरमल्ल या मुत्सद्दी व पराक्रमी रजपूत सरदाराची योजना अकबरानें केली होती. तो रणवीर दोन अडीच वर्षे सारखा झुंजत होता. सरतेशेवटीं यशश्रीनें त्याला माळ घातली व त्या विजयोत्साहाच्या भरांत मजल दरमजल कूच करीत तो दिल्लीच्या रोखानें येत होता. त्याचा मुक्काम एकदोन टप्प्यांच्या अजमासें आल्यावर त्यानें ही आनंददायक बातमी दिल्लीस बादशहास कळविण्यासाठीं स्वार पुढें रवाना केले होते.

ते स्वार दिल्लीला काल रात्रीं येऊन पोंचावयाच्या पूर्वींच शहराचे दरवाजे बंद झाले. तथापि शहराभोंवतीं गुप्तवेषानें फिरणाऱ्या टेहळ्यांनीं ती बातमी आपल्या वरिष्ठास सांगितली.

काल रात्रीं शेख मुबारिक निघून गेला आणि ती पिशाच्चासारखी दिसणारी कृष्णाकृति अकबर बादशहाच्या समोर आली. त्या आकृतीनें बादशहाला कुर्निसात केला. आणि अदबीनें बाजूस उभी राहिली. शेख मुबारिक नजरेआड झाल्याचें स्पष्टपणें पाहिल्यावर बादशहानें विचारलें—

" काय आहे खबर ? "

" मी शहानूशहाला पूर्वीं दिलेली खबर खरी आहे. "

" कोणती ती ? "

" तोडरमल्ल बंगालच्या स्वारीवर विजयी होऊन आले आहेत. "

" खरं म्हणतां ? " बादशहानें आनंदून विचारलें.

" तोडरमल्ल परवां सकाळींच इथं येऊन पोंचतील. त्यांचे स्वार ही आनंदकारक बातमी घेऊन पुढें आले आहेत. पण त्यांना यावयास फार रात्र झाल्यामुळें त्यांना हुकुमाशिवाय आंत येतां आलें नाहीं ? "

" ठीक ! " अकबराच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा खुलूं लागली. " सकाळींच अगदीं लवकर त्यांना आंत घेण्याची व्यवस्था करा. पण दुसरीकडची काय हकीगत आहे. "

" दक्षिणेकडून आलेले शास्त्रीबुवा फार कारस्थानी आहेत, तसेच ते मोठें वाक्पांडित्य करणारे आणि चतुर आहेत. पण फार धनलोभी आहेत. या बाबतींत काम साधावयाचें असलें तर तें द्रव्यप्रयोगानेंच साधेल असें मला वाटतें. "

" कशावरून म्हणतां हें ? "

" संस्कृत ग्रंथ ते मुसलमानांना विकत द्यावयास तयार आहेत. पण प्रत्येक ग्रंथाची जास्तींत जास्त किंमत उकळावयाचा त्यांचा डाव दिसतो. यासाठीं दरबारच्या अनेक विद्वान पंडितांशीं त्यांच्या गुप्त मुलाखती, करार, वादविवाद वगैरे होत असतात. "

" असं ? त्यांची आमच्या दरबारच्या पंडितांपैकीं कोणीः मुलाखत घेतल्याचें तुम्हाला समजलें आहे काय ? "

" बदाउनीशीं त्यांचें बोलणें चाललें आहे असें मला वाटतें. पण काय ठरलें तें मला अद्याप उमगलेलें नाहीं. "

" त्यांची दिनचर्या कशी आहे ? "

" थेट काशी क्षेत्रांतील मठाधिकाऱ्यांसारखी. "

" त्यांच्याबरोबर शिष्यवृंद कितीसा आहे ? "

" शिष्यवृंद फारच थोडा दिसतो. पण आहे तो शास्त्रीबोवांच्याच मताचा आहे. "

" त्यांची स्वधर्मनिष्ठा कशी काय आहे ? "

" त्यांची धर्मनिष्ठा–" ती काळी आकृति या ठिकाणीं निरुत्तर झाली. बादशहानें आपल्या प्रश्नाच्या पुनरावृत्तीनें तें वाक्य पुरें केलें.

" कशी आहे असा प्रश्न. "

यावर ती कृष्णाकृति उत्तरादाखल हलुच हांसली.

" आम्हांला नाहीं समजला या हांसण्याचा अर्थ. "

" हजरत ! जो माणूस आपले धर्मग्रंथ पैशाच्या लोभानें विकावयास तयार होतो, त्याची धर्मनिष्ठा किती प्रखर असणार ? "

" तुमचें अनुमान चुकीचें आहे. धर्मग्रंथ विकणें वेगळें आणि धर्माचा त्याग करणें वेगळें. "

बादशहाच्या भाषणाचा रोंख आतां त्या काळ्या आकृतीच्या लक्षांत आला व आपण बादशहासमोर शहाणपणाचा आणलेला आव खुळेपणाचा होता हें मनास पटून तिची मान अधोमुख झाली. ती व्यक्ति लज्जित झाली. बादशहाच्या सूक्ष्मदृष्टीचा व दूरदर्शी धोरणाचा अनुभव अनेकांना अनेक प्रसंगीं अनेकवार येत असे. दक्षिणी शास्त्री या दृष्टीनें धर्मनिष्ठेच्या बाबतींत कितपत कमकुवत असतील याचा ठाव त्याला अद्याप लागला नव्हता. तो त्याविषयीं आपल्या मनाशीं कांहीं वेळ विचार करीत राहिला.

" बरं ! अबदुल्लाखान, तुमच्या हाताखालचीं सर्व माणसें नीटपणें वागत आहेत ना ? "

" जी हुजूर ! सर्व माणसें आपलीं कामागिरी चोख बजावीत आहेत. "

" वीरसिंहानें हल्लीं आपला मेहुणा कोण दोन चार महिन्यापूर्वीं घेतला आहे नोकरींत, तो कसा आहे ? "

" तो तर आपली कामगिरी फारच छान बजावतो. आज स्वारांस टेहळून पुढें जाऊन तोच भेटला; आणि त्यानेंच ही जयाची बातमी मोठ्या उत्साहानें मला कळविली. "

" कोण म्हणतां तुम्ही ? "

" तो रतनसिंग, वीरसिंहाचा मेहुणा. तोच ना ? "

" हूं. आणि दुसरे दोघे ? "

" आपले दाउद आणि महंमद ? आहेत–सर्व हुषार आहेत. "

" मेवाडकडची कांहीं कमजास्त खबर ? "

" या दोन दिवसांत येईल असें दिसतें. तो बातमीदार हल्लीं भेटलाच नाहीं. पण उदेसिंहाचा पुरा छळ आमच्या सैन्यानें मांडला आहे अशी बातमी मधून मधून समजते. दरबारीं बातमीहून जास्त खबर कांहीं अद्याप आलेली नाहीं. "

" तोडरमल्लविषयीं—"

" तोडरमल्लबद्दल मला संशय आला होता, पण तो चुकीचा असावा असें वाटतें. तथापि त्यांच्या हालचालींवर आमची पाळत आहेच. त्यांची चळवळ राजकारणांत कांहीं नाहीं. धर्मविषयक असावी असा अंदाज माझा होता पण संशयाची शाबिती होण्यासारखी नाहीं–अद्याप तरी तसा कांहीं पुरावा मिळत नाहीं. "

" बरं आहे. तुम्ही चला. "

पुनः त्रिवार मुजरा करून ती कृष्णाकृति हळूहळु झाडांतून अदृश्य झाली.

बादशहाचे दरबारचे मुत्सद्दी फार चतुर व राजकारणी होते. ते राज्याचीं कारस्थानें बादशहाकरितां विश्वासानें करीत असत. तथापि त्याशिवाय त्यांचे स्वतःचे गुप्त

हेर होतेच. कोणत्याही गोष्टीचा निकाल करावयाचा अगर तिचा खरेखोटेपणा ठरवावयाचा तो दोहींकडच्या बातमीखात्याचा मेळ बसल्याशिवाय अकबर ठरवीत नसे. या बातमीखात्याचा अबदुल्लाखान हा मुख्य असून त्याच्या हाताखालीं कांहीं फार विश्वासू अशी मुसलमान रजपुत मंडळी होती. ही रजपूत माणसें अकबरास वश झालेल्या विश्वासू लोकांपैकींच होतीं, व तीं आपल्या धन्याशीं इमानानेंच वागत असत. तथापि रजपुतांचा इमानीपणा मुसलसान अधिकाऱ्यांच्या विश्वासास पुरा पडत नसे. हिंदुत्वामुळें त्यांच्याविषयीं थोडाफार संशय मुसलमान अधिकाऱ्यांच्या मनांत असावयाचाच.

सर्वांकडच्या बातम्या घेऊन आपले हुकूम नोकरांस सोडावयाचे, पण आपल्या हेतूंचा थांग सहसा कोणास लागूं द्यावयाचा नाहीं. हें अकबराचें धोरण होतें. विश्वासांतल्या मोठमोठ्या मुत्सद्यांस देखील त्याच्या कित्येक हेतूंचा कधीं कधीं पुरासा थांग लागत नसे. तथापि तो सर्वांवर आपला विश्वास टाकीत असे व ज्याच्यावर एखादी कामगिरी सोपवावयाची, त्याच्या कार्यांत आपण ढवळाढवळ करावयाची नाहीं, असा त्याचा क्रम होता. त्यामुळें कोणीही कार्यकर्ता जबाबदारीनें आपल्या आंगावरील कार्य पूर्णपणें पार पाडीत असे.

बादशहाचें मन धर्माच्या बाबतींत विचारमग्न होतें. तें आतांच्या विजयाच्या बातमीनें आनंदित व सुप्रसन्न झालें. अकबराच्या मनावर चिंतेचें दडपण कशा प्रकारचें व किती होतें हें वरती आलेंच आहे. अशा स्थितींतहि त्याला आनंद वाटल्याशिवाय राहिला नाहीं. सकाळींच या आनंदप्रदर्शनार्थ तोफा देऊन ही वार्ता नगरभर प्रसिद्ध करावयाचें त्यानें ठरविलें. पण त्याच्या मनांत आज कित्येक दिवस एक इच्छा उत्पन्न झाली होती व तिच्या प्राप्तीस्तव तो अनेक प्रयत्न करीत होता.

हिंदूंच्या वेदग्रंथांचा तरजुमा फारशींत उतरण्यासाठीं त्यानें अनेक प्रयत्न चालविले होते. आपल्याकडील विद्वानांस संस्कृत शिकावयास लावणें, संस्कृतांत निष्णात असलेल्या धर्मपंडितास वश करून घेणें, व शक्य तर त्यांस आपला धर्म स्वीकारावयास लावणें व त्यांस पुनः फारशी भाषेंत प्रवीण करणें या त्याच्या युक्त्या होत्या. पण या गोष्टी फार नाजूक आहेत हें त्याला कळून चुकलें होतें. हिंदु लोकांस बळजबरीनें न वाटवितां त्यांना स्वखुषीनें वाटवितां आल्यास प्रयत्न करावयाचा हें त्याचें धोरण होतें. हिंदु लोकांच्या धर्मावर अत्याचार केल्यास आपलें राज्य हिंदुस्थानांत चिरस्थायी होणार नाहीं, हें वर्म त्यानें ओळखलें होतें. हिंदु लोकांना आपल्या धर्मासारखें प्रिय दुसरें कांहींच नाहीं; हें तो ओळखून होता. गांवांत स्मशान, दिव्याखालीं अंधेर, निखाऱ्यावर राख आणि नियमांत अपवाद हीं असावयाचींच. त्याचप्रमाणें प्रत्येक राष्ट्रांत आणि प्रत्येक धर्मांत कांहीं अल्पस्वल्प देशद्रोही व धर्मद्रोही असावयाचेच. अशा कुऱ्हाडांच्या दांड्यांनाच शत्रु हातीं घेत असतात. असल्या अपवादात्मक द्रोही लोकांच्या उदाहरणावरून सगळें राष्ट्र अगर सांप्रदाय नादान असतो असें कधींही ठरवितां यावयाचें नाहीं. पण अनेक निष्ठावंतांची कर्तबगारी एकटा द्रोही धुळीस मिळवून टाकतो, इतकें मात्र खरें.

जयाची वार्ता अद्याप दिल्ली नगरांत प्रगट झाली नव्हती. आज सरासरी वीस वर्षांच्या कारकीर्दींत देखील हा अकबरशहा आपल्या तमाम हिंदुमुसलमान प्रजेला फार प्रिय झाला होता. तथापि फार कडव्या मुसलमानांना अकबराचें धार्मिक उदार-

पणाचें धोरण बिलकूल पसंत नव्हतें. आपला अभिप्राय ते बादशहाच्या कानीं प्रसंगानुसार घालण्यास कचरत नसत. पण अकबर शांत डोक्याचा होता, आपलें आसन स्थिर करावयास आपण कशा प्रकारें वागलें पाहिजे, हें त्यानें कधींच ठरवून टाकलें होतें. तो सर्वांचा उपदेश ऐकून घेई. तोंडानें कोणास दुखवीत नसे. पण आपल्या सारासार विवेकशक्तीस जें युक्त वाटेल, तेंच तो व्यवहारांत उतरीत असे.

या नवीन विजयाची बातमी समजल्यावर आपल्या तमाम हिंदुमुसलमान प्रजेवर आपल्याविषयीं अधिक आदरभाव उत्पन्न होणार हें त्यानें ताडलें होतें. आपलें वैभव पूर्वीपेक्षां वाढणार, आपल्या पराक्रमाची साऱ्या हिंदुस्थानांत द्वाही फिरणार, अशा आनंदोत्सवांत व त्यानिमित्त होणाऱ्या चैनीखुशालींत आपल्याला आपल्या मनांतल्या कांहीं गोष्टी साध्य करून घेतां येतील, असा तर्क बांधून ठेवतांच त्याला आणखी हुषारी वाटूं लागली. तो आपल्या खास हुजऱ्यांसह आनंदाच्या भरांत आपल्या जनानखान्याकडे वळला.

पण त्याच्या मनांत तो नवीन विचार तरी कोणता घोळत होता. अशीच एक नवीन कल्पना याच वेळीं तिकडे बदाउनीच्या डोक्यांत त्या ब्राह्मणाशीं बोलतांना उत्पन्न झाली होती. अकबराचा हा विचार आणि बदाउनीची ती कल्पना हीं दोन्हीं एकच असतील काय ? कुणी सांगावें ? एखाद्या क्षणाचें महत्त्वच तसें असतें. एकच कल्पना अथवा विचार अनेकांच्या मनांत एकाच वेळीं येण्याचा चमत्कार केव्हां केव्हां असा घडत असतो. पण त्याचा पडताळा मननपूर्वक घेणारे लोक मात्र फार थोडे. वाङ्मयांत हा प्रकार तर फार दिसून येतो; पण फक्त चाणाक्ष अभ्यासकांच्या व तो देखील फारच थोड्यांच्या ध्यानांत येतो. याला कारण कदाचित् एखादी विशिष्ट प्रकारची परिस्थिति असेल, अगर अन्य कांहीं असेल. एकाच प्रकारची विचारांदोलनें उत्पन्न होऊन अनेक व्यक्तींस एकदांच केव्हां केव्हां सारख्याच विचारांची स्फूर्ति होत असते. आज अकबर व बदाउनी यांच्या बाबतींत असाच प्रकार घडला असेल काय ?

दक्षिणेकडून आलेले विश्वंभर शास्त्री हे फार धर्मनिष्ठ असतील काय ? असा प्रश्न अकबर बादशहास पडला होता, तो कां म्हणून ? हातांत धरावयाच्या कुऱ्हाडीस तो दांडा चांगला होईल, असा बेत अकबराच्या मनांत तर आला नसेल ना ? कदाचित् असेलही. उद्यांपासून सुरू होणाऱ्या विजयोत्साहाच्या संधीस अनेक गोष्टींस सुरुवात करावयाचें अकबरानें मनांत ठरविलें, त्या गोष्टी त्यानें कशा सुरू केल्या व कशा पार पाडल्या हें आतां आपल्याला हळुहळु समजून येणारच आहे. ती रात्र गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळीं तोफांची सरबत्ती तर सुरू झालीच व ती आपणही ऐकली आहे. या तोफांच्या सरबत्तीनें नगरांत जिकडे तिकडे चळवळ उडवून दिली. तोंच नगरांत जिकडे तिकडे दवंडीही पिटाविण्यांत आली, कीं सरदार तोडरमल्ल विजयी होऊन दिल्लीला येत आहेत. ही बातमी ऐकून नागरिकांस फार आनंद झाला. आतां उत्सवाला सुरवात होणार हें जाणून ते आपापल्या घरापुरत्या करावयाच्या उत्सवाच्या तयारीला लागले.

पण ज्या वेळीं तो ब्राह्मण रात्रौ बदाउनीची गांठ घेऊन विश्वंभर शास्त्र्याच्या आपल्या मालकाच्या मठाकडे निघाला, तेव्हां त्याच्या खांद्यावर हात ठेवून दुसरा एक माणूस त्याच्या बरोबर बोलत चालला होता; त्यांचें बोलणें कशाविषयीं चाललें

होतें, हें आपणांस समजलें असतें; तर बरें झालें असतें; पण त्यांचें बोलणें अगदीं हलक्या आवाजांत चाललें होतें. तथापि शेवटचे शब्द मात्र त्यांनीं मोठ्यानें बोला-वयास सुरुवात केली.

"केव्हांपासून मी आपली वाट पहात बदाउनीच्या वाड्याच्या तटाबाहेर राहिलों होतों. इतका वेळ आपलें खलबत कसलें चाललें होतें?"

"तें सांगेन सावकाश. पण आज त्या अबदुल्ल्यानें कसली गुप्त बातमी आणली आहे, तिचा पत्ता लागला काय?"

"रतनसिंगाची गांठ पडली नाहीं. पण मला पाहून त्यानें नुसती जी खूण करून दाखविली, त्यावरून मला आशा वाटली. नंतर वीरसिंह आणि रतनसिंग बोलत बोलत अबदुल्ल्याच्याकडे जात असतां, त्यांच्या मागोमाग मी चालूं लागलों तों मला हा कपटा मिळाला." असें म्हणून त्यानें एक कपटा काढून तो त्या ब्राह्म-णाच्या समोर धरला. ब्राह्मणानें झाडीच्या बाहेर पडल्यावर तो चांदण्याच्या प्रकाशांत वाचण्याचा प्रयत्न केला, पण त्यांस तो वाचतां येईना. त्या दोघांची उत्कंठा फार वाढली. ते आतां फार जलदीनें झपाझप मठाकडे जाऊं लागले. आपले मठाधिपति आपली वाट उत्सुकतेनें पहात बसले असतील, त्यांना सर्व वर्तमान कळविलें पाहिजे, हें त्यांस ठाऊक होतें. म्हणून ते घाईघाईनें चालले आहेत, तोंच त्यांस बाजूच्या झाडांतून एक कर्णकठोर किंकाळी ऐकूं आली!

---

# प्रकरण चौथें.

## मठांतली धांवपळ!

ती हृदयद्रावक व कर्णभेदक किंकाळी ऐकून ते दोघेही जण जागच्या जागींच थबकले! ह्या वाटेनें ते क्वचितच कधीं येत. इतक्या रात्रीं या वाटेनें येण्यांत एक प्रकारची भीति आहे, असा सर्वांचा समज होता. त्या दोघांना रात्रीं फिरतांना इतकी रात्र कधीं होत नसे असे नाहीं, पण इतकी रात्र झाली तर ते या वाटेनें कधीं येत नसत. या वाटेनें आणखी तीन चार फर्लांग चालून गेल्यावर त्यांना आपल्या मालकाचा मठ लागणार होता. तो गांवाच्या बाहेर होता. एका बाजूस दाट झाडी होती. ज्या ठिकाणीं ते दोघे आतां चपापून थांबले होते, ती जागा फार भयाण होती; व त्या बाजूस भुताटकीचें वास्तव्य आहे, असा लोकांचा समज होता. शहरांतून थेट मठाकडे जाव-याची वाट ही नव्हती. ती वाट ते दोघे चुकले आणि बोलण्याच्या नादांत भलती-

कडेच आले, हें त्यांच्या आतां लक्षांत आलें. पण आतां येथून पुढें नीट जाणेंच भाग होतें. कारण मागें परतल्यास तिप्पट लांब जावें लागणार होतें. ते दोघेजण असल्यामुळें त्यांचा एकमेकास धीर होता. पाहिला आश्चर्याचा व भीतीचा ओघ ओसरल्यावर ते दोघेही भानावर येऊन एकमेकांकडे पाहूं लागले.

पुन्हां त्यांना आणखी एक किंकाळी ऐकूं आली; पण ती कुठून येते, हेंच मुळीं त्यांस समजेना. त दिङ्‌मूढ होऊन गेले. सभोवतीं त्यांनीं डोळे फाडफाडून पाहिलें, पण एका बाजूस थोडीशी झाडी व दुसऱ्या बाजूस खूप अंतरावर दिसणारें भयाण स्मशान, याशिवाय कांहींच नाहीं ! आणि एकावर एक दोन किंकाळ्या तर त्यांच्या कानांवर आल्याच होत्या. दिवसाउजेडीं या वाटेनें ते कधीं कधीं लोकांच्या दृष्टीस पडल्याशिवाय जावयाचें असे, तेव्हां जात असत. म्हणून तो मार्ग त्यांना अपरिचित नव्हता. भीति थोडीशी कमी होतांच त्या किंकाळ्या कोठून आल्या त्या पहाव्या असें त्यांस वाटलें. ज्या दिशेनें त्या किंकाळ्या आल्या त्या दिशेस बरेचसें चालून गेल्यावर त्यांनीं पुन्हा कानोसा घेऊन पाहिलें, तों मोठ्यानें उच्चारलेला एखादा शब्द मधूनमधून त्यांच्या कानीं येऊं लागला. म्हणून त्यांच दिशेनें ते आणखी पुढें गेले, तों एक पडकी मोडकी अशी इमारत उभी असलेली त्यांना दिसली. ती पाहतांच त्यांना जरा भीतीच वाटली. कारण ती जागा फार भयाण आणि उदास दिसत होती. तो ब्राह्मण पुढें जावयास कबूल नव्हता. त्याच्या मनांत या असल्या भुताटकींच्या भानगडींत न पडतां आपण आपल्या मठाचा मार्ग गांठावा असें होतें. पण बरोबरचा त्याचा सोबती त्या गोष्टीस कबूल होईना. तो पडक्या इमारतीकडे जाऊन काय प्रकार आहे तो पाहण्यास फार उत्सुक झाला होता. त्याला या गोष्टीचा कायतो छडा लावावा असें वाटत होतें, म्हणून तो पुढें झाला आणि थोडक्याच वेळांत दोघेही त्या पडक्या इमारतीकडे येऊन पोंचले.

त्या चांदण्यांत ती मोडकी इमारत फारच भयानक दिसत होती. इमारत मूळची दुमजली होती. पण सभोवतालच्या भिंती पडून त्या ठिकाणीं गवत व रान उगवलें होतें. दरवाजेही मोडके तोडकेच होते. त्या वाड्याभोंवतीं पूर्वीं असलेली लहानशी दगडी भिंत आतां पार पडून ठिकठिकाणीं खांचा आणि उंचवटे झाले होते. ते दोघेही एकमेकांच्या सोबतीनें त्या इमारतीपर्यंत येऊन पोंचले. तोंच त्यांना आणखी एक किंकाळी व शिव्या दिलेल्या ऐकूं येऊं लागल्या. या नव्या किंकाळीसरशी तो ब्राह्मण दगडाच्या राशीवरून तोल जाऊन पडला. त्याला त्याच्या सोबत्यानें उचलून सांवरला व ते दोघेही त्या पडक्या घराच्या दरवाज्यापाशीं गेले. दरवाजाच्या आंत त्यांना पावलांचा दणदणाट ऐकूं आला. पण माणसांचा आवाज जो त्यांच्या कानीं आला तो मात्र त्या मजल्यावरचा नव्हता व वरच्या मजल्यावरीलही नव्हता. तो आवाज भुईखालून, आपल्याच पायांखालून येत असल्यासारखें त्या दोघांसही वाटत होतें. आतां मात्र ब्राम्हणाची बोबडी वळण्याची पाळी आली. पण त्याचा सोबती अजूनही मागें फिरावयास कबूल होईना. त्यानें त्या दरवाजावर जाऊन तो जोरानें ढकलण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर आंतून आस्वलाच्या ओरडण्यासारखा आवाज ऐकूं आला. ते दोघे नंतर दुसऱ्या दरवाजावर गेले तेथेंही तसाच आवाज पुनः ऐकूं आला व जिन्यावर चढल्यासारखीं पावलें वाजलेलीं ऐकूं आलीं. ब्राह्मणाची मूर्च्छित होण्याची वेळ आली व तो आपल्या सोबत्याचे पाय धरून प्रार्थना करूं लागला.

या उप्पर तुझ्या सोबतीनें आपण कधींच या वाटेनें येणार नाहीं, पण आज एकदां मठाकडे चल, असें म्हणून त्यानें त्याचे खरोखरीच दोनी पाय धरले. तेव्हां त्याचा नाइलाज झाला. पण इतक्यांत त्याचा दुसऱ्या बाजूनेंही खरोखरीच नाइलाज झाला होता.

वरच्या मजल्यावरच्या खिडक्यांना दारेंच नव्हतीं. खालच्या मजल्याच्या खिडक्यांना दारें नसलीं तरी जाळ्या होत्या. वरच्या खिडक्यांना जाळ्या देखील नव्हत्या. ज्या ठिकाणीं ते दोघे उभे होते त्याच्यावर एक खिडकी होती व त्या भिंतीच्या दोन टोंकांस आणखी दोन दोन खिडक्या होत्या. त्या खिडक्या या दोघांच्या नजरेस आल्या नव्हत्या. कारण त्या बाजूस चांदणें नसून काळोखच होता. या दरवाजावर येऊन त्या ब्राह्मणाचा तो सोबती दरवाजा ढकलावयाचा प्रयत्न करणार तोंच वरून बभित्स, केर, कचरा, कांचांचे तुकडे वगैरे घाणीचा वर्षाव खालीं होऊं लागला आणि दोन्हीं बाजूंनीं बारीक दगडांचा मारा त्या दोघांवर जोरांत सुरू झाला ! त्याबरोबर त्या ब्राह्मणानें बोंबच ठोकून दिली आणि दोघेही जीव- घेऊन वाट दिसेल तिकडे पळत सुटले. ते तिथून पाय काढतात तोंच दोन तीन आस्वलें ओरडल्याचा आवाज फिरून एकवार त्यांना ऐकूं आला. दोघेही राम- नामाचा जप करीत पळत सुटले. बराच वेळ ते पळत पाहिले. त्यांच्या आंगांतून सारख्या घामाच्या धारा गळत होत्या. छातींत धाडधाड आवाज होत होता. मस्तक शून्य झालें होतें. शरिराचे अवयव अगदीं गळून गेल्यासारखे झाले होते. दोघांनाही वाटत होत कीं तीं आस्वलें आपल्या पाठीमागून धांवत तर येत नसतील ना ? पण त्यांना मागें वळून पहाण्याचा मुळीं धीरच होत नव्हता. न जाणो, फिरून दगडांचा वर्षाव झाला तर काय घेतां ! नाकांत, डोळ्यांत, कानांत धूळ व मळ भरला होता. आंगाला दगड लागले होते, त्यामुळें त्यांचें सर्वांग दुखत होतें. कसेबसे जीव मुठींत घेऊन ते एकदांचे मठाच्या आसपास येऊन पोंचले. तेथून त्यांचा मठ जरी अगदीं जवळ होता, तरी थोडीशी तरी विश्रांति घेतल्याशिवाय त्यांना तितकें देखील अंतर तोडतां येण्याचें त्राण नव्हतें. धापा टाकीत ते तेथें जमिनीवरच थोडा वेळ बसले. त्यांचे पाय अगदीं गळून गेले होते; पण त्या ब्राह्मणाची स्थिति तर अगदींच शोचनीय झाली होती. तो आपल्या सोबत्यास म्हणाला—

" मला आतां पाठीवरून घेऊन जा. माझ्यानें चालवत नाहीं. "

" बस तर येथेंच; मी आपला जातों एकटाच मठांत. " दुसरा इसम थट्टेनेंच म्हणाला.

" या वाऱ्यावर मला झोंप येऊं लागली, मी आतां इथेंच पडतों विश्रांति घेत. " ब्राह्मण पुनः म्हणाला.

" मग जाऊं तर मी ? " सोबत्यानें विचारलें.

" मी एकटा राहीन मात्र खरा. आतां नाहींरे बाबा तुझ्या नादास मी कधीं चुकून देखील लागायचा. पुरे जन्म झाला आज तुझ्या संगतीनें. इतका धाडसी तूं आहेस हें मला माहीत नव्हतं. त्या भुताटकीच्या घरांत तूं आपला शिरूं लागलास बेलाशक ! काय तुला जिवाची भीति देखील नाहीं कशी ? "

" पण शेवटीं पळालोंच कीं नाहीं तुझ्याबरोबर ? " थोडेसें निराशेनेंच त्या

दुसऱ्यानें उत्तर दिलें. यावरून त्याच्या मनांत तेथें आणखी रहावयाचें असावें. तो आणखी म्हणाला.

" आतां फिरून मी एकटाच तेथें केव्हांतरी गेल्याशिवाय राहणारच नाहीं. आंत अस्वलें, वाघ, भुतें, काय काय आहे, तें मला पाहिल्याशिवाय आतां चैनच नाहीं पडणार ! "

अशा प्रकारें त्यांचा संवाद थोडासा चालला आहे तों दूर कोणी तरी गुण-गुणल्याचा, माणसांच्या ध्वनीसारखा आवाज त्यांना ऐकूं आला. त्याकडे दुर्लक्ष करून तो शिवशर्मा म्हणाला.

" तेव्हांच शास्त्रीबोवांनीं मोठमोठ्या धाडसाच्या कामीं तुझी योजना केली हीं. कामगिरी चांगली बजावशील यांत शंका नाहीं. माझी आज पुरी खात्री पटली. "

इतक्यांत त्या आस्वलांचा आवाज पुनः त्याला ऐकूं आला. आतां मात्र शिवशर्म्याच्या सोबत्यानें देखील धास्ती घेतली. ताड्कन् ते उठले आणि पुनः धापा टाकीत टाकीत त्यांनीं एकदांचा मठ गांठला.

मठांत गेल्यावर त्यांना गुरुजी झोंपावयास गेल्याचें समजलें, आतां रात्र तिसऱ्या प्रहराच्याही पुढें गेली होती. आपण आज मिळविलेल्या अनेक प्रकारच्या बातम्या आपल्या मठाधिपतीस केव्हां एकदां सांगून चकित करूं असें त्या दोघां-जणांस झालें होतें. पण कितीहि महत्त्वाची गोष्ट असली तरी दीड प्रहर रात्रींनंतर शास्त्रीबोवांची भेट कधींच कोणास व्हावयाची नाहीं, हें त्यांस ठाऊक होतें. दीड प्रहर रात्र झाल्यानंतर आपणास कोणीही हाक मारूं नये अगर आपली चौकशी करूं नये अशी मठाधिपतींची ताकीद सर्वांस माहीत होती. या त्यांच्या चमत्कारिक ताकि-दीचा अर्थ निरनिराळ्या प्रकारचा करण्यांत आला होता. पण त्यांतला खरा कोणता हें कळण्यास कांहींच साधन नव्हतें. जो तो आपापल्या मनास वाटेल तसे तर्ककुतर्क करीत बसे. पण असा चमत्कारिक नियम करण्याचें कारण काय हें कोणासच ठाऊक नव्हतें.

विश्वंभरशास्त्र्यांच्या अगदीं जवळच्या पट्टशिष्यांचें म्हणणें असें होतें कीं मध्य-रात्रीच्या सुमारास स्वामी पुरश्चरणास बसतात. त्यावेळीं ते समाधी लावून बसले असतां त्यांना प्रत्यक्ष ईश्वराचें दर्शन घडत असतें. त्यावेळीं त्या ठिकाणीं कोणासच जाण्याला परवानगी नसते. पण या गोष्टीवर देखील सर्वांचाच विश्वास होता असें नाहीं.

कोणी म्हणत शास्त्रीबोवा पिशाचसाधन करतात व मंत्रसिद्धीसाठीं पर्वणीच्या वेळीं व बहुधा अमावास्येच्या रात्रीं नगराबाहेरच्या स्मशानांत जाऊन बसतात. याचें प्रत्यंतर पहावयाचें असल्यास अमावास्येच्या रात्रीं शास्त्रीबोवा मठात नसतात असें या समजुतीचे लोक आपल्या म्हणण्याचे सत्यतेसाठीं छातीस हात लावून सांगत असत.

कोणाला वाटे कीं मुसलमान लोकांशीं कांहींतरी कारस्थानाचीं गुप्त खलबतें शास्त्रीबोवांस करावयाचीं असल्यामुळें ते रात्रौ आपणास कोणास उठवूं देत नाहींत. खलबतें जरी रोजचींच चालावयाचीं नसलीं, तरी नियम आपला रोजचाच ठरवून टाकला कीं मग कोणाचा उपद्रव होण्याचीही भीती नाहीं. आणि कोणाला संशयही पण यावयाचा नाहीं. त्यासाठीं ही सोपी युक्ति आहे.

कोणी म्हणत कीं, हिंदुधर्म हा मुसलमानी धर्मापेक्षां श्रेष्ठ आहे, हें सिद्ध करण्या करितां स्वामीजी कांहीं चमत्कार करणार आहेत व त्याचसाठीं त्यांनीं तपाचरण सुरू

केलें असून दररोज तन्निमित्त ते रात्रौ अनुष्ठान करीत असतात. सर्व धर्मांत हिंदुधर्म श्रेष्ठ आहे हें ते बादशहाच्या धर्मसभेला हजर राहून सिद्ध करून देणार आहेत व त्या दिवशीं त्या सभेंत आपला विजय व्हावा म्हणूनच त्यांनीं हें खडतर अनुष्ठान मांडलें आहे. आपला देश सोडून उत्तरेंत व तेंहि खुद्द दिल्लींत अकबरशहाच्या राजधानींत तळ ठेवून बसण्याचें हेंच मोठें कार्य आहे. हे लोक असेंही म्हणत कीं, शास्त्रीबुवा हे मोठे अवतारी पुरुष असून त्यांचें अवतारकार्य आतां लवकरच दुनियेसमोर येणार आहे.

कोणी असेंही म्हणत असत कीं, शास्त्रीजी हे महान् जादुगार, व चेटकी असून ते धन्वंतरी आणि ज्योतिर्षीही आहेत. त्यांच्या अंगांत अनेक विद्या आणि अनेक कला आहेत. पण ते ढोंगी आहेत. ते खरे हिंदु नसून हिंदूचा वेष घेतलेले मुसलमान आहेत. त्यांना साऱ्या हिंदूंना बाटवावयाचें आहे. हिंदूंना मुसलमान करण्याच्या कामासाठीं त्यांचा विश्वास संपादन करण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं हें ढोंग आरंभिलें आहे.

कोणी कोणी असें देखील म्हणत कीं, उदेसिंहाला आंतून या शास्त्रीबुवांची फूस असून अकबराच्या सैन्याच्या हालचाली उदेसिंहाला गुप्तपणें अगाऊ पोंचविण्यांत या ढोंगी बैराग्याचेंच आंग असावें, म्हणूनच उदेसिंह अद्याप वठणीस येत नाहीं. तसेंच रजपूत लोकांना पुनः बिथरवून अकबराचें राज्य उलथून पाडण्याचा कट हा शास्त्री गुप्तपणें रात्रीच्या वेळीं करीत असतो, असाही आक्षेप हे लोक बेधडक घेत असत.

या सर्व लोकांच्या म्हणण्यास आधार मिळण्यासारखें संशयास्पद वर्तन शास्त्रीबुवांचें होतें हेंहि नाकबूल करतां येण्यासारखें नाहीं. एकंदरींत त्या वेळच्या जनतेला शास्त्रीजी हें एक आगम्य कोडें होतें यांत शंका नाहीं. त्यांच्या भजक मंडळींत हिंदु होते तसे मुसलमानही होते; हें तर त्यांतल्यात्यांत मोठेंच आश्चर्य ! शास्त्रीबुवांच्या खऱ्या अंतरंगाचा ठावठिकाणा कोणालाच लागला नव्हता. ते आले कसे व कां ? त्यांचें मूळचें वास्तव्य कोठलें ? येथें येण्यांत त्यांचा इरादा काय ? हें नक्की असें कोणालाच माहीत नव्हतें. पण त्यांच्या विरुद्ध खऱ्याखोट्या अफवा मात्र पुष्कळच होत्या. रोज त्यांच्याकडे कित्येक माणसें येत जात असत. त्यांच्याकडे मोठमोठ्या लोकांची बोलावणीं येत असत. दक्षिणेंतून, राजपुतान्यांतून, बंगाल्यांतून काशीमथुरेहून अनेक माणसें त्यांच्याकडे जात येत असतात हें सर्वांना ठाऊक होतें.

शास्त्रीबुवांना भगवानजी असें दुसरें नांव होतें; पण त्याचा क्वचितच कोणी उपयोग करीत. शास्त्रीजी असेंच बहुधा त्यांना म्हणत. उत्तरेंत त्यांना बहुधा पंडितजी म्हणूं लागले होते. पण फार परिचय असलेले लोक त्यांना पूर्वीच्या शास्त्रीजी याच नांवानें ओळखित व संबोधीत असत.

शास्त्रीजींनीं आपला थाटही तसाच ठेवला होता. त्यांच्या मठांत-त्यांच्या स्वतःच्या खास जागेंत-कांहीं पोथ्या पुस्तकें वगैरे असत. शिवाय त्यांची झोंपावयाची जागा कधींच कोणाच्या नजरेस पडली नव्हती. त्यांच्या खास तैनातीचीं व विश्वासाचीं अशी कांहीं निवडक माणसें होतीं. त्यांतील कांहीं त्यांच्याबरोबरच आलीं होतीं व कांहीं त्यांना आल्यावर मिळालीं होतीं. यांची शिष्य मंडळी फकिरी अथवा भिक्षा मागत. शिवाय शास्त्रीजींना त्यांच्या विद्येनुसार लोकांकडून चांगल्या देणग्याही मिळत असत. मिळून त्यांचा खर्चवेंच उत्तम प्रकारें थाटांत चालत असे. त्यांत कांहीं न्यून

नव्हतें. पण शास्त्रीजींचे मनोविकार केव्हां केव्हां चर्येवर दिसूं लागत तेव्हां ते बाहेरून दिसतात, तसें आंतून नसावेत असें पाहाणाऱ्यास वाटे.

आठवड्यांतून एक दिवस व तोही बहुधा सोमवारीं शास्त्रीजी मठांत प्रवचन करीत असत व त्या वेळीं त्यांची ती विद्वत्तापूर्ण, अस्खलित वाणी श्रवण करून प्रसन्न न होणारा प्राणी विरळा. त्यांच्या प्रवचनाची कीर्ति दूरदूर पसरली होती व संस्कृत श्लोक घेऊन त्यावर ऊर्दूत अगर फारशींत प्रवचन करण्यांत शास्त्रीजी फारच निष्णात होते. मेघनिनादाप्रमाणें त्यांची ती गंभीर वक्तृत्वशैली खरोखरच फार परिणामकारक असे. या प्रवचनास अनेक लोक दूरदूरहून येत असत. दर महिन्याच्या पौर्णिमेच्या दिवशीं मोठ्या प्रमाणांत प्रवचनोत्सव होई व त्याच दिवशीं दूरचे लोक येत असत आठवड्याचें प्रवचन मठापुरतेंच असे, त्या दिवशीं मठाबाहेरचे लोक फारसे येत नसत.

येत्या पौर्णिमेस प्रवचनोत्सव फारच मोठ्या प्रमाणांत करावयाचा असा विचार शास्त्रीजींचा होता. कां बरें ?

शिवशर्मा हा शास्त्रीजी दिल्लींत आल्यावर त्यांचा अनुयायी झाला होता. त्याचा सोबती शुंभसेन हा शास्त्रीबुवांच्या बरोबर आरंभापासून आलेल्या मंडळीपैकींच एक होता. शास्त्रीजींना दिल्लींत येऊन आतां जवळजवळ चार पांच वर्षें झालीं होतीं.

रात्रौ अपरात्रीं मठांत येऊन ते दोघेही आपापल्या जागेवर जाऊन निजले. पण त्या ब्राह्मणास त्या रात्रीं झोंप देखील येत नव्हती. तो थकून भागून गेला असल्यामुळें त्याला लगेच झोंप आली पाहिजे होती. पण पाहिलेल्या एकंदर प्रकारामुळें त्याला मुळींच झोंप लागेना. शिवाय त्याचें अंगही दुखत होतें. तो तसाच अंथरुणावर तळमळत पडला होता. निजावयास जातांना त्यानें शुंभसेनास विचारलें—

" त्या मोडक्या घरांत कोण वावरत होतें ? "

" अरे बाप ! " शुंभसेन अंगावर शहारे आल्याचें दाखवून म्हणाला, " त्या मोडक्या इमारतींत भूतखाना आहे, हें तुम्हांला अजून ठाऊक नाहीं ? "

" मग तूं कसा पुढें पुढें गेलास ? "

" तें आतां माझें मलाच समजत नाहीं. मला वाटतें मला देखील त्या वेळीं पिशाच्चबाधा होऊन मी निर्भय झालों असेन. आतां मात्र मला त्या जागेची भीति वाटूं लागली. मठांत आल्याबरोबर मी त्या कुंडांतलें तीर्थ घेतल्यानंतर मला आतां मागची गोष्ट सर्व आठवून भीति वाटूं लागली. "

" तर मग मीही तीर्थ घेतों. "

" जा, लवकर घ्या जा. आणि स्वस्थ झोंपा. मला आतां हांक मारूं नका. मी गुपचुप निजणार राम राम म्हणत. तुम्हीही राम राम म्हणत पडा म्हणजे झोंप लागेल. "

असें म्हणून शुंभसेन निजला आणि लगेंच घटकेच्या आंतच मोठमोठ्यानें घोरूं लागला. पण शिवशर्मा अजूनही तळमळत पडला होता. कुंडांतलें तीर्थ घेतां क्षणींच त्याच्या डोळ्यांस गार वाटलें. थोड्याच वेळांत त्यासही गाढ झोंप लागली. पण आतां पहांट होत आलीच होती.

पहांटेस झोंपल्यामुळें ते लवकर उठले नाहींत. पण सकाळींच दिल्ली शहरांत झालेला तोफेचा धडाका त्यांनाही ऐकूं आला. त्या तोफांच्या सरबत्तीच्या धडाक्यानें

सारें दिल्ली शहर गजबजून गेलें, तसे तेहि उठून बसले आणि लालभडक झालेले डोळे चोळीत रात्रीच्या प्रकाराचा विचार करूं लागले. तोफांचा झालेला आवाज ऐकून त्यानें रात्रीं शिवशर्म्याकडे दिलेला कपटा मागितला. शिवशर्म्यानें तो काढून त्यांच्या-वरून नजर फिरविली व तो झोप झाडून ताड्कन् उठून उभा राहिला ! शुंभसेनानें तो वाचला, त्याबरोबर त्यानेंही आपला बिछाना गुंडाळला आणि शास्त्रीजी या वेळीं ज्या ठिकाणीं भगवत् चिंतन करीत बसत असत त्या ठिकाणीं जाण्याकरितां त्यानें धूम ठोकली. शिवशर्मा आपली पथारी कशी तरी गुंडाळून घेऊन त्यांच्या मागोमाग निघाला. आपली वळकटी त्यानें दुरूनच रोजच्या जागेवर भिरकावली आणि तो दुप्पट जोरानें धांवत शुंभसेनाच्या मागून पळत सुटला !

मठांतली इतर मंडळी तोफांच्या आवाजांनीं अगोदरच विस्मित होऊन गेली होती. त्यांना ही दोघांची धावपळ दिसतांच तेही त्यांच्या दोघांच्या मागून धांवूं लागले. होतां होतां मठांत जिकडे तिकडे एकच धांवपळ झाली आणि चोहींकडे सारा गोंधळ उडून गेला !

---

# प्रकरण पांचवें.

## “ ला इलाह इल्लल्लाह ! ”

तोफांचा गडगडाट ऐकून बदाउनीच्या वाड्यांत शेकमुबारिक व त्याचे मुलगे उठले व आग्र्याला जाण्याच्या तयारीस लागले. त्यांना तोफांच्या गडगडाटाचें कारण कळून चुकलें होतें. आपल्यालाहि आतां पाठशाळेंत विजयोत्सव सुरू करावा लागेल, हें त्याला ठाऊक होतें.

आग्र्याला पोंचल्यावर त्यांना कळून आलें कीं आपण यावयाच्या पूर्वींच तोडरमल्लाची विजयवार्ता आग्रा शहरभर झाली होती. जिकडेतिकडे आनंदी आनंद उसळून गेला होता.

कांहीं असो, पण दिल्लीहून आल्यापासून शेखमुबारिक फार खिन्न असे. फाजल आपल्या अध्ययनांत गुंग असे व फैज़ी आपला पाठशाळेचा अभ्यास मन लावून करीत असे. मुबारिकला वाटे बादशहानें आपल्याशीं आपल्या मुलांची चौकशी केली ती बऱ्याकरितां कीं वाईटाकरितां ? वाईटाकरितां असल्यास त्याचा परिणाम अद्याप कसा दिसून आला नाहीं ? पण कुणीं सांगावें ? बादशहा आंतल्या गांठीचा आहे. सर्व गोष्टी मनांत घालून ठेवतो. आपल्या अंतःकरणांतल्या हृद्गताचा कोणासच सुगावा लागूं देत नाहीं. कदाचित् बादशहाचा कोप व्हायचा असलाच तर लवकर दिसला

नाहीं तरी टळला असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. कसेंही असो. आपण आपलें कर्तव्य चोख करावें म्हणजे झालें.

अशा प्रकारच्या विचारांत तो गढला असतां, त्याला दिल्लीच्या मुक्कामांत घडलेल्या गोष्टींची आठवण झाली. त्यानें फिरून एक वार आपल्या मनाची खात्री करून घ्यावयाचें ठरविलें. फैझीला हाक मारून त्यानें विचारलें.

" दिल्लीला गुरूवारची धर्मसभा संपल्यावर बाहेर पडतांना फाझलशीं बोलत असतां तूं कोणता संस्कृत श्लोक म्हटला होतास ?"

फैझीनें तो श्लोकार्ध म्हणून दाखविला. मुबारिकची खात्री पटली. त्यानें बादशहाला जो श्लोकार्ध सांगितला होता, तोच तो होता त्यांत तर कांहींच चूक नाहीं.

मग त्यानें फैझीला आणखीही अनेक प्रश्न विचारले. त्यानें कोठें कांहीं वाईट वर्तन, द्वडपणा, उनाडपणा वगैरे केलेला नाहीं, याविषयीं मुबारिकनें आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घेतली. तो हिंदूंच्या पाठशाळांच्या आसपास व नदीच्या घाटावरील हिंदूंच्या पवित्र स्थानांकडे अगर ते आपले धार्मिक विधि उरकीत असतां त्यांच्या शेजारीं जाऊन उपद्रव देतो व त्यामुळें बादशहाला मनांतून फार राग आला आहे, असें समजून मुबारिकनें त्याची यथेच्छ संभावना आग्र्यास आल्याबरोबर केली; व कुटुंबांतल्या मंडळीलाहि त्यानें ती हकीगत समग्र सांगितली. मुबारिकचें सारें कुटुंब खरोखरच साधु वर्तनाचें होतें. सर्व कुटुंबियांना आपल्यावर आतां बादशहाचा रोष होईल काय, अशी भीति वाटत होती. मुबारिक ज्ञानी व तत्त्वज्ञ होता. त्याचे गुण त्याच्या दोघांहि मुलांत उतरले होते. पण दिल्लीहून आल्यापासून त्या कुटुंबांत बरी-चशी खिन्नतेची छाया पडलेली दिसून येत होती.

मुबारिकला राहून राहून आश्चर्य वाटत होतें तें बदाउनीबद्दल. बदाउनीच्या शिवशर्म्याबरोबर त्या रात्रीं झालेल्या संवादाचा कांहीं भाग फैझीनें ऐकला होता व तो त्यानें आपल्या बापालाही आठवला तसतसा सांगूनही टाकला. पण त्या हकी-गतीनें मुबारिकच्या विषण्णतेंत अधिकच भर पडली. बदाउनीकडे आपण पाहुणे म्हणून जातों. त्याला आपण परम मित्र समजतों. तोहि आपलें स्वागत प्रेमानें करतो. आदरातिथ्यांत कसलीहि कमतरता भासूं देत नाहीं. बोलणें तर निष्कपटपणाचें भासतें. शिवाय तो इतिहासकार आहे. राज्यांत होणाऱ्या उलाढालींची व राज्यव्यवस्थेची हकीगत तो लिहून ठेवणार आहे. हें महत्त्वाचें कार्य बादशहानें त्याच्यावर सोपविलेलें आहे व त्या कामगिरीची पूर्ण पात्रताही त्याच्या ठिकाणीं आहे. त्यासाठीं तो घड-लेल्या हकीगतीचीं टिपणेंहि ठेवीत असतो. पण असला मनुष्य कपटी असणें संभवेल काय ? अशा मनुष्यानें कपटी असता कामा नये. भावी पिढीला मार्गदर्शक होणारे इतिहास लिहून ठेवणाऱ्या इतिहासकारानें जगाकडे निर्विकार दृष्टीनें पाहिलें पाहिजे. तो अंतःकरणाचा पवित्र व निर्मत्सरी असला पाहिजे. न्यायदेवतेची उपासना त्यानें केली पाहिजे. आपपर भावाला त्यानें अंतःकरणांत थारा देतां उपयोगी नाहीं. सदस-द्विवेकाची ज्योत त्यानें आपल्या हृदयमंदिरांत जागत ठेवली पाहिजे. स्वार्थाला त्यानें बळी पडतां कामा नये. स्वार्थ म्हणजे केवळ व्यक्तीपुरताच नव्हे; तर जात, पंथ, धर्म, सांप्रदाय, यांपैकीं कोणत्याहि सामुदायिक स्वार्थालाहि त्यानें तिलांजली देऊन सर्वां-

ठायीं समभाव ठेवला पाहिजे. मुबारिकच्या मतें इतिहासकार असा असावा. मुबारिकचें हें मत कोणाला नापसंत पडेलसें वाटत नाहीं.

पण बदाउनी असा नव्हता असें त्याला मुळींच वाटेना. " फैझीचें म्हणणें खरें मानलेंच तर बदाउनी कदाचित् माझ्यापुरता मत्सरी बनलाही असेल, पण म्हणून तो नालायक इतिहासकार ठरत नाहीं. शिवाय मी हिंदूंच्या धर्मग्रंथाची पोथी त्या दक्षिणी शास्त्रीबोवांकडून—त्या विश्वंभरशास्त्र्याकडून मिळविण्याची खटपट करतों म्हणून त्याला जर मत्सर उत्पन्न झाला असला, तर ती खटपट मीच सोडून दिली म्हणजे झालें. कुठून तरी बादशहाचें काम व्हावयाचें तें झालें कीं बस्स. आपणाला ज्ञान व्हावयाचें तें कोणत्याहि प्रकारें होऊं शकेल. बस्स ! शिवशर्मा आतां भेटला कीं त्याला पोथी नको म्हणून सांगून टाकावयाचें. हल्लीं बरेंच दिवसांत आम्यांत शिवशर्माहि आला नाहीं व तो विश्वंभरशास्त्रीहि प्रवचनाला आम्याला आला नाहीं. आला म्हणजे पाहूं. "

अशा प्रकारचे विचार शेख मुबारिक स्वतःशीं घोळवीत बसला होता; तोंच त्याला आम्याच्या सुभेदाराचा निरोप आला कीं पाठशाळेचें काम आटोपल्यावर आपणाला भेटून जावें. हा निरोप आलेला ऐकून शेखमुबारिक आपल्या विचारतंद्रींतून जागे झाले !

पाठशाळा शेख मुबारिकच्या वाड्याकडून दूर नव्हती. शेंपन्नास कदमांच्या अंतरावर पाठशाळा होती. पाठशाळेंत जावयास उशीर झाल्याचें पाहून तो जरासा घाईनेंच उठला. पाठशाळेंत मुलें—मुलें कसलीं तीं ? थोर वयाचे बाप्येही त्यांच्यामध्यें होते म्हणून अभ्यासू लोक असेंच त्यांना म्हटलें असतां अधिक समर्पक होईल.

शेक मुबारिकसाहेब पाठशाळेंत गेले. त्यांचें चित्त आज व्यग्र झालें होतें. तथापि आपल्या प्राप्तकर्तव्यांत आंगचुकारपणा करावयाचा नाहीं, हा तर त्यांचा बाणा होता. पाठशाळेंत गेल्याबरोबर त्यांनीं आपल्या कामाला सुरवात केली.

लेखन तपासणें, वाचन घेणें, लिहावयास शिकवणें, हिशेब घालणें, अंकगणिताच्या रीती समजावून देणें वगैरे काम चाललेंच होतें. त्यांचा वडील मुलगा फाजल त्यांना त्या कार्यांत बरीच मदत करीत होता. फाझल आपल्या बापापेक्षांहि विद्वान् आहे ही त्याची कीर्ति जिकडेतिकडे झाली होती. फाझल आतां पाठशाळेंत येई तो शिकण्याकरितां नसून शिकवण्याकारितां येत असे. आपल्या बापाला मदत करण्याकरितां म्हणून तो येत असे. शिवाय अध्यापनांत त्याला एक प्रकारचा आनंदही वाटे.

जिज्ञासू अभ्यासकांची विद्यार्थीदशा कधींच—कधींच आमरणांत-संपत नसते. नव्हे विद्या पुरी करण्याकरितां नवे नवे जन्म घ्यावे लागतात. मागील जन्माच्या संस्काराच्या पायावर पुढील जन्मांतील विद्येची इमारत उभारावयाची असते. असें असतां चार अक्षरें येऊं लागल्याबरोबर अथवा थोडेंसें ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर आपला हात आतां ब्रह्मांडाला लागला असें समजणारे मूढमति ज्ञानलवदुर्विदग्ध आपणाला थोडेथोडके का दिसतात ? सबंध आयुष्य ज्यांनीं अभ्यसनांत घालविलें आहे, आपल्यापेक्षां अनेक प्रकारें जे श्रेष्ठ आहेत अशा ज्ञानवंतांशीं देखील स्पर्धा करतांना या अर्ध्या हळकुंडानें पिवळ्या होणाऱ्या उद्धट उतावळ्यांना पाहिलें-कीं त्यांचें हंसू येतें व नंतर त्यांच्याबद्दल कींव उत्पन्न होते. असले अर्धवट आपल्या आयुष्याचा दुरुप-

योग तर करतातच, पण जनतेचीहि दिशाभूल करून आपल्या अर्ध्याकच्च्या ज्ञानानें लोकांच्याहि जीविताचा अपव्यय करतात. स्वतःलाच कांहीं कळत नाहीं मग दुसऱ्याला काय सांगणार ? पण फाझल असला अर्धवट नव्हता. तो स्वतःला विद्यार्थी समजत असे; आणि अध्यापनांत देखील अध्ययनाचें कार्य करून घेई. हें अध्यापन तो स्वतंत्र करीत नसे, तर तें तो आपल्या बापाच्या नजरेखालीं करीत असे. अर्थात् त्याला शिकविण्याची हौस होती, ती आपल्या ज्ञानाचा टेंभा मिरविण्याकरितां नव्हे तर आपल्या ज्ञानांतील वैगुण्यें व दोष बाहेर पडून ते आपल्याला समजावेत व त्यांची सुधारणा व्हावी हा त्याचा हेतु अध्यापनकार्यांत होता हें लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि खरोखरच विद्यार्थीदशेंत असतांना ज्या आपल्या शंका तशाच राहिलेल्या असतात, अथवा ज्या मुळीं कधीं आलेल्याच नसतात, अशा शंका विद्यार्थ्यांकडून विचारल्या जातात, किंवा अध्यापनाचें कार्य करीत असतां आपल्याच मनांत उद्भवतात व त्या शंकांचें परिमार्जन करितांना पुन्हा आपणाला सूक्ष्माभ्यास करावा लागतोच. पण त्या अभ्यासांत देखील फार आनंद वाटत असतो. आजन्म विद्यार्थ्यांचा हा दुहेरी अभ्यास आहे. परिशीलनाच्या या दोन पायऱ्या अथवा आंगें आहेत. अशा परिशीलनाच्या हेतूनें जो अध्यापनाचें कार्य आंगावर घेतो तो खरोखरच विलीन असतो व " बालादपि सुभाषितं ग्राह्यं " हें तत्त्व डोळ्यांसमोर ठेवून आपल्या शिष्याकडून देखील शिकण्यासारखें असेल तें शिकण्यांत कमीपणा मानीत नाहीं. पण अशा शालीन विद्वानाची महती खरोखरच फार मोठी असते. सभोंवतालचें जग त्याला ज्ञानी व विद्वान् मानीत असतें आणि तो स्वतःला मात्र अज्ञ आणि नेणताच समजत असतो.

धर्मपुस्तकाच्या वाचनाचा वेळ झाला. शेखमुबारिक आपल्या आसनावर बसले व त्यांचे शिष्य त्यांचें भाषण ऐकत राहिले. ते मधूनमधून आपल्या शंकाही विचारीत होते. शेखमुबारिक बोलूं लागले--

" अल्लाला ईशप्रार्थना करणें किती प्रिय आहे, हें आतां तुम्हाला चांगलें कळलें आहे. परमेश्वराची प्रार्थना दररोज करीत राहणें हें आपलें रोजचें कर्तव्य आहे. पण प्रार्थना नुसती शब्दांनीं करून काय उपयोग ? प्रार्थना करतांना हात जोडणें, ऐटींत आसन घालणें, एकदां पूर्वेकडे आणि एकदां पश्चिमेकडे असें तोंड फिरवणें म्हणजे धर्मोपासना नव्हे. खरी धर्मोपासना निराळीच असते. त्या उपासनेला श्रद्धा आणि विश्वास लागतो. जगाचा अंत होईल, त्या वेळीं प्राण्यांच्या बऱ्यावाईट कर्मांचा निवाडा होईल. अल्ला त्यावेळीं वाईट कर्में करणाऱ्याला शिक्षा केल्याशिवाय सोडणार नाहीं. देवदूत शक्तिमान् आहेत; आपला धर्मग्रंथ फार पवित्र आहे; आणि पैगंबराच्या आज्ञा अनुलंघ्य आहेत. कोणत्या गोष्टी केल्या असतां अल्लाला समाधान वाटेल हें प्रत्येकानें ध्यानांत ठेवलें पाहिजे. पोरक्या मुलांना आणि दीनदुबळ्यांना द्रव्य देऊन त्यांची गरज भागवावी. परकी माणसें, पाहुणे कोणी येतील, त्यांचें चांगलें आदरातिथ्य करावें. भिक्षा मागतील त्यांस दान द्यावें. बंदिवानांची मुक्तता करण्यासाठीं आपल्या द्रव्याचा व्यय करावा. प्रार्थना करावयाची कधींहि चुकवूं नये. उपासनेचा अधिकार प्राप्त झाल्या दिवसापासून तर देवाची उपासना करण्याच्या व्रतांत कधींहि खंड पडूं देऊं नये. संकटें, आपत्ति वगैरे आलीं असतां आणि **अत्याचाराच्या प्रसंगीं जे शांतपणा आणि सहनशीलपणा धारण करतात**, तेच खरे मुसलमान, तेच धर्म-

निष्ठ, तेच ईश्वराला भिणारे आणि म्हणून तेच ईश्वराला प्रिय होतात. हें तत्त्व नीटपणें लक्षांत ठेवा."

असा उपदेश करून शेखसाहेब किंचित्काल ध्यानमग्न झाले. त्यांचा कंठ सद्गदित झाला. बसल्या जागींच त्यांनीं गुडघे टेंकले आणि अत्यंत भक्तिपूर्वक ईश्वरास वंदन केलें.

सर्व शिष्यांनींहि आपापलीं मस्तकें नम्र केलीं.

एका शिष्यानें हळूच प्रश्न केला.

"अत्याचाराच्या वेळीं शांतपणा धारण करावा." असें जे म्हटलें त्याचा अर्थ काय ?"

"पण अत्याचार म्हणजे काय ?" दुसऱ्या एकानें विचारलें.

"अत्याचार म्हणजे जुलूम, जबरदस्ती, दांडगाई, बळजबरी असे अर्थ होतील, नाहीं का ?" पहिला विद्यार्थी म्हणाला. पुनः शेखसाहेबांकडे वळून त्यानें विचारलें—

"पण अत्याचाराच्या वेळीं शांतपणा कसा धरावयाचा ?"

"कां ? यांत शंका कोणती आली तें नाहीं कळत ?"

"शांतपणानें अत्याचार कसा करतां येईल ?"

शेख मुबारिकला त्या गंभीर मनःस्थितींत देखील हांसू आल्याशिवाय राहिलें नाहीं. कांहीं वेळ पोटभर हासल्यावर ते पुनः गंभीर मुद्रा धारण करून म्हणाले—

"पण जुलूम जबरदस्ती, अत्याचार वगैरे शब्द उच्चारल्याबरोबर तो आपणच दुसऱ्यावर करण्यास प्रवृत्त व्हावयाचें असेंच गृहीत धरून तुम्ही चालतां, हा कोठला न्याय ? अशी प्रवृत्ति तुमच्या सर्वांच्या मनाची नेहमीं कां असावी हें मला समजत नाहीं."

सर्वत्र शांतता पसरली. कोणी हूं कीं चूं करीना. कित्येकांच्या मनांत त्या शंका विचारणाऱ्या मुलाच्या फाजिलपणाबद्दल भली अद्दल घडली असे विचार आले. पण असा विचार येणारे मुलगे थोडेच होते. पुष्कळांना त्या शंका विचारणाऱ्या मुलाचाच प्रश्न योग्य वाटत होता. त्या सर्वांच्या मनांत त्या मुलासारख्याच शंका येत होत्या. त्या मुलानें आणखी बोलून शेखसाहेबास प्रश्न विचारावें असें वाटत होतें. त्यामुळें त्यांच्या संवादास रंग भरत चालला होता. अर्थात् इतर विषयांचा अभ्यास करणाऱ्या मुलांचें देखील लक्ष आपल्या विषयावरचें हळूहळू कमी होऊं लागलें.

"पण जशास तसें वागावें आणि अन्यायाचा प्रतिकार तशाच अन्यायानें करावा, असाही आमच्या धर्मशास्त्राचा नियम आहे ना ?"

"आहे, तसा नियम आहे, आणि त्याशिवाय आणखीहि किती तरी धर्मशास्त्राचे नियम मी शिकवलेले आहेत. मूळ धर्मसंस्थापकांना धर्मसंस्थापनेच्या वेळीं जी देशकालपरिस्थिति आढळली असेल, तिला अनुसरून धर्माज्ञा लिहून ठेवणें भाग पडलें. त्या धर्माज्ञांचा कीस काढून आपल्या स्वेच्छाचाराला हवा तसा अर्थ करून आवडतीं शास्त्रें निर्माण करणें हें सच्च्या धर्मोपासकाचें ब्रीद नव्हे, समजलास ?" शेखसाहेबांचा स्वर बोलतां बोलतां वाढत जाऊं लागला. ते म्हणाले—

" स्वतःचा कोणत्याहि प्रकारचा अन्याय नसतां दुसऱ्यानें आपणास अपकार केला असतां त्यांत आपणास पाप लागणार नाहीं, हें खरें. पण स्वतः हजरत पैगंबरचें वर्तन आपणाला काय शिकवतें बरें ? हजरत महंमद पैगंबर यांचे अनुयायीच त्यांच्यावर उलटले, त्यांचे मित्र त्यांचे शत्रु बनले. कित्येक त्यांचा धिःकार करूं लागले. कित्येक त्यांना दगडाधोंड्यांनीं चोपून मारूं लागले. त्यांची प्रत्यक्ष चुलती ' उजमील ' ही देखील त्यांचा द्वेष करूं लागली. ती त्यांच्या वाटेवर कांटे पसरून ठेवूं लागली. दुष्ट लोक त्यांच्या घराच्या दरवाजांत घाण करून ठेवूं लागले, त्यांच्या अनुयायांना जखमी करूं लागले व त्या अनुयायांच्या स्त्रियांना जखमी करून, त्यांना नग्न करून, मारून चव्हाट्यावर उभ्या करून ठेवूं लागले; तर त्यावेळीं पैगंबरसाहेबांनीं व त्यांच्या कट्या अनुयायांनीं काय केलें ? त्या कट्या अनुयायांनीं पैगंबराकरितां प्राण दिले. अपकार करणाऱ्यावर शस्त्र उगारलें नाहीं. शेवटीं ' उमीजमील ' चे पति, त्यांचे चुलते " आबुलाहाब " हे पैगंबरसाहेबांना, आपल्या पुतण्याला, ठार मारण्यासाठीं तयार होऊन राहिले असतां पैगंबरसाहेब त्या अत्याचाराचा प्रतिकार कधींहि न करतां ते रात्रौ आपल्या अनुयायांसह कुराणचें पठण करीत शत्रुसमुदायांतून निघून गेले. धीरानें गंभीरपणें निघून गेले. आपल्या अलोट धैर्यानें शत्रूंनाहि चकित करून त्यांच्या डोळ्यांदेखत निघून गेले. " बोलतां बोलतां शेखसाहेबांचा आवाज चढूं लागला. त्यांच्या डोळ्यांत आंसवें आलीं. घसा घोगरा झाला. त्यांच्याकडे शिष्यवर्गाच्यानें पहावेना. ते सद्गदित झाले असूनहि उग्र दिसूं लागले.

" पैगंबराच्या आणि कुराणच्या आज्ञा पाळणारे असतात, ते आपल्याला आवडणाऱ्या तेवढ्या आज्ञा पोटाशीं धरतात व न आवडणाऱ्या आज्ञा मात्र डोळ्यांआड करतात तें कां म्हणून बरें ? खून, मारामाऱ्या, मद्यपान, जुगार यांचा कुराणांत निषेध केलेला नाहीं काय ? मग हे दुर्गुण आमच्या लोकांतून आजिबाद कां नष्ट होऊं नयेत ? चोरी करणारा तर महापातकी ठरतो. पण या पाठशाळेंतला मुलगा देखील आमचीं शिकवण हरहमेश असतांना चोरी करावयास मागेंपुढें पहात नाहीं. तो चोरी करतो, तर त्याचा दुष्ट वासनेचा सोबती त्याच्या त्या पापकृत्यावर पांघरूण घालण्यासाठीं खोटी साक्ष देतो. पण कुराणच्या सुऱ्यांमध्यें हीं दोन्ही पातकें महान पातकें गणलीं गेलीं आहेत. कुराणच्या सर्वच आज्ञा पूज्य आहेत. मानणाऱ्यांनीं त्या सर्वच आज्ञा मानल्या पाहिजेत, नाहीं तर पालटलेल्या परिस्थितीस धरून सदसद्विवेकानें वागलें पाहिजे.

इतकें बोलून शेखसाहेब पुनः ध्यानमग्न झाले. एकसारखी मेघगर्जना झाल्याप्रमाणें सुरूं असलेलें प्रवचन अकस्मात् थांबल्यामुळें पुनः सर्वत्र निस्तब्धता पसरली. आतां मात्र कुराण आणि पैगंबर हीं सर्वांच्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभीं राहिल्यामुळें सर्व छात्रवृंद रोमांचित झाला. पण दोन व्यक्ति आसुरीलालसेनें जळूं लागल्या. शेखसाहेबांच्या भाषणाचा शेवटचा भाग त्या शंका विचारणाऱ्या मुलाच्या आधल्या दिवशींच्या कृत्याला अनुलक्षून होता. त्या मुलानें दुसऱ्या एका मुलाची एक वस्तु चोरली होती. पण ती त्याचीच आहे, चोरलेली नव्हे अशी त्याच्या एका सोबत्यानें समानशीलत्वानें साक्ष दिली होती. ज्याची वस्तु चोरली तो मुलगा सत्त्वस्थ व सदाचरणी होता, पण तो ह्या दांडगट मुलाला भीत असल्यामुळें त्यानें आपली तक्रार

मागें घेतली व रडत बसला. शंका विचारणाऱ्या मुलाला मरणप्राय दुःख झालें. कारण आतांच्या शेखसाहेबांच्या भाषणांतलें मर्म ओळखून सर्व पाठशाळा त्याच्याकडे पाहून हासत होती! तो शंका विचारणाऱ्या मुलाच्या आंगाचा तिळपापड उडून गेला होता!

सर्व पाठशाळा चित्रासारखी तटस्थ झाली होती. श्रद्धाळू मुलांना शेखसाहेब प्रतिपैगंबर वाटत होते. सर्वच मुलांचें लक्ष तिकडे वेधल्यामुळें फाझल देखील हें कौतुक पहात बापाच्या जवळच बसला होता. फैझीहि त्या विद्यार्थीगणांत होता. बापाचा उपदेश त्या दोघा मुलांस तंतोतंत पटला होता. पोक्त स्वभावाचा फाझल हा देखील पाठशाळेंत व आग्रा शहरांत शिष्टमान्य व विद्वान् म्हणून प्रसिद्ध होता. थोड्या वेळानें भानावर येऊन शेखसाहेबांनीं आपलें काम पुनश्च सुरू केलें व हा धर्मचर्चेचा विषय पढणारा वर्ग सोडून दिला. इतर वर्गाच्या अभ्यासाकडे ते पाहूं लागले. अभ्यासाचें काम संपत आलें होतें. एकामागून एक मुलगे पाठशाळेंतून घरीं चालले होते. आतां फक्त तीनचार मुलें, फाझल, फैझी आणि मुबारिक इतकेच जण पाठशाळेंत राहिले होते, तोंच कांहीं मुलें भीतीनें घाबरून धापा टाकीत पाठशाळेकडे येतांना पाहून पाठशाळेंतल्या माणसांना मोठें आश्चर्य वाटलें. तोंच त्यांना आणखी आरडाओरड आणि रडारडहि ऐकूं आली. काय आहे तें पहाण्याकरितां जिकडून तो गलबला आला होता, तिकडे फैझी धांवत निघाला. त्याला नको म्हणून थांबवून घेण्यासहि फाझलला फुरसत मिळाली नाहीं!

शेखसाहेब तर आलेल्या मुलाला काय हकीकत आहे म्हणून विचारित होते. पण त्या मुलांची पांचांवर धारण बसल्यामुळें तोंडावाटें नीट शब्दच निघत नव्हता! तथापि कांहीं तरी वाईट प्रकार घडला आहे, एवढें उमगून आलें. शंका विचारणाऱ्या त्या घटिंगणानें त्या गरीब मुलाचा प्राण घेतला, असा कांहींसा मजकूर त्या भीतीनें कांपणाऱ्या मुलांच्या हुंदक्यांतून उमगून घेतां आला. अर्थात् शेखसाहेब तिकडेच जावयास निघाले. बरोबर फाजलहि होता तो रस्ता यमुनेच्या तीराला जात होता. थोडेसें अंतर चालून जातात, तों फैझीलाहि त्यानें मारून जमिनीवर लोळवल्याचें वर्तमान घेऊन आणखी कांहीं मुलें आलीं!

शेख मुबारिकच्या डोळ्यासमोर काजवे फिरूं लागले. मुबारिकच्या घराकडील कांहीं नोकर मंडळी इतक्यांत धांवत आली, पण शेख मुबारिकेनें त्यांना थोपवून धरिलें. तोंच तो शंका विचारणारा गुंड यमुनाकांठच्या झाडींत कुठें नाहींसा झाला म्हणून बातमी आली. सारीं मुलें इकडेतिकडे पळत सुटलीं होतीं. ती त्यांची गडबड पाहून शहरचीं माणसेंहि आतां त्यांच्या सभोंवतीं गोळा होऊं लागलीं होतीं. शेवटीं ती सर्व मंडळी ज्या ठिकाणीं फैझी आणि तो मुलगा निश्चेष्ट होऊन पडला होता त्या ठिकाणीं आली. पहातात तर काय? दोन्हीं मुलें प्रेतवत् पडलेलीं!

बरोबरच्या जाणत्या मुलांनीं त्या दांडगटाला चोप दिला होता. पण त्या सर्वांस गुंगारा देऊन पळून जाऊन एका झुडपांत दडून बसण्याचा तो प्रयत्न करीत होता, तोंच एका कृष्णवर्ण सर्पानें येऊन त्याला कडकडून दंश केला. त्याबरोबर तो जागच्याजागींच लांकडासारखा ताठ होऊन पडला!

त्याचा पाठलाग करणारीं मुलें त्याला हुडकीत हुडकीत तेथपर्यंत गेले, पण त्याची ती अवस्था पाहून त्यांचा राग कोठल्या कोठें मावळून गेला व उलट त्यांना त्याची अनुकंपाच उत्पन्न झाली. गुरुजींच्या शिकवणीचा सत्परिणाम त्यांच्या मनावर ठसला होता. दुष्ट असला तरीं अशा स्थितींत त्याला आपल्या कर्माचें प्रायश्चित्त भोगण्याकरितां तसाच टाकून न जातां त्याला शेखसाहेबापाशीं उचलून नेण्याचें त्यांनीं ठरविलें. त्या गरीब मुलांची आईबापेंही इतक्या अवधींत शेखसाहेबापाशीं आलीं होतीं. घटका अर्ध घटका इतक्या अवकाशांत त्या ठिकाणीं हजारों लोकांचा समुदाय जमला. शेख मुबारिकसाहेब मस्तकावर हात ठेऊन अधोमुख होऊन बसले होते. तीं दोन मुलें त्यांच्या समोर पडलीं होतीं. आणि सभोंवतीं अनेक लोकांची गर्दी उसळून गडबड उडाली होती.

इतक्या अवधींत त्या शंका विचाणाऱ्या मुलाचें प्रेत घेऊन हीं सात आठ मुलें त्या ठिकाणीं आलीं. त्या मुलानें इतक्या थोड्या अवधींत एवढा हलकल्लोळ उडवून दिला होता. एवढ्या मोठ्या संकटास तो एकटा कारणीभूत झालेला होता. त्या दोन मुलांस त्यानें एकट्यानें मारलें होतें व कित्येकांस जखमीहि करून टाकलें होतें. आणि अनेक लोकांस त्यानें एका घटकेंत दुःखार्णवांत लोटलें होतें. वास्तविक सर्वांचा त्याच्यावर दांत असावयाचा. पण तो स्वतःच सर्पदंशानें मरून पडल्यामुळें आतां सर्वांचा मनांतला त्याच्या विषयींचा राग कमी झाला. या सर्व प्रकाराबद्दल जो तो नियतीला दोष देऊन दुःखित होऊं लागला. पण आतां त्या तिघा मुलांच्या मातापितरांचें समाधान कोण कोणत्या शब्दांनीं आणि कसें करणार? स्वतः शेख-साहेब तर स्वतःच अधोमुख होऊन बसले होते. पण त्यांना आतां स्वतःच आपल्या मनाचें समाधान करून इतरांचेंहि करणें भाग होतें. कांहीं वेळानें तसाच शोकमग्न स्थितींत ते आपलें शून्य मस्तक दोन हातांनीं दाबून धरून उठून उभे राहिले.

त्यांच्या समोर अंधेरी आली होती. त्यांचें सर्वांग बधिर झालें होतें. त्यांचें हृदय संवेदनाशून्य झालें होतें. मोठ्या कष्टानें मान वर करून त्यांनीं सभोंवर पाहिलें. पण त्यांच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. त्यांच्या मनांत चार शब्द बोलावयाचे होते. पण त्यांच्यानें मुळींच बोलवेना. ते शेवटीं म्हणाले—

" सर्व गोष्टी परमेश्वरी इच्छेनें घडतात. कोणी कोणाचा द्वेष करूं नये. सर्वांनीं सर्वांवर प्रेम करावें. अल्लाच्या आज्ञा पाळाव्या. न्यायनीतीनें वागावें. प्रत्ये-काला शेवटीं मृत्यु हा आहेच. देवाच्या इच्छेशिवाय कांहींच घडत नाहीं......"

इतकें बोलून त्यांनीं मान खालीं घातली. इतक्यांत जमलेल्या मंडळींत पुन्हां चळवळ उडाली. एक हिंदु बैरागी यमुना तीरावर चालला असतां त्याच्या दृष्टीस हा प्रकार पडला. तो सहज त्या मार्गानें आला, तोंच त्याला ती हकीगत समजून तो दयार्द्र अंतःकरणानें त्या ठिकाणीं आला. शेख मुबारिकनें त्याला आदबीनें सलाम केला. सर्व माणसें आतां तो काय करतो तें पाहण्यासाठीं टकमक पहात उभीं राहिलीं होतीं.

त्या तिन्ही प्रेतांकडे दृष्टिविक्षेप करून तो विचारमग्न झाला. त्यानें आपल्या सभोंवर एकवार पाहिलें, नंतर त्यानें आकाशाकडे पाहिलें आणि नंतर कमंडलूंतील पाणी

फैझीच्या डोळ्यास लावलें. नंतर त्यानें मनांतल्या मनांत कांहीं मंत्रोच्चार करून त्या प्रेतावर पाणी शिंपडलें आणि पुन्हां एकदां खालीं वांकून त्यानें फैझीच्या डोळ्यांस साह-सानें पाणी लावलें. लोक हा चमत्कार पहात होते. डोळ्यांचें पातें लवतें न लवतें इतक्यांत फैझीनें आपले डोळे उघडून तो निजल्या स्थितींतच सभोंवार पाहूं लागला ! लोकांना मोठा विस्मय वाटला !

त्याचप्रमाणें त्यानें त्या गरीब मुलालाहि जिवंत केलें. तोहि मुलगा हुळुहळू उठून बसूं पहात होता. जमलेल्या सर्व लोकांनीं आपल्याला झालेला आनंद त्या बैराग्याला धन्यवाद देऊन व्यक्त केला. पण त्या दांडगट मुलाच्या प्रेताचें काय ? लोकांनीं त्यालाहि उठविण्याचा आग्रह चालविला. पण बैरागीबुवांची स्वारी त्या गोष्टीला कबूल होईना. तें पाहून स्वतः शेख मुबारिक त्याच्या समोर गुडघे टेकून म्हणाले.

" साईजी ! आपण माझ्या फैझीप्रमाणेंच या मुलालाहि उठविण्याची मेहेरनजर करणार नाहीं काय ? "

" ठीक, पण पहा. याची वासना शुद्ध नाहीं. हा जिवंत झाला तर उपकार कर्त्यावर अपकार करण्यासाहि कमी करणार नाहीं. अत्यंत वाईट आचरण करून लोकांवर संकटें आणण्यांत आनंद मानणारा हा प्राणी आहे. याला उठवावें अशी सर्वांची इच्छा आहे काय ? "

" शर्फुद्दीनाचे--त्या शेकाखोर मुलाचे आईबाप व शेखसाहेब या तिघानींच त्या बैराग्याच्या प्रश्नाला " होय " असा जबाब दिला, बाकीचा जनसंमर्द तटस्थ उभा होता.

बैराग्यानें पूर्ववत् मंत्रजप करून कमंडलूचें पाणी हातांत घेऊन तो उभा राहिला. तें त्यानें त्याच्यावर शिंपडलें आणि विद्युलतेच्या वेगानें बघतां बघतां तो अदृश्य झाला !

तो वेळ प्रार्थनेचाच होता. लोकांना कल्पनातीत आनंद झाला होता. सर्वजण मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें हालचाल करावयालाहि विसरले होते. इतक्यांत शेख साहे-बांच्या घराकडून घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या. हां हां म्हणतां दोन स्वार त्या ठिकाणीं येऊन पोंचले.

त्यांना पाहतांच शेखसाहेबांना दुपारीं सुभेदारसाहेबांनीं पाठविलेल्या निरोपाची आठवण झाली. याच्यापूर्वीच आपण निघून गेलें पाहिजे होतें, हें त्यांच्या लक्ष्यांत आलें; पण मवला प्रकार त्यांना थोडाच अडवून धरतां येणार होता. तिन्ही मुलें उठल्याबद्दल त्यांना आनंद झालाच होता व आतांहि प्रार्थनेची वेळ झाली होती. शेख साहेब आकाशाकडे पाहून गुडघे टेकून बसले आणि म्हणाले--

" ला--इलाह—इल्लाह ! "

सभोंवतालच्या मंडळींनींहि त्यांचेंच अनुकरण केलें. आसपासच्या वातावरणांत देखील तोच निनाद प्रतिध्वनित झाला. जिकडे तिकडे त्याचाच पडसाद उठला.

" ला—इलाह--इल्लाह ! "

---

# प्रकरण सहावें.

## लवाद कीं लबाड ?

सफुद्दीन, तो शंकेखोर मुलगा, वर उठला आणि पुन्हा डोळे चोळीत खालीं बसला. त्याला कांहींच समजेना. तो उठला व आपल्या आईबापाकडे डोळे उघडून पाहूं लागला. त्यांनीं त्याला सांभाळून हाताला धरून घराकडे चालविलें. त्याला चालवत नव्हतें. त्याला आपलें शरीर क्षीण झाल्यासारखें वाटत होतें.

शेख मुबारिकला त्या स्वारांकडून समजलें कीं, सुभेदार साहेबांमार्फत आपल्याला कांहीं तरी बादशाही फर्मान आलें आहे. मुबारिकला आज आपल्यावर अल्लाची केवढी तरी खैर झाली असें वाटत होतें. आपल्या वाड्याकडे जाऊन कपडे वगैरे चढवून ते सुभेदारसाहेबांच्या वाड्याकडे गेले.

सुभेदारसाहेब त्यांचीच वाट पहात बसले होते. शेखसाहेब जातांच त्यांना उच्चासनावर बसवून त्यांचें त्यांनीं अभिनंदन केलें; व त्यांच्या व फाझलच्या गुणांचें आणि विद्वतेचें खूबच खूब वर्णन करूं लागले. पण बादशहाचें फर्मान समजून घेण्यास शेखसाहेब उतावीळ झाले होते, तर सुभेदारसाहेब त्यांच्या कीर्तीच्या कीर्तनांत रंगून गेले होते ! याचा मतलब काय असावा हें कांहीं केल्या शेखसाहेबास कळेना.

आजचा दिवस उजाडला कसा आणि मावळला कसा, आणि आपण झोंपावयास जाईपर्यंत आणखी काय काय प्रकार घडणार आहेत, हे त्याच्या कांहीं लक्षांत येईना. आजच्या दिवसांत त्यांना फार दुःख झालें, तसें फार सुखही झालें होतें. पण तें सुख म्हणजे झालेल्या दुःखाचें केवळ परिमार्जन होतें. आतां आणखी जो काय प्रकार घडणार आहे त्याला कोणत्या सदरांत घालावयाचें हें समजण्यास कांहींच साधन नव्हतें.

“ खरोखरच तुमचें भाग्य थोर म्हणून फाजलासारखें रत्न तुमच्या वंशांत निर्माण झालें. बादशहांची नजर तुमच्या फाझलवर कधीं गेली होती काय ? त्याच्याशीं कधीं बादशहाचें बोलणें चालणें झालें होतें काय ?......”

“ कां ? आग्र्याच्या धर्मविवेचक बादशाही सभेंत फाजल पूर्वी अनेकदां गेलेला आहे, व त्या सभेंत त्याचें भाषणही झालें आहे. ” शेखसाहेब म्हणाले.

“ हां तरीच-तरीच ! मग बरोबर. आतां मी आपल्याला निरोप सांगतों.

बादशहांनीं फाझलसाहेबांना दिल्लीला बोलावलें असून; त्यांना तिथेंच आतांपासून कायम रहावें लागणार आहे. ”

“ कशाकरितां ? ” आश्चर्यानें मुबारिकनें विचारिलें.

“ कशाकरितां तें माहीत नाहीं, पण दिल्लीहून आलेल्या लोकांच्या तोंड-माहितीवरून व धोरणावरून असें दिसतें कीं फाझलसाहेबांना येत्या दरबारांत सर-दारकी मिळावयाची आहे व दरबारचे ते मानकरी होणार आहेत, व शिवाय कांहीं बादशाही कामकाजही त्यांच्याकडे येणार आहे. ”

शेख मुबारिकच्या निढळावर घर्मबिंदू चमकूं लागले. त्यांनीं लांबलचक एक श्वास सोडला. सुभेदारसाहेबांचें वाक्य पुरें होईपर्यंत शेखसाहेब श्वासोच्छ्वास करण्यास देखील विसरले होते. कांहीं तरी संकट तर नसेलना ? हीच शंका राहून राहून त्यांना येत होती. शेवटीं सुभेदारसाहेबांच्या तोंडून ती शुभ वार्ता ऐकून एकदांचा त्यांचा जीव खालीं पडला.

“ केव्हां निघालें पाहिजे ? ”

“ उद्यां सकाळीं. ”

“ कोणी ? ”

“ फक्त फाझलसाहेबांनाच पाठवायला हुकूम आहे. ”

आग्रा शहरांत विजयोत्सव चाललाच होता. शेख मुबारिकच्या जीवाला आज खरोखरीचा उत्सव वाटला. ती रात्र त्या कुटुंबाला फार सुखाची गेली. दुसऱ्या दिवशीं फाझलसाहेबांची बादशाही स्वारांबरोबर दिल्लीला रवानगी झाली.

या गोष्टीला कांहीं दिवस लोटले. पण फैझीला पुनर्जीव प्राप्त झाल्या दिवसा-पासून हिंदु बैराग्यांविषयीं त्याच्या मनांत अधिकच आदरबुद्धि उत्पन्न झाली होती. आणि ज्या बैराग्यानें आपल्या मुलास उठविलें त्या बैराग्याचें पुनः दर्शन होईल तर फार बरें होईल असें त्यास वाटत असे. हिंदुधर्मांतील मंत्रविद्येच्या सामर्थ्याच्या गोष्टी त्याला ऐकून ठाऊक होत्या. पण आतां तर त्याला प्रत्यक्षच अनुभव आला होता. आपले कित्येक धर्मबंधु इतर धर्मांस व त्यांतही विशेषेंकरून हिंदुधर्मास तुच्छ लेखतात ही मोठी चूक आहे हेंहि त्याच्या लक्षांत ठसूं लागलें. हिंदुलोक विना-कारण कोणाच्या वाटेस जाणारे नाहींत. दुसऱ्यांवर धार्मिक जुलूम करण्याचा त्यांचा रिवाज नाहीं, पण स्वधर्मासाठीं वाटेल तें दिव्य करावयासही धर्मनिष्ठ हिंदु तयार होतात याची त्याला खात्री होती. एके दिवशीं फैझी व तो जवळजवळ बसले होते. फैझी आपल्या वाचनांत गुंतला होता व शेखसाहेब कांहीं अशाच तात्विक विचारांत गर्क झाले असतां शिवशर्म्याची स्वारी येऊन त्यांच्यासमोर उभी राहिली !

शिवशर्मा आल्याबरोबर त्याचा आदरसत्कार करून त्यास शेखसाहेबांनीं कुशल-वृत्त विचारलें. तसेंच विश्वंभरस्वामी व त्यांचा मठ याविषयींही त्यांनीं चौकशी केली. नंतर कांहीं दिवसांपूर्वी दिल्लीस गेलेल्या आपल्या मुलाबद्दलची हकीगत त्यांनीं

विचारली. अशा प्रकारें अवांतर गप्पागोष्टी झाल्यावर आम्यास येण्याचें प्रयोजन विचारलें.

शिवशर्म्यानें आम्यास येण्याच्या प्रयोजनाची वाच्यता करण्याबरोबर शेखसाहेबांस नवल वाटलें असें नवल वाटण्यासारखें तें कोणतें बरें प्रयोजन होतें ? शिवशर्म्यानें सांगितलेलें प्रयोजन खरोखरच शेखसाहेबांसच नव्हे, कोणत्याहि मुसलमानास अत्यानंद वाटण्याजोगें होतें. शेखसाहेबांस आनंद झाला तर त्यांत मुळींच नवल नाहीं. नवल आहे तें निराळेंच. शिवशर्म्याच्या आगमनाचें प्रयोजन ऐकून शेखसाहेबांस देखील तसलेंच एक प्रयोजन आपणही साधून घ्यावेंसें वाटलें व तें सद्बुद्धीनें वाटलें, हेंच त्यांत नवल.

शिवशर्म्याच्या सांगण्यावरून शेखसाहेबास कळून आलें कीं विश्वंभरशास्त्रीजी आम्यास आपल्याकडे येणार आहेत व ते कुराणाचा अभ्यास करण्याकरितां आपल्याजवळ रहाणार आहेत. कुराणग्रंथाचा मथितार्थ समजाऊन घेण्याकरितां ते आपल्याकडे येऊन दोन दिवस राहून जाणार आहेत, हें ऐकून त्यांस प्रथम आश्चर्य, मग समाधान व शेवटीं आनंद झाला. त्यांनीं त्या कार्याला आपली एकदम संमति दिली.

कदाचित् अथर्ववेदाचा ग्रंथ आपल्याला ताब्यांत घ्यावयास ही संधि बरी आहे, असेंहि त्यांस वाटलें असेल. हिंदुधर्माचीं तत्त्वें विशेष समजावून घेण्याची ही संधि आयती चालून आली आहे. असेंहि त्यांस वाटलें असेल. कदाचित् आपखुषीनें विश्वंभरशास्त्री इस्लामचे अनुयायी होत असतील तर अतिशय उत्तम असेंहि त्यांस वाटलें असेल. कसेंही असो, पण विश्वंभरशास्त्री जर आपणाकडे कुराण समजावून घेण्यासाठीं यावयाचे असताल तर तें फारच नामी होईल असें शेखमुबारिकनां वाटलें यांत मात्र तिळमात्रहि संदेह नाहीं.

शिवशर्मा त्यांना दिल्लीकडची बातमी सांगत होता. बोलतां बोलतां त्यानें आपला विषय हळूच पुढें काढला.

" अथर्ववेदाची अस्सल शुद्ध प्रत आपणाला पाहिजे ना ? "

" हो ! मिळाली तर पाहिजे. "

" मग सौदा ठरवून कां टाकात नाहीं ? "

" आपण किंमत जबर सांगतां; तितकी द्यायला आम्हाला कशी परवडणार ? "

" पण बदाउनीसाहेब द्यायला तयार आहेत. "

" मग त्यांनीं घ्यावी. आम्हांला भारी किंमत द्यावयास परवडणारच नाहीं. "

" पण आपणाला ठाऊक आहे ना, ही वस्तु खुद्द बादशहांना पाहिजे आहे ? बादशहांचीं मर्जी संपादन करण्याची ही सुसंधि आपण दवडीत नाहीं काय ? "

" पण इतक्या मोहोरा आम्ही आणायच्या कोठून ? "

" असें कशाला आम्हांला झुलवतां साहेब ? हा पैसा तुम्हांला बादशहांकडून

मिळणार आहे, एवढें कां आम्हांला समजत नाहीं असें वाटतें आपल्याला ? ”

“ मग बादशहांकडे आपणच कां नाहीं घेऊन जात ? ”

“ पण आम्हांला कुठें बादशहांना खूष करायचें आहे ? आम्हांला पैसा जास्तींत जास्त पाहिजे आहे. आपणाला अथर्ववेद झेपत नसेल, तर याज्ञवल्क्यस्मृति आहे. निंमी किंमत. बोला. टाका ठरवून. ”

“ काय घेणार त्या ग्रंथाचें ? ”

“ दहा हजार मोहोरा. ”

“ नाहीं झेपणार हा देखील सौदा ! ”

“ मग किती झेपतील ! ”

“ फार तर हजार मोहोरा. ”

“ अच्छा ! आपल्याकडे आलों हीच मोठी चूक झाली. निरोप आपणाला कळविलाच आहे. आमचा सौदा ठरतो आहे तिकडेच ठरविणें बरें. ”

“ कोणाकडे ठरतो आहे ? ”

बदाउनींचें नांव ऐकून मुबारिक ईर्षेस चढेल असें त्याला वाटलें होतें. पण तसें कांहीं झालें नाहीं, हें पाहून त्यानें दुसरें नांव पुढें करण्याचें ठरविलें.

“ कोणाकडे ठरतो आहे तुमचा सौदा ? ” शेखसाहेबांनीं उत्तरास वेळ लागलेला पाहून पुन्हां विचारलें.

“ नांव कशाला सांगायचें ? ” त्यांची उत्सुकता वाढविण्याकरिता शिवशर्म्यानें जरासें चंद्रबळ आणलें.

“ नका सांगूं सांगायचें नसलें तर. पण मला नाहीं खरें वाटत एवढ्या जबर रकमा देऊन कोणी आपल्याकडचीं जीर्ण पानें घेईल असें. ”

“ तीं जीर्ण पानें काय मोलाचीं आहेत हें समजेल, तोच किंमत द्यायला तयार होईल. ”

“ झालें. आम्हीं आतांच सांगून टाकतों कीं आम्हांला मोल पारखण्याची अदमतच नाहीं म्हणून. ”

“ असें काय बरें करतां शेखसाहेब ! आतां तुमची खात्री पटवायची म्हणजे खरी गोष्ट सांगितलीच पाहिजे. आमच्याकडचे मिळतील तितके ग्रंथ घ्यावयास जे गृहस्थ तयार झाले आहेत, त्यांचें नांव–” शिवशर्मा थांबला.

“ त्यांचें नांव ? ” शेखसाहेबांनीं विचारलें.

“ हाजी इब्राहिम शिरहिंदी. ”

“ हाजी इब्राहिम शिरहिंदी ? ” शेखसाहेबांनीं आश्चर्यानें विचारलें.

“ ते आपणाला इतकी रक्कम द्यायला तयार झाले ? ”

“ हो ! हो ! ”

" बरें आहे. पण त्यांच्याकडे इतका पैसा कोठून आला ? मोठें नवल वाटतें बुबा ! "

" अहो कोठून आला ? वस्तूची किंमत जाणणारा पाहिजे. " हे शब्द ऐकून शेखसाहेबांना थोडेंसें हंसू आलें. त्यांनीं शेवटीं विचारलें—

" याज्ञवल्क्यस्मृतीची नक्की किंमत कळेल कां ? "

" पांच हजारांत एकही मोहोर कमी नाहीं घेणार ? "

" पण शास्त्रीजींना विचारून तर या ना ? "

" आतां मला एव्हां दिल्लीला जायचें नाहीं. मला आतां काशीला जाऊन यायचें आहे, आणि मथुरेलाही पण एकवार जाऊन आलें पाहिजे. "

" तर मग हा सौदा पटवाल तर बरें ? "

" पुनः लवकरच भेटतो. "

" ठीक आहे. "

" आणखी कांहीं ग्रंथ मिळाले तर आणूं कां ? "

" अवश्य, अगदीं जरूर. "

आपला सौदा पटणार हें त्याला कळून चुकलें होतें. तो तेथून निघाला आणि एका देवालयाकडे जाऊं लागला. त्या दिवशींचा मुक्काम आग्र्यांतच काढून तो पुन्हां मथुरेला जाणार होता. पण आपल्या उतरलेल्या स्थळीं जाऊन पहातो तों तेथें दोनतीन बैरागी बसलेले त्याला दिसले. त्या बैराग्यांकडे पाहून त्याला पुढें जाऊन त्यांची विचारपूस करावीशी वाटली. कारण प्रवासास कोणी सोबतीस मिळाल्यास त्याला पाहिजे होतें. शिवाय शेखमुबारिकनें आज बोलतां बोलतां त्याला आपल्यावर उपकार करणाऱ्या बैराग्याची गोष्ट सांगून त्याच्या खाणाखुणाही सांगितलेल्या होत्या. शिवशर्मा तोच बैरागी या देवळांत असेल असें समजून पुढें गेला. पण त्या खाणाखुणांचा बैरागी त्यास तेथें दिसला नाहीं. तथापि त्यांतील एका बैराग्यानें खुणेनें त्याला जवळ बोलाविलें. शिवशर्मा पुढें गेला. तेव्हां त्या बैराग्यानें शहराबाहेरच्या धर्मशाळेंत एक स्वार तुमची वाट पहात बसला आहे असें त्यास सांगितलें. ही धर्मशाळा शिवशर्म्याच्या चांगली परिचयाची होती. तथापि तिकडे जाण्यापूर्वी शिवशर्म्यानें त्या बैराग्यास आणखी कांहीं प्रश्न आपली शंका निवृत्ति करून घेण्याकरितां विचारलें—

" स्वार मुसलमान आहे कीं हिंदु ? "

" मुसलमान. "

" एकटाच आहे म्हणतां ? "

" हो एकटाच. तो आतांच या वाटेनें पुढें गेला. त्यानें तुम्हांला कदाचित् पाहिलेंही असावें. त्यानेंच तुमच्या कपड्यांच्या व चेहेरेपट्टीच्या खुणा आम्हाला सांगितल्या म्हणून तर तुम्हाला चटकन् ओळखतां आलें. शिवशर्म्याला तरी हीच शंका आली

होती. तो स्वार आपल्यालाच शोधतो आहे यावरून हा संशय त्याला आलाच होता, पण तो आतां फिटला. तरी अधिक खात्री करून घेण्यासाठीं तो म्हणाला—

" मला म्हणजे कोणाला ? माझें नांव सांगितलें कां त्यानें ? "

" तुमचें नांव शिवशर्माच ना ? "

" होय "

आतां शिवशर्म्याची पुरी खात्री होऊन गेली. तो गांवाबाहेरच्या धर्मशाळेकडे जावयास निघाला. आतां बरीच संध्याकाळ होत आली होती. धर्मशाळेच्या अलीकडे आणखी एक लहानसें देवालय लागत होतें. याचा देखील उपयोग धर्मशाळेप्रमाणेंच करण्यांत येत असे. हीं देवालयें जीर्ण होत आलीं होतीं. पण यांचा जीर्णोद्धार करण्याचें कोणाच्याहि मनांत येत नव्हतें. पुढें औरंगजेबाच्या कारकीर्दींत तर हीं देवालयें जमीनदोस्त होऊन त्या ठिकाणीं कबरी अथवा उजाड मैदान झालें.

या देवालयांत विश्रांति घेत आणखी कांहीं बैरागी व कांहीं पांथस्थ यात्रेकरू बसले होते. त्या बैराग्यांनींहि शिवशर्म्याला बोलाविलें. आणखी कांहीं नवीन बातमी समजते कीं काय हे ऐकण्यासाठीं शिवशर्मा पुढें गेला. तेथेंहि त्याला तोच निरोप कळला. आपणाला हा ठिकठिकाणीं निरोप ठेवून जाणारा स्वार कोण आहे, तें पाहण्याची त्याला फार उत्सुकता झाली. पण ते पांथस्थ मात्र त्या बैराग्यांच्या व शिवशर्म्याच्या भाषणाकडे लक्षपूर्वक कान देऊन ऐकत होते.

शिवशर्मा आतां परत जाण्यासाठीं मागें फिरणार, तोंच त्या पांथस्थ यात्रेकरूंनीं एकमेकांस डोळ्यांची इशारत दिली, व त्यांच्यापैकीं एकानें त्याचें नांव घेऊन हांक मारली व शिवशर्म्यास जवळ बोलाविलें. आतां शिवशर्म्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. तो पुढें गेला. यात्रेकरूंनीं त्यास बसावयास सांगितलें. पण आतां शिवशर्मा तेथें बसावयास तयार होईना. त्या पांथस्थांमधील एका इसमाची त्याला ओळख पटतांच तो बसावयास तयार होईना. तो तेथून लगबगीनें जाऊं लागला. पण त्यास आतां जाऊं देतो कोण ?

त्यांतल्या एक जणानें त्याला हाताला धरून खालीं बसवलें. त्याबरोबर शिवशर्म्याची घाबरगुंडी उडाली. आतां आपली धडगत लागत नाहीं हें त्यास पुरें कळून चुकलें. हे यात्रेकरू आतां आपणास जिवंतपणीं जाऊं देत नाहींत असें त्यास वाटलें. तो आतां त्यांची सोडण्याविषयीं प्रार्थना करूं लागला. दुसऱ्या बाजूस बसलेल्या बैराग्यांस या चमत्काराचें मोठें नवल वाटलें. हा काय प्रकार आहे ? हे यात्रेकरू कोण ? हा शिवशर्मा कोण ? तो मुसमान स्वार कोण ? आणि आतां ही मारामारी कशासाठीं ? बैराग्यांना वाटलें आपण येथून उठून चालतें व्हावें. पण इतक्यांत त्यांची मारामारी हातघाईवर आली. त्या पांथस्थांपैकीं एकानें शिवशर्म्यास पकडून त्याची कणीक तिंबण्यास सुरुवात केली. पण त्याच्या बरोबरचे ते लोक ऐकत नाहींत असें पाहून शेवटीं तो त्या बैराग्यांच्या पायां पडूं लागला. त्या बैराग्यांना शिवशर्म्याला

सोडविण्याची खटपट करावी कीं काय हा प्रश्न पडला. न जाणों तो त्यांचा पूर्वीचा अपराधी असल्यास आपण उगाच मध्यें कां म्हणून पडावें ? असाच विचार त्यांनींहि केला व ते आपल्या जागीं स्वस्थ बसले.

इकडे शिवशर्म्याला आतां आपण ठार मरतों असें वाटून त्यानें बोंबाबोंब उडवून दिली. इतक्यांत आपल्या मागून येणारा शिवशर्मा निरोप ठेवलें असून अझून कसा येत नाहीं हें पाहण्यासाठीं म्हणून तो स्वार मागें वळून तेथें आला. तेथें चालविलेला प्रकार पाहून तर त्याला आश्चर्य वाटलें व वाईटही वाटलें. तो घोड्यावरून उतरून देवळांत शिरणार व शिवशर्म्याबद्दल रदबदली करणार—तोंच सर्व यात्रेकरू असे बैरागी एकजुटीनें उठले आणि त्यांनीं त्या मुसलमान स्वारास देवळाच्या आंत पाऊल टाकण्यास मज्जाव केला.

" हो हो ! मी मुसलमान नव्हे कां ? हिंदूंच्या देवळांत शिरतां येणार नाहीं तर ! " असले चमत्कारिक उद्गार काढून तो आपोआपच मागें सरकला. या चमत्कारामुळें शिवशर्म्याच्या पाठीवरील आघात होण्याचें आतां बंद पडलें होतें. तथापि त्याच्या तोंडांत कोंबलेला बोळा अद्याप काढला नव्हता.

हिंदूंच्या देवळांत शिरून भ्रष्टाकार मांडण्याच्या कृत्याबद्दल त्याच्यावर तोंडसुख घेण्याच्या कामांत बरेच जणांनीं सुरवातही केली होती, पण त्याच्या ठिकाणचें तें अनपेक्षित सौजन्य पाहून सर्वांनाच नवल वाटलें. शिवशर्म्याला तर तो केवळ प्राणदाताच वाटला. अकबर बादशहाच्या शासनाचा हा इतका परिणाम झाला असेल काय ? प्रजेला धार्मिक स्वातंत्र्य देणाऱ्या बादशहाच्या शासनामुळें मुसलमान शिपाई देखील इतके परधर्मसहिष्णु झाले काय ? त्या देवालयांतील प्रौढ व वयस्क अशा लोकांनीं इतरांस चूप बसण्यास इषारा दिला व त्या स्वाराला काय बोलावयाचें आहे, तें आपण ऐकून घेऊं असें ठरविलें. तो स्वारही देवालयाच्या एका धक्क्यावर बसला आणि त्या शिवशर्म्यास आपल्या स्वाधीन करण्यास तो सांगूं लागला. आतां तीं बैरागी मंडळीच त्या तंट्यांत लवादपणा करणार होती. लवादपणा म्हणजे लबाडपणा हें समीकरण त्यावेळीं प्रचारांत आलें नव्हतें. शिवशर्म्याच्या बाजूला तो मुसलमान स्वार होता व दुसऱ्या बाजूला ते पांथस्थ यात्रेकरू होते; आणि बैराग्यांचा म्होरक्या न्यायाधीश झाला होता. त्या बैरागी न्यायाधिशापुढें दोन्हीं पक्षांनीं आपापली बाजू मांडावयाची ठरवून त्यांचा निकाल मान्य करण्याचेंही कबूल केलें. लगेच न्यायनिवाड्यासही सुरवात झाली.

शिवशर्मा आपल्या नशिबाचा कांटा कोणत्या बाजूस झुकतो हें निराशापूर्ण नेत्रांनीं पाहूं लागला !

# प्रकरण सातवें.

## न्यायमनसुब्याचा निकाल !

तें कोर्ट लबाड नव्हतें. पक्षकारांशीं कोर्टाचा कोणत्याहि प्रकारचा खाजगी संबंध नव्हता. उभयपक्षांपैकीं एकाशींहि त्या बैराग्याच्या हितानाहिताचा संबंध नव्हता. त्याची न्यायदानाच्या अगोदर " समजावणी " अथवा " अगाऊ ओळख " अशी झाली नव्हती. इतकेंच नव्हें, तर ते दोन पक्ष कोठले कोण आणि न्यायाधीश कोठले कोण यांचाहि परस्परांस मागमूस नव्हता. मग या लवादांत लबाडी कोठून उत्पन्न होणार आणि ती कशाकरितां ?

यात्रेकरू म्हणाला—" या शिवशर्म्यानें माझी मोठीच चोरी केली आहे, इतकेंच नव्हे, तर हा साऱ्या हिंदू लोकांची चोरी करीत आहे. शिवाय याचे साथीदार हे मुसलमान आहेत. यावरून माझी सर्व जणांची पुराव्यानिशीं खात्री पटवून देण्याची तयारी आहे तथापि हे सज्जन वृत्तीचे मुसलमान गृहस्थ इथें आहेत. त्यांच्या मनाला वाईट वाटेल, म्हणूनच मी त्यांच्या देखत या शिवशर्म्याचीं कृष्णकारस्थानें तुम्हांला उघडपणें सांगत नाहीं. मी देवाची शपथ वाहून सांगतों कीं, यानें माझी चोरी केली आहे. यासाठीं मी आतां याला आपल्या गांवीं घेऊन जाणार. "

" तुमचा गांव कोणता ? " वैराग्यानें विचारलें.

" काशी क्षेत्र. "

" इतक्या लांब तुम्ही याला कसा घेऊन जाणार ? "

" आम्ही इतके जण आहोंत. जाऊं घेऊन मुसक्या बांधून. नाहीं तर त्यानें निमूटपणें आमच्याबरोबर यावें. "

" पण त्यानें चोरी कसली केली हें नाहीं तुम्हीं सांगितलें ? "

" तें या गृहस्थांदेखत सांगतां येणार नाहीं. " तो त्या मुसलमान स्वाराकडे संशयित मुद्रेनें पहात म्हणाला.

" पण कशाला ? आम्ही सांगतों ना ? यानें चोरी खरोखरच केली आहे. चोरी करून चोरीचा माल दुसऱ्यास फसवून विकावयाचा हा याचा धंदाच बनलेला आहे. याला तुम्ही सोडलेंत तर मग आमचा नाइलाज आहे. हा ईश्वराच्या घरीं अन्याय होणार आहे. आम्ही आज फार दिवस याच्या शोधांत होतों. आज हा अनायासें

ईश्वरीइच्छेनेंच आमच्या हातांत सांपडला आहे. याला आपण कोणती शिक्षा द्यावयाची तेवढेंच सांगा म्हणजे झालें. ”

“ ठीक! पण शिपाईबुवा! तुम्हीं या चोराला कां पाठीशीं घालतां आहांत? तो चोरीचा माल तुम्हांलाच तर उठवायचा नसेल ना? ”

“ नाहीं. माझीहि यानें चोरी केली आहे. तेव्हां याला शिक्षा व्हावी अशीच माझीहि इच्छा आहे. पण याला माझ्या स्वाधीन फक्त आजची रात्र करावें. उद्यां मी याला पाहिजे तर याच ठिकाणीं सोडून जाईन. माझ्या चोरीबद्दल शिक्षा करणें न करणें माझ्या मर्जीवर राहील. तें मी पंचांपुढें मांडीत नाहीं. उद्यां मात्र मी याला या देवळांत याच ठिकाणीं तुमच्या सर्वांच्या स्वाधीन करून निघून जाईन, हें अल्लाची शपथ घेऊन सांगतों. ”

आतांपर्यंतच्या प्रामाणिक व धर्मशील वर्तनावरून त्याच्याविषयीं आदरबुद्धि तेथील सर्वांच्या मनांत जागृत झाली होती. त्याच्या शपथक्रियेवर सर्वांचा विश्वास बसला आणि न्यायाधीशांनीं कैद्याला मुसलमान स्वाराच्या ताब्यांत एक रात्र राहूं देऊन दुसऱ्या दिवशीं न्यायकचेरींत—देवाल्यांत हजर करण्याचा हुकूम फर्माविला! झालें, त्या पांथस्थास फार वाईट वाटलें. शिवशर्म्यास घेऊन तो मुसलमान स्वार शहराबाहेरील धर्मशाळेच्या वाटेनें जावयास निघाला. दुसऱ्या दिवशींच न्यायनिवाडा झाल्याशिवाय आतां त्या बैराग्यांना अथवा त्या यात्रेकरूंना जावयाचें नव्हतें. म्हणून त्यांनीं एक दिवस तेथेंच राहण्याचा निश्चय केला.

तो मुसलमान स्वार शिवशर्म्याला घेऊन भलत्याच वाटेनें दूर दूर जाऊं लागला. रात्र काळोखी होती. धर्मशाळेकडची वाट ही नव्हे इतकें शिवशर्म्यास तेव्हांच कळून आलें. आपण चाललों आहों तो शत्रूबरोबर कीं मित्राबरोबर हेंहि त्याला उमगेना. शत्रू म्हणावा, तर त्यानें अगत्यपूर्वक आपल्याला बोलावलें असून तो आपली वाट पहात पुन्हां मागें आला, त्या अर्थीं कांहींतरी महत्त्वाचें कामकाज असलें पाहिजे असें त्याला स्वाभाविकपणेंच वाटलें. शिवाय मारामारीच्या संकटांतून त्यानें त्याला सोडवून घेतलें होतें आणि आतांपर्यंतचें त्याचें वर्तन देखील आदरभाव उत्पन्न करण्यासारखें होतें. शिवाय कोणातरी दरबारी सरदारानें एखाद्या संस्कृत पोथीच्या बाबतींत कांहीं गुप्त निरोप पाठविण्याचाहि संभव होता. या इतक्या गोष्टींवरून तो स्वार शिवशर्म्याला आपला मित्र असावासा वाटे. पण तो आपल्याला धर्मशाळेकडे न्यावयाचें सोडून अशा अपरात्रीं भलतीकडेच घेऊन जात आहे, आणि आपल्यालाहि त्यानें मघांशीं स्वतःच्या ताब्यांत घेण्यासाठीं चोर ठरविलें आहे. ही तर साफ खोटी गोष्ट. याची चोरी आपण जन्मांत कधीं केली नाहीं असें असून आपणाला चोर ठरवून हा आपल्याला आपल्याबरोबर घेऊन चालला आहे तो कशाकरितां म्हणून? पण आतां त्याला झुकांडी देऊन पळून जाणेंहि शिवशर्म्याला शक्य नव्हतें. तो मुकाट्यानें त्या स्वाराच्या बरोबर चालला होता. स्वार आतां अगदीं सावकाशपणें आपला घोडा

चालवीत होता. दोघेहि आपापल्या मनांत निरनिराळे बेत आणि विचार करीत होते. शेवटीं तो स्वार शिवशर्म्यास मागें वळून म्हणाला—

" आपला मुक्काम आतां अगदीं जवळ आला. "

" पण ती धर्मशाळा कोठें आहे? "

" धर्मशाळा मागें राहिली! "

" तर मग त्या यात्रेकरूंच्या स्वाधीन झालों असतों तर अधिक बरें झालें असतें म्हणावयाचें? "

" नाहीं! तुमची शंका व्यर्थ आहे. तुम्ही आपल्या एका हितचिंतकाबरोबर चाललां असून अगदीं निर्भय आहांत. कसलीहि धास्ती बाळगूं नका. "

" कशावरून? "

" आत्तांच अनुभवाला येईल. "

" तोंच त्या निबिड अंधःकारांत त्याला माणसाचें खोकणें ऐकूं आलें. ते आतां एका मोठ्या दरडीजवळ आले होते. दरडीजवळच्या झाडकांत दोन घोडीं होतीं. या मुसलमान स्वारानेंहि आपला घोडा त्याच झाडकांत बांधला, आणि तो शिवशर्म्याला घेऊन एका गुहेंत शिरला. बिचाऱ्या शिवशर्म्याला त्या काळ्याकुट्ट अंधःकारांत कांहीं एक दिसत नव्हतें. अगोदरच मार खाऊन तो हतबल झाला होता. चालतां चालतां त्याला दुखापतीहि होत होत्या. तरी घडणाऱ्या अद्भुत प्रकाराकडे त्याचें लक्ष इतकें वेधलें होतें कीं, शरीरदुःखाचाहि त्याला पूर्ण विसर पडला होता.

खूपसें अंतर आंत गेल्यावर त्याला आंत एक दालन लागलें. त्यांत एक लहानसा दिवा मिणमिण जळत होता. तेथें त्या मुसलमान स्वारासारखेच दोघे जण बसले होते व एक योगी धुणी पेटवून बसला होता. त्या योग्याची समाधि लागली होती. त्यांचा समाधिभंग होऊं नये म्हणून ते सर्व कसलाहि आवाज होऊं न देण्यासाठीं काळजी घेत होते. ते सर्व पुन्हा जरा अलीकडे आले. त्यांनीं शिवशर्म्याला थोडीं फलमुळें खावयाला दिलीं व स्वच्छ पाणी प्यायला दिलें. इतकें झाल्यावर त्या मुसलमान स्वारानें आपला सर्व पोषाख बदलला आणि तो आपल्या बाकीच्या सोबत्यांसह फराळास बसला.

खाणें आटोपल्यावर त्यानें शिवशर्म्याशीं बोलावयास सुरुवात केली.

" मी मुसलमान नसून हिंदू आहे हें आतां आपणांस समजलेंच असेल. "

शिवशर्मा लक्षपूर्वक ऐकत होता.

" तुम्हीं त्या विश्वंभरशास्त्र्यास मिलाफ होऊन हिंदूंचे धर्मग्रंथ मुसलमान लोकांस विकून टाकीत आहांत हेंहि आम्हां सर्वांला ठाऊक आहे. "

शिवशर्म्याचे पाय लटलटूं लागले!

" त्या मठांत अलबते गलबते लोक जमवून अस्सल ग्रंथांच्या नकला काढून

तुम्ही त्यांची विक्री मांडली आहे, हा तुम्ही फार मोठा गुन्हा करीत आहांत."

आपली आतां पुरी कंबख्ती भरली याविषयीं शिवशर्म्यास आतां शंकाहि राहिली नाहीं.

"या गुन्ह्याबद्दल तुम्हांला शासन करणें हें कांहीं अवघड नाहीं, पण तुमच्या गुन्ह्याची तुम्हांला समजूत देऊन एकवार आपली वर्तणूक सुधारण्यास तुम्हांला संधि द्यावी असें आमच्या मालकांचें आम्हांस सांगणें आहे. यासाठींच या खेपेस तुम्हांला शासन न करण्याचें ठरविलें आहे, आणि म्हणूनच तसें वचन तुम्हाला मघाशीं देण्यांत आलें आहे. शिवाय आज मी तुम्हांला अभय देऊन विश्वासानें बोलावून आणलें आहे."

शिवशर्म्याच्या जिवांत जीव आला. ब्रह्मांडांत गेलेला त्याचा प्राण आतां खालीं उतरला. त्यानें त्या स्वाराला दोन्ही हात जोडले. त्याचे ओठ हालूं लागले. भीतीनें त्याची दांतखिळी बसली होती.

"बोला, बोला ! तुम्हांला काय बोलावयाचें असेल तें बोला."

"मी सगळेच कांहीं अस्सल ग्रंथ विकले नाहींत."

"तर मग ?"

"कांहीं ग्रंथ खरेच होते. पण कांहीं तर अर्थशून्य चोपडीं जुन्या अक्षरासारखेंच गिचबटून त्यांना जुन्या ग्रंथांचें स्वरूप आम्ही एका विशिष्ट कृतीनें देत असतों; आणि मग ते जुने पुराणे अस्सल ग्रंथ म्हणून जबर किंमतीला विकतों."

"हें खरें कशावरून ?"

"आपणांला पाहिजे तशी खात्री करून द्यायला माझी तयारी आहे."

"ज्यानें तुम्हांला आज देवळांत मार दिला तो काशीचाच ब्राह्मण, होय ना ?"

शिवशर्मा चूप राहिला.

"तुम्ही त्याचा एक ग्रंथ लपविला आहे, खरें ना ?" यावर ब्राह्मण बोलेना.

"काशींतील व इतर क्षेत्रांतील ब्राह्मण तुम्हांला या पातकासाठीं खरपूस शिक्षा द्यायला तयार झाले आहेत. तुम्ही सर्व ब्राह्मणकुलांचा घोर अपराध केला असून हिंदुधर्माचा अन्याय केला आहे. याचें प्रायश्चित्त तुम्हांला आज ना उद्यां भोगावेंच लागणार."

शिवशर्मा थरथर कांपूं लागला.

"या सर्व गोष्टींचें परिमार्जन करायला तुम्हांला संधि द्यायचा माझा विचार आहे. तुम्हांला या संधीचा सदुपयोग करून घ्यायचा आहे काय ?"

"पण मी कोणासमोर उभा आहें ?"

"तें आपोआपच समजणार आहे. अगोदर माझ्या प्रश्नाचें उत्तर द्या. तुम्हांला पश्चात्ताप होत आहे काय ?"

"होय."

" तर मग तुम्ही आतांपासून पवित्र धर्मग्रंथ आणून विकण्याचा कारखाना बंद केला पाहिजे. तुम्ही म्हणाल कीं कांहीं ग्रंथ निवळ बनावट असतात म्हणून. पण विश्वासानें एकादी वस्तु खरेदी करणारास फसवणें हें देखील कुकर्मच आहे. "

" हूं. "

" दिल्लीला विजयोत्सव चालला आहे, त्यांत तोडरमल्लाचा कसकसा दर्जा वाढला ती माहिती आम्हांला पाहिजे आहे, "

" ती मी मला ठाऊक असेल तेवढी आतां सांगून टाकतों. "

" शिवाय मेवाडवर पुनः मोंगल सैन्य जावयाचें आहे कीं काय याचीहि माहिती आम्हांला पाहिजे व ती वेळच्या वेळीं आम्हांला दिली पाहिजे. "

" कोणाकडे ? "

" आम्हीं आतां सांगूं त्याच्याकडे. "

" ठीक आहे. "

" या सर्व गोष्टी तुम्हाला कबूल असतील, तर या शिवलिंगावर हात ठेवून शपथ घ्या. ही शिवपिंडिका आहे. "

शिवशर्म्याचा हात शपथेसाठीं पुढें सरेना. तेथल्या दुसऱ्या एका माणसानें आपली तरवार म्यानांतून बाहेर काढली. शिवशर्म्याकडे शस्त्र नव्हतें असें नाहीं. पण त्याचा उपयोग तो धूर्तपणेंच करीत असे. त्या काळीं शस्त्राशिवाय फिरणें मुष्किलीचें असे. आणि प्रजेला शस्त्रहीन करण्याचा कायदाहि पण त्या काळीं कोणी बादशहानें पास केला नव्हता ! तरवारीचा आवाज ऐकून शिवशर्म्याचा हात शपथक्रियेसाठीं हळूहळू पुढें येऊं लागला.

" काय बेत आहे तुमचा ? " स्वारानें दरडावून विचारलें.

" कबूल आहे तुमचें म्हणणें मला "

" मग शपथ को करीत नाहीं ? "

" पूर्वी ठरविलेले करार आतां कसे मोडावे ! "

" पण त्याच्यानंतर आतांपासून नवीन करार कोणत्याहि ग्रंथ–विक्रीचा करावयाचा नाहीं. "

" हें कबूल आहे मला. "

" चला तर आतां आम्हांला दिल्लीच्या बातम्या दिल्लींत आणि इतर ठिकाणीं कोणाकोणाकडे कसकशा पोंचवायच्या त्या सांगतों. "

असें म्हणून तो स्वार त्याला दुसरीकडे घेऊन जाऊं लागला. पण शिवशर्म्याला दुसऱ्या दिवशींची भीति होतीच.

" उद्यां आम्हांला तुम्ही पुनः त्या देवळांत त्या लोकांच्या स्वाधीन करणार आहांत त्याचें काय ? "

" त्याची नको तुम्हाला काळजी. "

" म्हणजे ? "

" ती सर्व व्यवस्था मी पाहीन. तुमच्या केंसालाही धक्का पोंचणार नाहीं.

असें म्हणून ते बाजूस सरले.

पण आंत काय प्रकार चालला होता ? त्यांच्यापैकीं एक मनुष्य त्या योग्याच्या समोर बसला होता व त्या योगिराजांची समाधि केव्हां उतरते तें पाहात होता. थोड्या वेळानें योगिमहाराज आंग हालवूं लागले. त्यांचा श्वास आतां जोरानें चालूं लागला. समोर बसलेल्या माणसानें त्याला भक्तिपूर्वक नमस्कार केला.

" तुमचा प्रवास सुखकर होईल, पण शेवटीं मात्र संकट येणार. "

" आणि चालू युद्धाचा अंत करून—"

" ह्या युद्धाचा अंत यावेळीं होणार नाहीं. "

" मग ? "

" हें युद्ध असेंच अनेक वर्षें चालावयाचें आहे. "

" पण आमचें स्वातंत्र्य—"

" तुम्ही स्वतंत्रच रहाल, तुमचें स्वातंत्र्य नष्ट होणार नाहीं. "

" तर मग आम्हांला जय मिळणार ? "

" नाहीं, असेंहि दिसत नाहीं ? "

" असें-कसें ? "

" उदेसिंहाचें स्वातंत्र्य नष्ट होणार नाहीं. एवढ्यांतच काय तें समजा. "

" हरकत नाहीं. आतां आम्ही उद्यां मार्गाला लागतों. आज रात्रौ आतांच आम्ही बाहेर पडणार. कारण आम्ही एका ब्राह्मणाला धरून आणला आहे. सकाळ-पर्यंत येथें राहिल्यास आपल्या या जागेचा शोध दुसऱ्या लोकांस लागण्याचा संभव आहे. त्यामुळें आपणांला त्रास होईल. यासाठीं त्याला आतांच येथून हालवला पाहिजे. धर्मशाळेंत जाऊन सर्वच राहूं म्हणजे झालें. "

योगी महाराजांनीं परवानगी दिली. इतक्यांत तो आपल्या परिचयाचा स्वार आणि शिवशर्मा हेहि तेथें आले. सर्वांनीं श्रीयोगीमहाराजांस नमस्कार करून आशी-र्वाद घेतला आणि गुहेच्या बाहेर पडले. त्या स्वारानें शिवशर्म्याला आपल्याबरोबर आपल्या घोड्यावर घेतला आणि तिघे जण तीन दिशांस पांगले. बाहेर सर्व निबिड काळोख होता. स्वार शिवशर्म्याला घेऊन धर्मशाळेकडे चालला होता.

त्या काळोखांत वाट, दिशा, भूभाग, कांहींच दिसत नव्हतें. थोड्या वेळानें ते दोघे धर्मशाळेंत येऊन पोंचले. त्यांना उतरून थोडासा वेळ होत आहे, तोंच दुस-रेहि दोघे तेथें आले. सर्वांनीं आपापला गाशा आंथरून तेथें झोपल्याचें सोंग केलें. कारण झोप घेण्याइतका त्यांना अवकाश नव्हता. एक तासभर विश्रांति घेतल्यावर शिवशर्मा व त्याच्याबरोबरचा स्वार धर्मशाळेंतच राहिला. पण दुसरे दोघे असामी धर्म-शाळा सोडून केव्हांच निघून गेले होते. जातांना त्या तिघांची कसलीशी कुजबुजणी

चालली होती. पण शिवशर्म्याला खरोखरच झोप लागली असेल काय ? त्याला आज पुरी अद्दल घडली होती.

आतां उजाडल्यावर आपली गत काय होणार आहे ? हे तिघे इसम बरोबरच निघाले असतां दोघेजण कोठें गेले ? आणि ह्या तिसऱ्यानें त्यांच्या कानांत काय सांगितलें ? तो सगळा मजकूर आपल्याचबद्दल असेल काय ? असे अनेक विचार त्याच्या मनांत येत राहिले होते.

त्यानें आपल्या शेजारीं कोण लोक आहेत हें पाहण्याचा प्रयत्न केला. इतक्यांत त्यांतील एकजण जागा होऊन त्यानें गोळा केलेला ताडकडबा पेटवून शेगोटी बनविण्यास आरंभ केला. आणखीहि कांहीं मंडळी उठून थंडीच्या निवारणासाठीं त्या बाजूस जाऊं लागलीं. त्या प्रकाशांत शिवशर्म्यास लोकांची टेहळणी करण्यापुरती संधि मिळाली ! पण दैवाची गति विचित्र हेंच तत्त्व याहि ठिकाणीं पुनरपि पटलें.

शिवशर्मा धर्मशाळेंतील लोकांची टेहळणी करण्यासाठीं म्हणून निजल्याजागींच उठून बसला. पण आतां हळूहळू जागे झालेल्या एकादोघां गृहस्थांनीं त्यालाच उलटा टेहळला. त्यांतच देवळांतल्या यात्रेकरूंपैकीं कांहीं लोक होते !

त्यांना पाहून शिवशर्मा घाबरला. पण बरोबरच्या स्वारानें त्या लोकांसमोर जाऊन सांगितलें कीं याला मी उजाडल्यानंतर तुमच्या स्वाधीन करणार आहें. त्यानंतर तुम्ही त्याचा न्यायनिवाडा करावा. तोंपर्यंत तो माझा माणूस आहे.

हें बोलणें आधल्या दिवशींच्या कराराप्रमाणें रास्त होतें. त्यांना तें कबूल करणें भागच पडलें. तो स्वार फिरून म्हणाला " सूर्य उगवून किरण पडल्यावर मी येईन, तोंपर्यंत या शिवशर्म्याच्या केंसालाहि तुम्ही धक्का लावतां कामा नये. "

इतकें म्हणून तो तेथून निघाला आणि काळोखांत कोठल्या कोठेंच नाहींसा झाला. हा प्रकार पाहून शिवशर्मा मात्र पुन्हा फिकीरींत पडला. आपल्या नशिबाचे कसकसे धिंडवडे निघणार आहेत हें न समजून कपाळावर हात घेऊन तो सचिंत बसला.

त्या स्वारानें शिवशर्म्यास सोडविण्याचा बेत अद्यापपर्यंत रचला नव्हता. त्याला कसा सोडवावा हा त्याच्याहीपुढें मोठा प्रश्न होता. शिवशर्मा आपल्या शब्दाला जागून सुधारला तर तो त्याला त्याच्या राजकारणाच्या मदतीसाठीं त्याला पाहिजे होता. म्हणूनच त्याला वांचविण्याची त्यानें एक शक्कल योजिली. ती डोक्यांत येतांच त्यानें एकदम आपला घोडा उडवीत काळोख कापीत तो शहराच्या वाटेनें अदृश्य झाला.

त्याच्याकडे पाहात सर्वजण आश्चर्य करूं लागले होते. दिवस वर येतांच त्या पांथस्थांनीं त्याला ताब्यांत घेतला आणि तें लटांबर देवालयाकडे निघालें. रात्रीं देवालयांत न राहतां कांहीं माणसें मुद्दामच धर्मशाळेंत आलीं होतीं. वचनाप्रमाणें त्यांनीं शिवशर्म्याला सवड दिली. पण आतां ते त्याला घेऊन देवालयांत आले.

आधल्या दिवसाप्रमाणें न्यायकचेरी तिथें तयार होतीच. लगेच न्याय मनसुब्यास सुरवात झाली. आतां शिवशर्म्याच्या नशिबांत काय लिहिलें आहे हें समजणार होतें. पण तो स्वार कोठें गेला ?

---

# प्रकरण आठवें.

## " कायानो रंग काचो रे ! "

त्या देवळांत शिवशर्म्याच्या न्यायमनसुब्याला सुरुवात झाली आणि शिवशर्मा त्या यात्रेकरूंचा म्हणजे काशीकर ब्राह्मणांचा अपराधी ठरला असला पाहिजे इतका तर्क आपणालाही आतांपर्यंत समजलेल्या माहितीवरून साधार करतां येईल. पण देवळांत खरोखर काय ठरलें हें पाहण्यापूर्वीं आपणाला एकवार दिल्लीकडे वळावयास मिळाल्यास बरें होईल.

दिल्लीला विजयोत्सवानिमित्त नाचरंग चाललेच होते; व पुन्हां तोडरमल्लालाच मेवाडकडे उदेसिंहावर त्याची खोडकी मोडण्यासाठीं बादशहा पाठविणार आहे, अशीहि जिकडेतिकडे दाट वदंता होती. कोणी कोणी म्हणत होते कीं बादशहा स्वतःच सैन्य घेऊन अरवलीच्या जंगलांत आश्रय घेऊन बसलेल्या सिंहाला हुसकून काढून त्याला आपल्यापुढें नमविणार आहे. खरा प्रकार काय होता तो कसा समजणार ?

फाझलला मात्र दिल्लीस गेल्यावर सरदारकी व मरातब मिळून तो दरबारचा मानकरी झाला, एवढी गोष्ट खरी. फाझलकडे " तवारीख " तयार करण्याचें व बादशहाच्या राज्यव्यवस्थेची माहिती लिहून ठेवण्याचें काम सोंपविण्यांत आलें. म्हणजे बदाउनीच्या कामाची आतां विभागणी झाली. पण इतिहास तयार करण्याचें व अन्य कांहीं धर्मसंबंधीं कामकाज बदाउनीकडे होतेंच. त्याचें महत्त्व फाझलच्या नेमणुकीमुळें कमी झालें होतें, अशांतला भाग मुळींच नाहीं. पण बदाउनीला थोडेंसें वैषम्य वाटल्याशिवाय मात्र राहिलें नाहीं. हल्लीं घडलेल्या गोष्टींमुळें शेख मुबारिकचें महत्त्व वाढल्यासारखेंच झालें होतें. शिवाय हाजी इब्राहिम शिरहिंदी हेही एकेक पाऊल पुढें टाकीत होते. या सर्वांच्याच पुढें आपणाला पल्ला मारावयाचा आहे हें बदाउनीचें ध्येय ठरलेलें होतें व त्याकरितां कोणता उपाय योजावयाचा तोही त्यानें आपल्या मनाशीं

ठरवून टाकला होता. पण त्याच्या त्या उपायाचा उपक्रम आतां बंद पडल्यासारखाच झाला होता. कारण आतां बरेच दिवस शिवशर्म्याचा ठावठिकाणा नव्हता. बदाउनीनें चौकशी जुजबी रीतीनें करून पाहिलें. शिवशर्मा आग्र्याला गेल्याचें त्याला कळलें. त्याची येण्याची वाट पहात तो आतां राहिला होता.

मध्यंतरीं चाललेल्या उत्सवांत तो भाग घेत होताच. ह्या उत्सवापैकीं एक दिवस केवळ स्त्रियांकरितां राखून ठेवलेला होता. त्यादिवशीं चोहोंबाजूंनीं बंद केलेल्या तटाच्या आंत दिल्ली नगरचा मीनाबाजार भरावयाचा होता. त्यादिवशीं सर्व स्त्रियांनींच त्याठिकाणीं जमून मौज करावयाची व कोणीहि पुरुषानें तेवढ्या तटाच्या आंत फिरकावयाचें नाहीं अशी बादशहाची सक्त ताकीद होती. या मीनाबाजाराची तयारी दिल्ली नगरांत मारे धूमधडाक्यानें चालू होती.

या दिवशीं केवळ दिल्ली शहरांतील नव्हे, तर दूरदूरच्याहि स्त्रियांनीं शक्य असल्यास या उत्सवांत सामील होण्यास हरकत नव्हती. दुकानदार, खेळाडू, व्यापारी आणि गिऱ्हाईक सर्व स्त्रियाच स्त्रिया ! त्यादिवशीं एकंदरींत अशा प्रकारची मौज उडावयाची होती.

पुष्कळ सुस्वरूप स्त्रिया त्या दिवसाची वाट मोठ्या आतुरतेनें पहात होत्या. कुरूप स्त्रियांना तो दिवस प्राणसंकटासारखा वाटत होता. कारण त्यांनीं आपलें हेंगाडी, वेडेंविद्रें स्वरूप घेऊन त्यादिवशीं हजर राहिलेंच पाहिजे, अशी जरी कोणाची सक्ति नसली, तरी घरांत स्वतःला कोंडून घेऊन त्यांना बसावें लागणार होतें. त्याच्या उलट सौंदर्यसंपन्न स्त्रियांना वाटत होतें कीं आपण आपल्या सौंदर्यानें इतर स्त्रियांना सहज लज्जित करूं शकूं. दिल्ली नगरांतल्या कारागिरांना, जवाहिऱ्यांना व व्यापाऱ्यांना कामकाज व गिऱ्हाईक भरपूर मिळालें होतें. व्यापाराला तेजी आली होती. तरुण व सुंदर स्त्रियांच्या पतींना मनांतून वाटत होतें कीं आपल्या पत्नींच्या सौंदर्यानें पराभूत झालेल्या इतर स्त्रियांचे ओशाळलेले चेहरे पहावयास मिळतील, तर केवढी बहार होईल. याठिकाणीं येणाऱ्या स्त्रिया एकाच वर्गाच्या अगर एकाच विशिष्ट पेशाच्या नव्हत्या. तर अकबर बादशहाच्या राण्यांपासून तो तहत झोंपडींतल्या एखाद्या भिकारणीलाहि त्याठिकाणीं आपल्या स्वरूपाच्या प्रदर्शनास यावयास मोकळीक होती. अर्थात् सर्व जातींच्या, सर्व धर्मांच्या, सर्व पंथांच्या, सर्व पेशांच्या, सर्व दर्जांच्या स्त्रियांना त्या दिवशीं तेथें यावयास पूर्ण मोकळीक होती. मोकळीक तरी कसली ? हक्कच होता.

ही कल्पना खुद्द बादशहाची होती. असला उत्सव अथवा हा मीनाबाजार यापूर्वीं कित्येक वेळां झालेला होता. अकबर याला "खुषरोज" म्हणत असे. त्याच्या इच्छेला प्रतिबंध करण्याची प्राज्ञा कोणाचीच नव्हती. पण त्यादिवशीं त्याठिकाणीं पुरुषाला फिरकण्याची मनाई असल्यामुळें तक्रार करण्यालाहि कोणाला जागाच नव्हती.

या ‘ खुषरोज ’ ची तयारी दिल्ली नगरांत झपाट्यानें सुरू झालेली होती. एखादे दिवशीं काम कसें काय चाललें आहे हें पाहण्यासाठीं खुद्द बादशहा देखील त्या बाजूस जात असत. सरकारी अधिकारी त्याठिकाणची व्यवस्था सर्वप्रकारें उत्तम राखण्याकरितां जिवापाड मेहनत करीत होते. ‘ खुषरोज ’ च्या मीनाबाजाराचें काम व सौंदर्य वाढविण्यासाठीं कलाकुशल लोक आपल्या चातुर्याची सीमा करीत होते. कारण या कामगिरीबद्दल कारागिरांना योग्य बक्षीसेंहि मिळावयाचीं होतीं. जो तो या मीनाबाजाराच्या कामगिरींत गढून गेलेला दिसे. बहुतेकांचा बोलण्याचा विषय आतांशा हाच एक झालेला होता. स्त्रियांच्या जीवाची तर काय मोहरी लढत होती. आपलें सौंदर्य कसें खुलून दिसेल याच्या फिकिरींत आणि तजविजींत प्रत्येक तरुण स्त्री गढून गेलेली होती. त्यावेळीं सौंदर्य वाढविण्याच्या कृत्रिम साधनांच्या जाहिराती नव्हत्या. त्याकाळीं कृत्रिम साधनांचा प्रसारही पण झालेला नव्हता. जन्मजात व ईश्वरदत्त देणगींत निसर्गजात अशा आभरणांची भर घालणें एवढेंच साधन त्या काळीं स्त्रियांच्या सौंदर्यवर्धनाच्या व्यवहारांत होतें.

“ खुषरोज ” ची तयारी जारीनें चालली होती. होतां होतां तो “ खुषरोज ” चा आनंददायक दिवस उजाडला. मीनाबाजारकडे बायकांचा समुदाय लोटूं लागला. तथापि अद्याप अमीरउमराव व बडे लोक यांच्या बायका यावयास सुरुवात झाली नव्हती. ती दुपारच्या वेळानंतर व्हावयाची होती. स्त्रियांचे खानपानादि सर्व व्यवहार याच ठिकाणीं व्हावयाचे होते म्हणून तशी व्यवस्था करण्यांत आली होती. त्यांचे इतमामाप्रमाणें निरनिराळे तंबू उभारण्यांत आले होते. या स्त्रीसमुदायांत काश्मीरी, गुजराथी, बंगाली, रजपूत, वगैरे निरनिराळ्या प्रांतांतील स्त्रियांचे निरनिराळे पेहेराव व वेषभूषांचे प्रकार पहावयास मिळत होते. या स्त्रीराज्यांत सर्वत्र आनंदीआनंद बोकाळून राहिला होता. दुःखाचा त्याठिकाणीं लवलेशही नव्हता. फुलपांखरांच्या पंखांचा चित्रविचित्र रंगीबेरंगी पोषाख, मधुकरांची मधुस्वादाभिरुचि, गुलाबाच्या व केतकीच्या पुष्पांची अंगकांति, हंसपक्ष्यांची पदविभ्रमगति, कोकिळांची स्वरमाधुरी, आणि चंडोलांचा उल्हास, इतक्यांचें मिश्रण होऊन त्या मीनाबाजारांतील मीनाक्षींचा मनमोहक मिलाफ बनला होता ! आणि त्या स्त्रिया देखील आपल्याकडे एकाही पुरुषाची वाकडी अथवा सरळ नजर फिरकत नाहीं अशा खात्रीमुळेंच स्वैरपणें स्वच्छंदविहार करीत होत्या. आपल्याकडे एक देखील पुरुषी डोळा पहात नाहीं, ही खात्री या स्त्रियांना कोणी दिली होती ? ही खातरजमा खुद्द अकबरबादशहाची होती. सम्राट् अकबरशहाचा हुकूम मोडावयास मोंगल साम्राज्यांत कोण धजणार होता ? सम्राट् अकबरशहाच्या हुकुमाचें उल्लंघन करण्याचें सामर्थ्य कोणाहि हिंदूंच्या अगर मुसलमानाच्या अंगांत नव्हतें. पण आज ह्या खुषरोजच्या मीनाबाजारकडे एकहि पुरुषी नजर फिरकत नव्हती काय ? अकबरशहाचा हा हुकूम कोणीहि खरोखर मोडला नव्हता काय ? आणि मोडला असला तर त्याला त्याबद्दल शासन

होणार नाहीं काय ? अकबरशहाचा हा हुकूम जर कोणी मोडला असेल, तर इतक्या स्त्रियांचा तो विश्वासघात नव्हता काय ?

पण हें काय ? हे प्रश्न आणि कल्पना तरी कां म्हणून उत्पन्न व्हाव्या ? पुरुषी नजरेला तिथें फिरकायला वाव तरी कोठें होता ? सभोंवार इतका कडेकोट बंदोबस्त होता कीं सूक्ष्मरूप धारण केल्याशिवाय अथवा अदृश्यरूपानें संचार करण्याची सिद्धि प्राप्त झाल्याशिवाय कोणाहि पुरुषाला त्या मीनाबाजाराच्या स्थळांची सीमा ओलांडणें शक्य नव्हतें. पण हा ' खुषरोज ' आणि ' मीनाबाजार ' सुरूं तरी कां करण्यांत आला आणि त्याचा उद्देश तरी काय होता ?

मोंगलशाहींत स्त्रियांना—बहुतेक सर्वच दर्जाच्या स्त्रियांना—गोषा होता हें काय सांगावयास पाहिजे ? अद्यापदेखील गोषाचा रिवाज असून गोषा असणें अनेक दृष्टींनीं अनिष्ट आहे असें प्रतिपादिलें जातें. अकबर जुन्या रूढींना केवळ जुनेपणासाठींच म्हणून मान तुकविणारा नव्हता. त्याला हा गोषा नसावा असें वाटत होतें कीं काय हें सांगतां येत नाहीं. पण सती जाण्याची स्त्रियांची चाल त्याला नापसंत होती, हें इतिहासांत नमूद आहे. वर्षांतून निदान एक दिवस तरी या कोंडलेल्या बंदिवानांस बाहेरची मोकळी हवा अनुभवावयास मिळावी, बाहेरचें मोकळें निळें आभाळ डोळे भरून पहावयास मिळावें, असा उदात्त हेतु अकबरशहाचा या खुषरोजच्या मीनाबाजाराच्या उपक्रमांत असणें असंभवनीय आहे काय ? हाच उदात्त हेतु अकबरशहाचा असावा असें कोणालाहि वाटल्यास नवल नाहीं. कारण अकबरशहाची राज्यव्यवस्था उदारतेच्या तत्त्वांवर आंखली गेली होती. अकबरशहानें आपल्या धार्मिक औदार्याचा प्रत्यय प्रजेला भरपूर प्रमाणांत पटवून दिला होता. अर्थात् त्याच्या हेतूविषयीं मन कलुषित होण्यास त्यावेळीं जागाच नव्हती. संध्याकाळच्या वेळीं बड्या बड्या अमीर-उमरावांच्या स्त्रिया देखील गोषांतून मीनाबाजाराच्या पटांगणांत जमूं लागल्या.

मीनाबाजाराच्या वास्तुकलेचें काम अवर्णनीय होतें. भारतदेशांत मोंगल पादशाहत स्थापन झाली या गोष्टीचा ईश्वराच्या हेतूंशीं जर संबंध जडवायचाच झाला, तर तोट्यांप्रमाणें मोंगल साम्राज्यापासून झालेले फायदेहि दाखवितां येतील. शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने मुसलमानी राजसत्तेनें पूर्वकाळीं हिंदुस्थानास दिलेले असून भारतदेशाच्या निसर्गसौंदर्यांत मानवीय सौंदर्याची भर घातली आहे. " ताज " सारखा केवळ अमूल्य असा शिरोऽलंकार हिंदुस्थानला देऊन जगांत त्याच्या मस्तकाच्या मुगुटाचा कळस डौलदार व उंच बनविला आहे. हिंदुस्थानवासी हिंदूंच्या मनांत मुसलमानी साम्राज्याबद्दलची ही कृतज्ञताबुद्धि वास्तव्य करीत होती व आहे म्हणूनच आजतागायत हिंदूंनीं प्राणापलीकडे प्रिय असलेलीं देवालयें व गाईंचीं खिल्लारें यांचा झालेला विध्वंस, डोईजड कर व धार्मिक छळ असला प्रकार आजवर सहन केला आहे. आतांच्या मुसलमानाच्या हातांत हिंदुस्थानास देण्यासारखें कांहींच नसूनही ते

जर हिंदूंना रडविण्याचा व त्यांच्या काळजास घरें पाडण्याचा तेवढाच प्रयत्न चालू ठेवतील तर तो अन्याय कितपत सहन केला जाईल, हें सांगणें कठीण आहे.

कसेंही असो, पण अकबराच्या कारकीर्दीत अनन्वित छळांचा प्रकार बोकाळला नव्हता. विद्या आणि कला यांच्या प्रसारासाठीं झटणाऱ्या बादशहांपैकीं तो एक बादशहा होता. अकबरशहा व त्याच्या मागचेपुढचे बरेवाईट बादशहा यांस राष्ट्रीयत्वाची जाणीव असून हिंदुस्थानास त्यांनीं आपलें मानलें होतें. कोणतीहि बरी व कीर्तिप्रद टिकाऊ गोष्ट करावयाची झाल्यास त्यासाठीं ते पर्शिया, तार्तरी व तुर्कस्थान या देशांत गेले नाहींत. त्यांना आपल्या उत्पत्तिस्थानाचें विस्मरण पडलें नव्हतें, पण हिंदुस्थानास ते मायभूमि मानीत होते. आजच्या मुसलमानभाईंनीं हिंदभूमीविषयीं तेंच मातृत्वाचें व हिंदूविषयीं तेंच भ्रातृत्वाचें नातें पाळलें पाहिजे. यांतच त्यांचें चिरकल्याण आहे, हें त्यांनीं कधींहि विसरतां कामा नये.

मीनाबाजाराचें स्थळ हें कुतुबमिनारप्रमाणें कायम टिकणारें नव्हतें, पण चार दिवसांच्या शोभेसाठीं उभारलेल्या त्या शिल्पकलेंत देखील अतुलनीय अशी मनोरमता होती. संध्याकाळच्या वेळीं पक्ष्यांचे थवे अंतरालांतून चालले होते; त्यांतल्याच नरांना मीनाबाजारांतील रमणी जनांकडे " जातां जातां " पहावयास संधि मिळत होती. आभाळाच्या पडद्याआडून सायंकाळीं एकेक चांदणी अंतरिक्षाच्या पटांगणांत प्रवेश करूं लागली, तशीच गोषाच्या पडद्याआडून एकेक सौंदर्यसंपन्न चटकचांदणी मीनाबाजाराच्या पटांगणांत प्रवेश करूं लागली. दिल्ली शहराच्या त्या मीनाबाजाराचें क्षेत्र रम्य, भव्य आणि फार विस्तीर्ण होतें; पण आकाशांतील चांदण्यांना पृथ्वीच्या लहानशा गोलावरील तें एक वीतभर दिसत होतें. तरीहि त्या टीचभर पटांगणांत चमकणाऱ्या त्या रमणीरत्नांना पाहून आकाशस्थ तारकांना मत्सर वाटल्यावांचून राहिला नाहीं.

आकाशांत तारांगणांचा—असंख्य सुंदर तारांगणांचा समुदाय जमला कीं चंद्र त्यांच्याकडे अर्थहीन दृष्टीनें पहात असेल, पण तो रोहिणीकडे मात्र पतित्वाच्या दृष्टीनें पहातो. इतर चांदण्याकडे तो त्या दृष्टीनें पाहत नाहीं. या मीनाबाजारांतील स्त्रीगणाकडे पहाणाऱ्या पुरुषाची दृष्टि कशी असेल हें कोणी सांगावें ?

अकबरशहाच्या चारित्र्यावर आजवर अनेकांनीं अनेक कथानकें रचलीं आहेत. एकानें तर असें लिहिलें आहे कीं या खुषरोजच्या मीनाबाजारांत रात्रौ स्त्रीवेष घेऊन स्वतः अकबर बादशहा सामील होत असे. मीनाबाजारांत सामील होणाऱ्या स्त्रिया देखील सशस्त्र असतात या गोष्टीचा अकबरशहाला, या मीनाबाजारच्या एका रात्रीं स्त्रीवेषांत असतांनाहि भान विसरून एका रजपूत कुलस्त्रीशीं केलेल्या एका अतिप्रसंगाच्यावेळीं अनुभव आला होता, असेंहि एका कथालेखकानें लिहिलेलें वाचल्याचें स्मरतें. तेव्हां खुषरोजचा मीनाबाजार भरविण्याचा हेतु काय असावा याविषयीं वरील सारख्या कथांवरून संशय येऊं पाहतो. परंतु आजच्या प्रसंगीं अकबरशहा एका उंच

व भव्य महालाच्या उंच खिडकींतून दूर अंतरावरून मीनाबाजारांतील गंमत पहात होता. तो कांहीं स्त्रीवेषानें त्यांत सामील झाला नव्हता. मीनाबाजारांतील त्या स्त्री-समुदायांत जनानखान्याच्या राण्याही आल्या होत्या व त्याची आवडती रजपूत राणी जोधबाईही येऊन दाखल झाली होती. इकडेतिकडे थोडा वेळ फिरून ती लौकरच जाणार होती. अकबर आकाशांतील रोहिणीकडे पहाणाऱ्या चंद्राप्रमाणेंच मीनाबाजारांतील जनानीसौंदर्याकडे पहात होता कीं काय, हें एक सर्वांतर्यामी परमेश्वरालाच ठाऊक असणार.त्याचें अंतरंग शोधून कोणी पहावें ?

त्या ठिकाणाहून त्यास मीनाबाजार व आणखीहि दूर अंतरावरचा भाग दिसत होता. तो त्या खिडकींतून रात्रीची मौज पहात होता. तेथून मीनाबाजारचें दृश्य दिसावें अशीच व्यवस्था पूर्वीपासून करण्यांत आली होती. इतक्यांत कांहीं दूर अंतरावर मशाली घेऊन फिरणाऱ्या लोकांचा घोळका त्याला दिसूं लागला. तो कशाचा आहे हें मात्र त्यास समजेना. तो एकवार मीनाबाजाराकडे व एकवार त्या दूरच्या गडबडीकडे पहात होता. पहातां पहातां मीनाबाजारच्या प्रवेशद्वाराकडे कसली तरी बाचाबाची होत असल्याचें त्याच्या कानीं आलें. तेव्हां मीनाबाजाराकडची व त्या दूरच्या गडबडीकडची नजर काढून घेऊन तो इकडेच लक्षपूर्वक पाहूं लागला.

मीनाबाजारांत प्रवेश करण्यासाठीं एक स्त्री आली होती. तथापि ती एक खोडकर वेडी बाई आहे असें कांहीं लोक सांगत होते. व दुसरा एक माणूस तितक्यांत तेथें आला, तो ती वेडी नसून आपली बहीण आहे असें आग्रहपूर्वक सांगत होता व तीही आंत जाण्यास उत्सुकता दर्शवीत होती. इतक्यांत कोणी स्त्री आंत येण्यासाठीं खटपट करीत असून तिला आंत प्रवेश मिळत नाहीं असें समजतांच आंतील स्त्रीसमुदायानें तिला आंत घेण्यासाठीं कांहीं सैनिक वेषधारी स्त्रिया बाहेर पाठविल्या; त्याहि तेथें येऊन ठेपल्या. जे लोक वेडी म्हणून तिला म्हणत होते, तेहि तिला आपलीच नातेवाईक म्हणून सांगत होते. म्हणूनच त्यांनीं आतां असें सांगावयास सुरुवात केली कीं, ही स्त्री वेडेपणामुळें उपाशीं असल्यामुळें तिला आपण कांहीं खावयास देतों तेवढें तिला खाऊं दे. त्यावर ती स्त्री म्हणत होती कीं आपणास मुळींच भूक नसून हे आपल्या तोंडांत कांहीं तरी वाईट उग्र वस्तु कोंबीत आहेत. तिचा भाऊ म्हणविणाऱ्या माणसानेंहि तसेंच सांगितलें. या दुष्ट लोकांनीं तिचा आज कित्येक दिवस छळ आरंभला असून आतां ते तिला विष चारीत आहेत. पण बाहेर आलेल्या स्त्रीसैनिकांनीं तिला आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें तंटयाचें मूळच तुटलें आणि त्या अनाथ स्त्रीचा मीनाबाजारच्या पटांगणांत प्रवेश झाला. तें पाहून तिचा भाऊ म्हणविणाऱ्यास समाधान वाटलें व नातलग म्हणविणारे लोक मागें परतले. जातांना ते तिच्या भावास शिव्या देत व सूड उगविण्याची धमकी देत निघून गेले !

हा सर्व प्रकार पाहून अकबराला आश्चर्य वाटलें. आतां त्या मशाली व

त्यांच्या बरोबरची दूर अंतरावरची ती गडबड त्याला दिसत नव्हती. तेव्हां मीना-बाजारच्या सौंदर्याकडे व या नव्याच घडणाऱ्या चमत्काराकडे दृष्टि स्थिरावण्यास त्याला अवसर सांपडला. ती स्त्री आंत प्रवेश केल्याबरोबर स्वगत भाषण करूं लागली व उंच स्वरांत गाऊंही लागली. तिला आपल्या आंगावरील वस्त्रांची शुद्धि नव्हती व आपण कुठें आहोंत याचेंहि तिला भान नसावेसें वाटलें. तिनें आपल्या कंबरेस एक लहानसें गांठोडें बांधलेलें होतें. त्याच्याकडे बोट दाखवी आणि नंतर आकाशाकडे बोट दाखवी आणि वेडेपणाचे कांहीं तरी हावभाव करून ती मोठमोठ्यानें बोलत चालली होती.

" हे माझे पतिदेव. मी त्यांची पट्टराणी. आम्ही आतां ह्या नंदनवनांत आलों. ह्या सगळ्या देवी. हे देवस्त्रियांनों, तुम्ही मला कां ओंवाळीत नाहीं बरें? माझीं सौभाग्यलेणीं मृत्युलोकींच्या राक्षसांनीं हिरावून घेतलीं तीं तुम्हीं मला देणार म्हणून मी या नंदनवनांत आलें ना? तर मग आतां या स्वर्गलोकांतल्या तुम्ही दयेच्या देवी देखलि माझी विटंबनाच करणार काय? "

अशासारखीं भाषणें ती करीत होती. त्यांत मराठी भाषेचा एकादा शब्द चुकून येई. परंतु संस्कृत, गुजराथी आणि फारशी या तीन भाषांत ती अस्खलित बोलत होती. त्यामुळें बहुतेक स्त्रीपरिवार तिच्या भोंवतीं जमा झाल्यास नवल कसलें? लवकरच सारा मीनाबाजार तिच्याच भोंवतीं जमा होण्याचा रंग दिसूं लागला.

तिचा वेष रजपुतानीचा होता. ती अप्रतिम लावण्यवती व तरुण होती. पण ती म्हणत होती त्याप्रमाणें तिच्या अंगावर खरोखरीच सौभाग्यलेणीं नव्हतीं. त्यावरून तिच्या भाषणांत सारा वेडेपिसेपणाच होता असेंहि म्हणतां येण्यासारखें नव्हतें. त्यामुळें तिच्या भोंवतालीं अधिकाधिक दाटी होऊं लागली व राणी जोधबाईला ती हकीगत समजतांच त्या बाईला आपल्यासमोर आणण्यासाठीं तिनें बायका व दासी पाठविल्या. पण त्या सगळ्यां तिच्या गाण्यालाच मोहून गेल्या. तिचा गोड गळा, सुंदर स्वरूप आणि करुणा उत्पन्न करणारी विव्हल स्थिति, मनाला कळवळा आणण्यासारखी होती. एकच अर्थाचें गाणें ती संस्कृत, फारशी आणि गुजराथी या तीन भाषांत आलटून पालटून घोळघोळून म्हणत होती. पण गुजराथी भाषेंत तें गाणें विशेष परिणामकारक लागत होतें. शेवटीं वाट पाहून पाहून स्वतः सम्राज्ञीच तिकडे जावयास उठली. पण इतर स्त्रिया तिला उठूं देईनात. त्या तिला आणण्यासाठीं गेल्या.

थोड्याच वेळांत तो सगळाच घोळका हळूहळू सम्राज्ञीसमोर आला. इतर स्त्रिया बाजूला सरकल्या; आणि वेडी स्त्री सम्राज्ञीसमोर तिला अभिवादन करून गाऊं लागली.

**रूपे शुं मन राचो रे**
**कायानो रंग काचो रे**
**भगवान् भजो !**
**हाडमांसने रुधिर भरेलुं**

मढलुं चामडे अंग
गंदा देहनो गर्व नकामो
कायानो रंग पतंग
भरुंसो नहिं साचो रे
कायानो रंग काचो रे
भगवान् भजो !

अहाहा ! काय अमोलिक उपदेश ! काय त्या गाण्याचा भावार्थ ! किती सुंदर तें स्वरूप, पण त्याहून लाखपटींनीं सुंदर तो उपदेश ! आवाजाच्या मोहकपणास तर सीमाच नव्हती. पण तें गाणें, त्या गाण्यांतील अर्थ, प्रत्येक स्त्रीच्या हृदयाला भेदून गेला. सर्व स्त्रियांची मान खालीं पडली. रूपगर्विता विलासिनी तरुणींचा गर्व गळून गेला. ललनागण आपापलें अंतःशोधन करूं लागला. स्वरूपाचा गर्व वहाणें आणि बुडबुड्याचा दिमाख सारखाच नव्हे का ?

त्या सुंदर स्त्रियांची अशी अवस्था झाली. पण तिकडे शहाची मनःस्थिति कशी झाली ? त्याचीहि चांगलीच कानउघाडणी झाली. चंद्राच्या नजरेंतली पवित्रता जर का अकबरशहाच्या नजरेंतून कांहीं काळ नष्ट झाली असली, तर ती आतां त्या ठिकाणीं प्रविष्ट झाली. पण त्याचें मन देखील भगवत्‌चरणीं विलीन होऊन गेल्याशिवाय राहिलें नाहीं. आत्तांच्या आत्तां त्या स्त्रीला समोर बोलावून तिची हकीगत विचारावी असें त्याला वाटलें. वाटलें खरें; पण त्याप्रमाणें त्याला करतां येण्यासारखें नव्हतें. स्त्रीसमाजाकडूनच ती गोष्ट कानावर आल्याशिवाय त्याला त्या बाबतींत कांहींहि करतां येण्यासारखें नव्हतें. त्याचें मन चुळबुळ करूं लागलें, पण त्याचा नाइलाज झाला. कारण तो सर्व प्रकार चोरून पहात होता. तो मीनाबाजारांतील प्रकार चोरून पहात होता, तें खुद्द जोधबाईस देखील माहीत नव्हतें. तिला माहीत असतें तर तिनें अकबरला तसें करूं दिलें नसतें, अथवा सारा स्त्रीसमाज जागृत करून उधळून लावला असता.

अकबराला लाज वाटली. तो स्वतःच्या ह्या मनःप्रवृत्तीबद्दल खजील झाला. मीनाबाजाराकडे आतां त्याच्यानें पाहवेना. इतक्या पवित्र मनाच्या रमणीजनांच्या विश्वासाचा आपण भलता फायदा घेऊन एकप्रकारचें पाप करीत आहों, हें वारंवार मनांत येऊन तो पश्चात्तप्त झाला. आतां तो खरोखरीच तेथून उठला असता; नव्हे उठलाहि–पण त्याचें पाऊल तेथून निघेना. त्याचें शरीर त्या जागेवरून मुळींच हालेना ! पण असें कां बरें तें हाले ना ?

याचें कारण दुसरें कोणतें असणार ? त्या वेड्या स्त्रीची पुढील हकीगत त्याला पहावयाची होती. त्या शांत प्रहरीं तें तिचें लाखाच्या मोलाचें गाणें ऐकून त्या पवित्र गानगंगेनें त्याचें हृदय धुवून धुवून साफ केलें होतें. तेव्हां आतां त्याची दृष्टि पवित्र

झाली असल्यामुळें आतां जरी तो त्या रमणी जनसमूहाकडे पहात होता, तरी आतां त्याबद्दल कोणालाहि तिरस्कार उत्पन्न होऊं नये असें वाटतें.

सम्राज्ञी हा सर्व प्रकार पाहून चकित झाली. त्या स्त्रीची सर्व हकीगत जाणून घेण्याची तिची इच्छा अनावर झाली. पण ही स्त्री वेडी आहे कीं, शहाणी आहे, याचा उलगडा तिला करतां येईना.

तिनें त्या स्त्रीला जवळ बोलाविलें. पण ती तर आकाशाकडेच पहात होती! तिच्या दासींनीं त्या स्त्रीला सम्राज्ञीकडे नेण्यासाठीं तिच्या हाताला धरलें, तों तिचा हात त्यांना गारठल्यासारखा लागूं लागला. या अर्ध घटकेंत तिच्या चेहऱ्यांत जादू-प्रमाणें फरक पडत चालला होता. ती आस्ते आस्ते काळी पडत चालली होती! आतां आजूबाजूच्या स्त्रिया तिला धरून सम्राज्ञीच्या जवळ नेणार तोंच ती धाड्कन् जमि-नीवर पडली आणि गतप्राण झाली!

त्या आनंदसाम्राज्यांत एकच हाहाःकार उसळून गेला. सम्राज्ञीला फारच दुःख झालें. वरती अकबराला हा प्रकार पाहून शरिरांतील रक्त गोठल्यासारखें वाटलें. सम्राज्ञी याच्या पूर्वीच जावयाची; पण या स्त्रीच्या आगमनामुळें ती अडकून राहिली होती. आतां हा प्रकार! तिचें मन विषण्ण झालें. आतां त्या स्त्रीच्या प्रेताची व्यवस्था प्रथम लाविली पाहिजे होती. सर्व प्रकार क्षणार्धांत घडावा तसा अचानक घडला होता. मीनाबाजाराच्या देवघेवीस व नाचरंगास एकदम खो बसला. जिकडे तिकडे दुःखाची छाया पसरली. ती स्त्री कोणाच्या नात्यागोत्याची नव्हती. ती कोणाच्या परिचयाचीहि नव्हती. पण सम्राज्ञीच्या हिंदु मनास तो अशुभ शकुनसा वाटला. म्हणूनच बादशहानें सुरू केलेल्या त्या आनंदोत्सवाचे सर्व प्रकार एकदम बंद पाडण्यास तिनें फर्माविलें. त्या वेड्या स्त्रीचा देह मीनाबाजाराच्या क्षेत्राच्या बाहेर काढण्यांत आला. तिचा भाऊ म्हणविणारा इसम अद्याप बाहेर तिची वाट पहात बसलाच होता. त्यानें ती स्थिति पाहतांच एकच आक्रोश मांडला. जोधबाईवर हें आणखी एक नवीनच संकट आल्यासारखें वाटलें. पण त्याला तरी तिचा इतिहास विचारतां येईल अशी कल्पना मनांत येऊन तिनें त्याला ठेवून घेण्याविषयीं नोकरांस बजाविलें.

इतक्यांत एक बैरागी त्या ठिकाणीं आला. विचारपूस करितां तो शोकदेखावा कशासाठीं होता, हें समजतांच तो तेथें आला. त्या स्त्रीच्या बंधूनें त्याचे पाय धरले व तो आपल्या बहिणीस वांचविण्याबद्दल त्या बैराग्याची प्रार्थना करूं लागला. बैरागीहि त्याच्या विनंतीस मान देऊन जिथें त्याच्या बहिणीचा देह ठेविलेला होता तिथें गेला.

त्यानें आकाशाकडे दृष्टि लावून क्षणैक ध्यान केलें व आपल्या कमंडलूंतील उदक त्या देहाच्या नेत्रांस लावून नंतर तें तिच्या मृत देहावर शिंपडलें; आणि तो पुन्हां क्षणैक ध्यानस्थ झाला. फिरून एकवार त्यानें तिच्या देहावर जलसिंचन करून तो जाऊं लागणार, तोंच ती स्त्री डोळे चोळीत उठून बसली!

जिकडे तिकडे एकदम आनंदाचें वातावरण हेलकावूं लागलें. सम्राज्ञीनें त्या विभूतीस वंदन करण्यासाठीं बोलावलें. तो मागें फिरेना. स्वतः सम्राज्ञीच त्याच्या मागून जाऊं लागली; त्यावरून तो विचार करतो आहे तोंच राजदूत येऊन स्वतः अकबरशहा आपल्या दर्शनास येत आहेत; आपण तोंपर्यंत जरा थांबण्याची कृपा करावी, असा बादशहाचा निरोप त्यांनीं त्या बैराग्यास कळविला; आणि खरोखरच तोंपर्यंत बादशहाची स्वारी येत असल्याचेंहि दिसूं लागलें.

बैराग्यास आतां बादशहाकडे जाणें योग्य वाटलें. तो बैरागी मागें परतला. त्याचें दर्शन होतांच बादशहानें त्यास अभिवादन केलें.

---

# प्रकरण नववें.

## नवा शिष्य,—कुठला कोण ?

बादशहानें त्या बैराग्याची भेट घेऊन त्याजपासून कांहीं गोष्टी समजावून घेतल्या. आग्रा मुक्कामीं फैझीला व आणखी एका मुलाला अपमृत्यूंतून वांचविणारी ती हीच विभूति होती. या तिन्ही बाबतींत गतप्राण झालेल्यांचा महामृत्यूचा योग नव्हता. शिवाय या विभूतीला त्याच्या गुरूच्या कृपेनें एक मंत्र प्राप्त झाला होता. त्या मंत्राच्या सामर्थ्यावरच त्याला गतप्राण होऊन पडलेल्या पण आयुर्मान असलेल्या जीवास उठवितां येत असे. तरी सुद्धां अशा गतप्राण झालेल्या प्रत्येक मनुष्यास उठविण्यास आपल्याला आपली गुरूची आज्ञा नाहीं, असेंहि त्यानें सांगितलें. आपल्या मंत्रसामर्थ्यानें जीं माणसें वर उठतील, त्यांच्याकडून कांहीं तरी विशिष्ट कृत्यें घडावयाचीं असतात असेंहि तो जातां जातां म्हणाला. आपणाला हा मंत्र प्राप्त होतांच त्याचा कांहीं नियमित जीवांस फायदा व्हावयाचा विधिसंकेत होता. त्यासाठीं आपण संचार करीत असतों, पण तो अवधि आतां संपत आल्याकारणानें लवकरच आपण आपल्या गुरूच्या परवानगीनें हिमालयांत तपश्चर्येसाठीं जाणार असल्याचें त्यानें सांगितलें.

शहानें त्याला रहाण्याविषयीं पुष्कळ विनवणी करून सांगितलें, पण व्यर्थ. शेवटीं त्याच्या गुरूचें नांव विचारलें. पुष्कळसे आढेवेढे घेऊन त्यानें शेवटीं राजाचा शुद्ध भाव पाहून आपल्या गुरूचें नांव व पत्ता सांगितला, आणि तो तेथून वायुवेगानें मागें वळूनहि न पाहतां तडक आपल्या आल्या वाटेनें चालता झाला.

तिकडे आग्रा शहरीं शिवशर्म्याला आपण देवालयांतील न्यायसभेंत सोडून दिलेलें वाचकांच्या ध्यानांत असेलच. त्यांचा न्यायमनसुबा होऊन बाचाबाचीला सुरुवात होतांच त्या मुसलमानी पेहरावाच्या स्वारानें सरकारी नोकर त्या ठिकाणीं आणण्याची आगाऊच व्यवस्था केली होती. शिवशर्मा त्या गुहेंत त्या स्वारानें सांगितलेल्या गोष्टी करण्यास कबूल झाल्यामुळें त्याला सोडविणें हा अन्याय होणार नाहीं असें त्यास वाटलें होतें. त्याप्रमाणें शिवशर्मा निरपराधी असून उगीच गोंधळ माजला आहे, तरी सरकारी बोलावण्याचा आविर्भाव करून सर्व लोकांस जरब दाखवावी व नंतर त्यांस सोडून द्यावें असें त्यानें राजदूतांस कळविलें होतें. तसें न केल्यास मात्र त्या ब्राह्मणास ते देवळांतले लोक कदाचित् ठारहि मारतील व त्यामुळें विनाकारण एक मोठा गुन्हा घडल्यासारखें होईल असेंहि बजावून तो चालता झाला होता. शिपायांनीं आपल्या अधिकारांत एवढें काम केल्यास सुभेदारसाहेबांच्या हुजुराकडे ही बाब नेण्याची कांहीं जरूरी नाहीं असें त्या स्वारानें सुचविल्यामुळें देवळांतील प्रकरण हातघाईवर येईपर्यंत शिपाई त्या ठिकाणीं जाऊन पोंचले व त्यांनीं त्या स्वारानें शिकविल्याप्रमाणें आपण शिवशर्म्यास कैद करून नेतों असें सांगून तें भांडण थोड्याशा बोलाचालीनंतर तोडलें व ते शिवशर्म्यास घेऊन चालते झाले.

त्यांच्या नाइकाच्या हातावर कांहीं देणगी ठेवून स्वार चालता झाला. त्यावर शिपायांकडून शिवशर्म्याचीहि सुटका झाली व तो दुसरीतिसरीकडे न जातां फिरून दिल्लीलाच आला. त्याला आतां आपल्याला अनुभवलेल्या गोष्टींचा विचार करून आपल्या जीवनक्रमाला नवें वळण लावावयाचें होतें.

तो आग्र्याहून आल्यानंतर आपल्या त्या मठांत येऊन पोंचला. कांहीं दिवस तो निष्क्रिय राहून विचार करीत होता. हिंदुधर्मशास्त्राचे ग्रंथ आपण विकतों हें बरें करीत नसून आपल्या धर्मबांधवांच्या धर्मभावना आपण दुखवीत आहों ही गोष्ट त्याच्या लक्षांत यापूर्वी थोडीशी आली होती, पण तिचें महत्त्व त्याला वाटलें नव्हतें. आतां महत्त्वही वाटलें होतें व शिवाय भीतीहि उत्पन्न झाली होती.

पण मग विश्वंभरशास्त्री करीत आहे हें काय ? त्याची कानउघाडणी कोणी कां करीत नाहीं ? त्याचा चाललेला सरळ व्यवसाय त्याला कोठें बाधतो आहे ? आणि आपण तरी हें काम त्याच्याच सांगण्यावरून आणि त्याच्याचसाठीं करीत असतों. मधल्यामध्यें थोडी दलाली दडपली असली तरी मुख्य व्यवहार विश्वंभरशास्त्र्याच्या नांवचा व त्याच्याच प्रोत्साहनानें करीत असतों. असे अनेक विचार शिवशर्म्याच्या मनांत घोळूं लागले.

पण आम्यांत रात्रौ गुहेंत घडलेला चमत्कार आपण मठाधिपतीस-विश्वंभर-शास्त्रयास कळवावा कीं नाहीं, हा आणखी एक प्रश्न त्याच्यापुढें दत्त म्हणून उभा राहिला. आपल्या मनाशीं त्यानें पुष्कळ भवति न भवति करून पाहिली आणि शेवटीं त्यानें ती हकीगत विश्वंभरशास्त्रयास कळविण्याचेंहि ठरविलें.

एके दिवशीं संधि साधून संध्याकाळच्या वेळीं त्यानें ती गोष्ट विश्वंभर-शास्त्रयाच्या कानावर घातली. विश्वंभरशास्त्रयालाही आपल्या हस्तकाच्या वर्तनांत पड-लेला अनिष्ट फरक व हालचालींत आलेली शिथिलता पाहून कांहीं कमीजास्ती प्रकार घडला असावा असें वाटून कांहीं तसेंच लक्ष पुरविण्यासारखें प्रकरण असल्यास तें सम-जून घ्यावयाचें होतेंच. त्यामुळें त्यानेंहि शिवशर्म्याची गोष्ट लक्षपूर्वक ऐकून घेतली व ती ऐकल्यावर तो किंचित् सचिंत व पश्चात्तप्त झाल्यासारखें त्याच्या चेहऱ्यावरून शिवशर्म्यास वाटलें. कदाचित् त्याला तसा भासहि झाला असेल. शास्त्रीबोवा अखेरीस थोडेसे हासले व त्यांनीं सर्व प्रकार आपल्यास जणूं काय पूर्वींच ठाऊक आहे व त्याला मुळींच कांहीं महत्त्व नाहीं असें वाटल्याचा आविर्भाव करून म्हणाले—

" झालें, इतकेंच ना ? कीं आणखी कांहीं आहे ? "

शास्त्रीबोवांच्या या प्रश्नानें शिवशर्म्याला नवलच वाटलें. कारण कांहीं दिवसां-पूर्वीं रात्रींच्या वेळीं पडक्या घरांत घडलेला प्रकार त्यानें शास्त्रीबोवांस सांगितला, त्यावेळीं त्यांची चर्या व वर्तन थेट असेंच होतें. आणखीहि कित्येक वेळां त्याला असाच अनुभव आला होता. मग आपल्याला नव्या, महत्त्वाच्या, नवलपूर्ण, भीति-दायक अशा ज्या ज्या गोष्टी वाटतात, त्यांचें कसलेंच नवल शास्त्रीबोवांना वाटत नाहीं हें काय गूढ आहे ? शास्त्रीबोवांना त्यापूर्वींच कळलेल्या असतील काय ? तसें असेल तर त्यांस कोण कळवतो ? कीं शास्त्रीबोवा खरोखरच त्रिकालज्ञ-सर्वज्ञ आहेत ? शास्त्री-बोवांच्या वरील प्रश्नानें शिवशर्म्याला आपल्या कारवाईचा कांहींच परिणाम वाटत नाहीं म्हणून वाईट वाटलें; व तो क्षणभर स्तब्ध राहिला. तोंपर्यंत त्याच्या चर्येवरून त्याच्या मनांत कोणते विचार घोळत आहेत याचें सूक्ष्म निरीक्षण शास्त्रीजींनीं चाल-विलें होतें. त्यांनीं पुनः विचारलें-

" इतकेंच ना ? "

त्या प्रश्नाला शिवशर्म्यानें नुसती होकारार्थी मान हालविली.

" मग या प्रकाराच्या तुमच्या मनावर काय परिणाम झाला ? "

शिवशर्मा कांहीं बोलेना. पण शास्त्रींजींना आपला अनुयायी आपल्या पकडीं-तून सुटला कीं अझून कह्यांत आहे हें अजमावून पहावयाचें होतें.

" तो स्वार कोण असावासा तुम्हांला वाटतो ? "

" तो रजपूत आहे. "

" तें तर तुम्हीं पाहिलेंच होतें. "

" पण तो कुठून आलेला आणि कोणत्या कामासाठीं आलेला असावा असें वाटतें ? "

" तेंच तर मला ठाऊक नाहीं ! "

" पण तुम्ही चौकशी नाहीं केली ? "

" केली पण तलास नाहीं लागला. "

याचें कारण गुहेंतील योगिराजाशीं दुसरा माणूस बोलत असतां शिवशर्म्याला घेऊन तो मुसलमान वेषधारी स्वार दुसऱ्या एका बाजूस गेला होता हें पुनः सांगावयास नकोच. शिवशर्म्याला त्यांतील कळलें नाहीं हें पाहून शास्त्रीजींना बरें वाटलें.

" बरें तें राहो. तो स्वार कोण आहे, ती मंडळी कोण आहेत, ते योगिराज कोण आहेत, तें मला सर्व ठाऊक आहे. "

हें बोलणें ऐकून शिवशर्मा थक्कच झाला. शास्त्रीजी खात्रीपूर्वक सर्वज्ञ आहेत. तो त्यांचें बोलणें ऐकत राहिला.

" मग त्या स्वारानें सांगितल्याप्रमाणें करावयाचेंच तुमचें ठरलें काय ? "

" नाहीं, " विचार करून मिस्किलपणें शिवशर्म्यानें उत्तर दिलें.

" तुमच्या मुद्रेवरून असें नाहीं दिसत ! " किंचित् हास्य करून शास्त्रीजी म्हणाले.

तें ऐकून शिवशर्मा मनांत किंचित् चरकला. तथापि नेट धरून तोहि जोरांत म्हणाला—

" खरोखरच त्याचें म्हणणें मला पटलें नाहीं. "

" तर मग तुम्हाला हिंदुधर्मशास्त्रांच्या ग्रंथांबद्दल पूज्यभाव आणि आदर नाहीं असेंच म्हणावें लागेल ! " शास्त्रीजी म्हणाले.

" सध्यां तरी लोक मला तसेंच म्हणत आहेत, असें समजतें. "

" आणि म्हणूनच तुम्हाला पश्चात्ताप झाला असून त्या स्वाराच्या बोलण्याप्रमाणें तुम्हीं इतःपर वागावयाचा निश्चय केलेला आहे. "

आतां तर शास्त्रीजी दुसऱ्याचें मनोगत देखील जाणण्यांत पटाईत आहेत असें त्याला वाटलें. आपली लपवाछपवी शास्त्रीजींपासून कितपत गुप्त राहील कोण जाणे, अशी भीति त्याला वाटल्यावांचून राहिली नाहीं.

" कसें झालें तरी असल्या बोलण्याला महत्त्व द्यावेंसें मला वाटत नाहीं. " शिवशर्मा म्हणाला.

" कां ? "

" आपणच मागें एकदां म्हणालां होतां कीं, हा प्रकार आजकालचा नसून पूर्वीपासून सुरूच आहे ? "

" असें फक्त तुम्हाला मी केव्हां तरी म्हटलेलें आठवत असेल. पण आतां त्याबद्दलची नांवनिशीवार नोंद दिली तर कसें ? "

शास्त्रीजींच्या अगाध, विद्वत्तेबद्दल व अथांग इतिहासज्ञानाबद्दल आश्चर्य करीत शिवशर्मा ऐकत राहिला.

" शिवशर्मा, मी सांगतों ही खरीखुरी इतिहासकथा तुम्ही नीट लक्षपूर्वक ऐका आणि मग योग्यायोग्य विचार तुमचा तुम्हीच करा. "

आपल्या भाषणाचा परिणाम काय होतो हें पहाण्यासाठीं शास्त्रीजी किंचित् थांबले व त्यांनीं आपलें भाषण पुढें चालविलें.

" हें पहा, आमचे हिंदुधर्मांतलि धार्मिक व शास्त्रीय ग्रंथ फार प्राचीन कालापासून परदेशांत गेले आहेत. आरबस्थानांत इ. स. ७७३ सालीं खलीफ आबासिद्दी आलमसूट यानें हिंदी लोकांचे ग्रंथ मिळविण्याची खटपट सुरू केली. भरतखंडांतून एक नामांकित विद्वान् तिकडे गेला. तो ज्योतिःशास्त्रज्ञ होता. त्यानें नक्षत्रांचे वेध घेण्याची पद्धति, सूर्य व चंद्रग्रहणाचा काल इत्यादि संबंधीं बरेच शोध केलेले होते. खलीफाला त्याच्या या शोधांचें महत्त्व ठाऊक होतें. त्यानें त्याला आश्रय दिला. त्या संस्कृत ग्रंथाचें अरबींत भाषांतर करावयास त्यानें त्याला सांगितलें. शास्त्र्यानें तें काम आंगावर घेतलें. पण अरबी व संस्कृत जाणणाऱ्या दुभाष्याची गरज होती. तसा कोणी सांपडेना. तथापि हे भारतीय पंडित आणि महंमद बिन इब्राहिम अलफझारी या दोघांनीं सहकारित्वानें हे कार्य आरंभिलें आणि तें सुरळीतपणें तडीसहि नेलें. याच ग्रंथाला आरबींत आणि फारशींत " सिंध-हिंद " अशी संज्ञा आहे. " इतकें बोलून शास्त्रीजी थोडा वेळ उभे राहिले.

यांतील व याहूनहि आणखी कांहीं माहिती शिवशर्म्यानें यापूर्वी थोडीफार ऐकली होती. धर्मविवेचनसभेच्या सभासदांकडे तो ग्रंथविक्रीचें खलबत करावयास जात असे, त्यावेळीं त्याला या व असल्याच अनेक गोष्टी ऐकावयास मिळत असत. पण त्यांत आत्मप्रौढीचें मिश्रण बरेंच असल्यामुळें त्या एकतर्फी असत; म्हणून त्यांत फरकहि बराच होत असे. तो फरक आतां तुलनेमुळें शिवशर्म्याच्या लक्ष्यांत आला. शिवशर्म्याच्या मनांत शास्त्रीजीबद्दल अधिकाधिक आदर उत्पन्न होऊं लागला.

शास्त्रीजी पुनः पुढें बोलूं लागले--

खलीफा हारुन्-अल्-रशीद याच्या कारकीर्दींत विद्या आणि कला यांचा बराच विकास झाला. हा खलीफा विद्वान्, मर्मज्ञ आणि मोठा शोधक होता. त्याला विद्येची गोडीहि तशीच विलक्षण होती. त्याच्या पदरीं अनेक पंडित व शास्त्री असत. पण त्यालाहि मुख्य मदत झाली ती भारतीय पंडितांचीच. इ. स. ७८६ ते ८०९ पर्यंतच्या अवधींत त्या देशांत आपल्या भारतदेशांतून मंका आणि साले या नांवाचे दोन सुप्रसिद्ध धन्वंतरी गेले. यांनीं संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें करून त्या खलीफास दिलीं. मंकानें सुश्रुत या प्रसिद्ध वैद्यक ग्रंथाचें भाषांतर फारशींत केलें. हारुन् आल-रशीद याच्या पदरीं " कंक " या नांवांचा एक भारतीय ज्योतिःशास्त्रज्ञ देखील होता. शिवाय मंकवा या नांवाचा आणखी एक वैद्य त्याच्या पदरीं राहिला होता.

त्यानंतर खालीफ अल्-मामूच्या कारकीर्दींत महमद बिन मुसा या आरबी पंडितानें बीजगणिताचें भाषांतर संस्कृतांतून आरबींत केलें; आणि आरबस्थानांतून बीज-

गणित आरबी संस्कृतीबरोबर स्पेन देशांत व सर्व युरोपांत गेलें. युरोपियन लोक ती विद्या आरबी लोकांचीच म्हणून समजूं लागले; पण ती मूळची आमचीच ना ? मग ती त्या लोकांनीं परदेशीयांस कां द्यावी ? अशीं किती तरी आणखी उदाहरणें सांगतां येतील व तीं जरूर तर तुम्हांला सांगेनाहि. एकंदरींत काय, कीं संस्कृत ग्रंथ परधर्मीयांस देणें हें मुळींच गैरवाजवी नाहीं, हें यावरून तुमच्या लक्ष्यांत येईलच.

आतां मात्र शिवशर्म्याचें मन पुनः कच खाऊं लागलें. पण आपण घेतलेल्या शपथेचें त्याला स्मरण होतांच त्याचा तोहि विचार डळमळूं लागला. अद्भन आपल्या भाषणाचा टिकाऊ परिणाम झालेला नाहीं, इतकें शास्त्रीजींच्या ध्यानांत यावयास वेळ लागला नाहीं. म्हणून शास्त्रीजी आपल्या भाषणाचा समारोप करण्याकरितां पुढें म्हणाले--

" गैरवाजवी कसें नाहीं, हें तुमच्या लक्षांत आलें काय ? "

" नाहीं. तें मात्र नाहीं समजलें " शिवशर्मा म्हणाला--

" अहो, असें पहा, " शास्त्रीजी बोलूं लागले. " असें पहा, कीं आमचे हे ग्रंथ फारशींत, आरबींत आणि मग युरोपस्थ लोकांच्या भाषेंत भाषांतरित झाले, तर तितका आमच्या भारतीय विद्यांचा लौकिक इतर लोकांस कळून त्यांचा आमच्याविषयीं अधिक पूज्यभाव होणार नाहीं काय ? यांत आमच्या लोकांचा तोटा झाला कीं, फायदा झाला, याचा विचार करा बरें ! आपलें ज्ञान कोंडून ठेवल्यानें व तें लोकांस समजूं न दिल्यानें उलटा तोटा आहे. मीं जीं वर उदाहरणें सांगितलीं तीं कशीं आहेत याचाहि विचार करा. त्या विद्वान् लोकांनीं स्वतः आपणहोऊन आमच्या ग्रंथांचीं भाषांतरें करून दिलीं. आपण नुसते ग्रंथच त्यांना देत आहोंत, तेव्हां त्यांना तीं भाषांतरें करायला श्रम पडणार तो निराळाच. त्यासाठीं देखील त्यांना आपल्याकडेच यावें लागेल, हें विसरतां तुम्ही. तेव्हां यांत गैरवाजवी असें कांहींच नाहीं. आमचे ग्रंथ आम्ही लोकांपासून झांकून तरी किती दिवस ठेवणार ? ते त्यांच्या हस्तगत कधीं ना कधीं झाल्याशिवाय रहाणारच नाहींत. आतांपर्यंत पूर्वीं ज्या मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या झाल्या, त्यांत शहरचीं शहरें काबीज करून त्यांनीं आमचे ग्रंथ नेलेलेच आहेत, नाहींतर जाळून तरी टाकले आहेत. मग त्यापेक्षां त्यांच्या नकला करून त्याचा मोबदला घेणें हें अयोग्य तर नव्हेच, पण असें न करणेंच अयोग्य होईल, हेंहि आतां तुमच्या लक्ष्यांत आल्याशिवाय राहणार नाहीं. "

या इतक्या समारोपाचा इष्ट तोच परिणाम शिवशर्म्यावर झाला. तो आतां पूर्वीप्रमाणें ग्रंथविक्रीच्या कामास तयार झाला; व त्यानें हाजी इब्राहिमकडून अथर्ववेदाची रक्कम आणण्यास जावयाचें कबूलहि केलें. याज्ञवल्क्यस्मृति बदाउनीनें घेतली होती. पाराशरस्मृति शेख मुबारिक घेण्याच्या तयारींत होता; व आणखी कांहीं जुने ग्रंथ इतर विद्वान् मुसलमान घेण्याच्या खटपटींत होते.

इतक्यांत आणखी एक गोष्ट तितक्याच सुमारास घडून आली होती. त्याचाहि नामनिर्देश शास्त्रीजी शिवशर्म्याकडे करावयास चुकले नाहींत.

" आणखी हें पहा, जसे आमचे धार्मिक ग्रंथ आम्हाला प्रिय आहेत, तसेच प्रत्येक धर्माच्या अनुयायांना त्यांचे त्यांचे ग्रंथ प्रिय असणारच. हें तर खरें ना ? "

" होय. "

" हल्लींच विलायतेहून कांहीं गोरे लोक मोंगल दरबारांत आले आहेत. त्यांतील एक पाद्री बायबल् ग्रंथाचें भाषांतर अकबरशहासाठीं फारशी भाषेंत करण्यास तयार झाला आहे व तें लवकरच तयार होण्याच्या रंगास आलें आहे. "

" खरें कीं काय ? " शिवशर्म्यानें आश्चर्यानें विचारलें.

" भरदरबारांतली गोष्ट. खरें कीं खोटें हें कांहीं पारखायला नको. "

शिवशर्म्याची मनापासून खात्री पटली. तथापि शेवटचा वळसा देण्याकरितां म्हणून शास्त्रीजी म्हणाले--

" तो मुसलमानी पोषाख करणारा रजपूत स्वार कोण तें मी ओळखतों, त्याचा उद्देश काय आहे तेंहि मला ठाऊक आहे. त्या लोकांचा उद्देश स्तुत्य असून तो मलाहि मान्य आहे पण यापुढें मात्र आमचा मतभेद आहे. या बलिष्ठ साम्राज्य-सत्तेला विरोध करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांच्याच कलानें घेऊन आपला कार्य-भाग साधून घेण्याचा आमचा इरादा आहे. तथापि स्वतंत्र खटपट करणाऱ्यांच्या मार्गांत आड न येतां त्यांनाहि आपल्याकडून होईल ती मदत करण्यास आमची तयारी आहे. उलटपक्षीं त्या लोकांना खरीखुरी मदत करण्यासाठीं मला या बादशाही लोकांच्या पोटांत रिघावें लागणार आहे. पण हरकत नाहीं. तसेंहि करण्यास माझी तयारी आहे. जरूर तर इस्लामी धर्माचा देखील मी स्वीकार करीन. " आपण एका-एकीं फार घसरत चाललों असें शिवशर्म्याकडे पाहतांच शास्त्रीजींस वाटलें व त्यांनीं आपलें बोलणें मधल्यामधींच थांबविलें.

तेंहि बरोबर होतें. शेवटचें वाक्य ऐकून शिवशर्मा देखील दचकला होता. शास्त्रीजींच्या चारित्र्याचें कोडें त्याला आतां अधिकच गुंतागुंतीचें होऊन बसलें. शास्त्रीजींचा अनेक विषयांत हात गुंतला असून मठाची स्थापना आणि प्रवचनें हें निव्वळ थोतांड आहे असेंहि आतां त्याला वाटूं लागलें. शेवटीं त्यानें पूर्ववत् आपला व्यवसाय चालू करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें तो आपल्या कामासहि लागला. शास्त्रीजींना धीर आला.

पण शास्त्रीजींची हालचाल कोणत्या प्रकारची होती बरें ? शिवशर्म्याच्या बरो-बर शास्त्रीजींच्या आज्ञेत राहून काम करणारा तो रजपूत हेर कोण होता व त्यांच्या परिवारांतील इतर मंडळी कोण होती हें अजून सांगावयाचें राहिलें आहे.

शिवशर्मा निघून गेला. त्याचे ग्रंथ-विक्रीचे सौदेहि ठरले. कांहीं रकमा पदरांत पडल्या; आणि त्याचा व्याप पूर्वीच्यासारखाच पुन्हां वाढत चालला.

शास्त्रीजींची कार्यक्षमता वाखाणण्यासारखीच होती. वरील गोष्ट घडून कांहीं दिवस झाल्यावर त्यांचा तो रजपूत हेर त्यांच्याजवळ एक दिवस कांहीं महत्त्वाची बातमी सांगत होता; आणि ती बातमी ऐकून त्यांनाहि आनंद होत होता. जोरावरसिंगाच्या बरोबर आणखी एक रजपूत जवळ होता. त्यांचें खलबत शास्त्रीजींच्या खास बसण्याच्या जागीं चाललें होतें.

" मग पुढें ? " शास्त्रीजींनीं विचारलें.

" जलालुद्दीनला पुन्हां मागें बोलावण्यासाठीं स्वार रवाना झाले आहेत. "

" नाहीं, दिल्लीहून दुसऱ्या एका सरदाराकडे सेनापतित्व द्यावयाचें ठरलें आहे. "

" म्हणजे मेवाडावरचें सैन्य फिरून मागें येणार कीं काय ? "

" कोणाची नेमणूक होत आहे या स्वारीवर ? "

" तें अझून नक्की नाहीं समजलें. "

" मेवाडकडची हकीगत कशी काय आहे पण ? "

" मेवाडचे लोक बादशहाच्या कोणत्याहि अटी मानण्यास कबूल नाहींत. स्वातंत्र्यासाठीं ते देह धारातीर्थी अर्पण करण्यास तयार आहेत. "

" पण जलालुद्दीनला पुनः बोलाविण्याचें कारण आम्हीं ठरविलें तेंच आहे ना ? "

" होय. तेंच आहे. "

" ईश्वर पतिव्रतेच्या धांवण्यास धांवला म्हणावयाचा ! "

" पण आतां निकाल काय होतो हें पाहिलें पाहिजे. "

" निकाल योग्य तोच होणार. आपण जरा जास्त जोर धरिला पाहिजे. जलालुद्दीनला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त मिळालें पाहिजे. जोरावरसिंग, तूं आपली कामगिरीमात्र सोळा आणे बजाविलीस. आणि पुढचीहि तशीच सावधगिरीनें बजाविली पाहिजे. जरूर पडल्यास मला देखील बादशहाजवळ जावें लागेल; पण जलालुद्दीनच्या पापाचें पुरें माप त्याच्या पदरांत घातल्याशिवाय माझ्या जिवाला चैन पडणार नाहीं. "

" या रतनसिंहानें काय बातमी आणली आहे, ती आपण ऐकली काय ? "

" काय आहे ? "

" जरा चिंताजनक आहे ! "

" म्हणजे काय ? "

" आग्र्याहून मेवाडास जाणाऱ्या रजपूत स्वारांपैकीं एक सांपडला, एक झटापटींत ठार झाला आणि एकदोघे निसटून गेले. "

" सांपडलेल्याला कैद करून आणला असेल ? "

" अर्थातच. "

" तो काय म्हणत होता ? "

" त्याची भेट नाहीं अद्याप घेतां आली." रतनसिंग म्हणाला.

" पण हे स्वार तोडरमल्लचें पत्र घेऊन मेवाडला चालले होते अशी गुण-गुण आहे."

" मग तर बादशहाचा तोडरमल्लवर घुस्सा होणार असें दिसतें!"

" जलालुद्दीनच्या ऐवजीं खुद्द तोडरमल्लांनाच मेवाडवर पाठवावयाचें होतें, पण हें नवीन वर्तमान समजल्यामुळें, तोडरमल्लना फिरून बंगाल प्रांतावर जिंकलेल्या सुभ्याची नीट व्यवस्था बसविण्यासाठीं पाठवावयाचें घाटत आहे असें म्हणतात."

" एकंदरींत तुम्हीं ही आज फारच महत्त्वाची बातमी आणली म्हणावयाची! पण त्या तोडरमल्लनें उदेसिंहला पाठविलेल्या पत्राचा मतलब काय होता, हें कोणाला सांगतां येईल काय?"

" तें कसें कळणार? आणि आतां तर तें अगदींच अशक्य!"

" काश्मीरवर करावयाची स्वारी आतां रहीत झाली वाटतें?"

" हो,—सध्यां तरी बादशहा काश्मीरवर जात नाहीं."

" बादशहा सध्यां सल्ला कोणाचा घेतात?"

" सध्यां जुन्या सल्लागारांचा सल्ला असतोच, पण फाझलचें नशीब जोरावर दिसतें!" जोरावरसिंग म्हणाला.

" आणि जोरावरसिंगचें?" अर्थपूर्णस्वरानें शास्त्रीजींनीं जोरावरसिंगलाच तिरक्या नजरेनें विचारलें.

" जोरावरसिंगचें नशीब जलालुद्दीनच्या नशिबाच्या अगदीं व्यस्त प्रमाणांत आहे." जोरावरसिंग तितक्याच गूढतेनें म्हणाला. पण या उत्तरावर ते तिघेहि आपापसांत हांसले.

" पण जलालुद्दीनला आतां शिक्षा झाल्याशिवाय रहाणार नाहीं."

" कोणी सांगावें?" रतनसिंह म्हणाला.

इतक्यांत मठांतल्या एका माणसानें बाहेरून दरवाजावर थाप दिली आणि शास्त्रीजींस हांक मारून एका विशिष्ट खुणेनें इशारा दिला.

शास्त्रीजींनीं त्याला आंत घ्यावयास सांगितलें. त्याच्या सांगण्यावरून समजलें कीं, बादशाही स्वार, कांहीं लवाजमा व बरीचशी मंडळी मठाकडे येत आहेत. तें ऐकतांच सर्वांनाच आश्चर्य वाटलें. पण आश्चर्यांत वेळ घालवून बसण्याची ती संधि नव्हती. कारण रतनसिंगला कोणालाहि कळणार नाहीं अशा खबरदारीनें दडवून तरी ठेवला पाहिजे होता, किंवा त्याला पळून तरी गेलें पाहिजे होतें. पळून जाण्यास आतां अवकाश नव्हता व तसें करणें धोक्याचेंच झालें असतें. अर्थात् त्याला दडवून ठेवणेंच योग्य वाटलें. त्याप्रमाणें रतनसिंगाला दडून रहावें लागलें. आणि शास्त्रीजी व जोरावरसिंग बाहेर आले.

इतक्या वेळांत ते लोक बरेच जवळ आले होते. थोड्याच वेळांत तें सर्व लटांबर

मठापाशीं येऊन पोंचलें. मठाधिपति शास्त्रीजींनीं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत गर्दी उडवून देऊन बैठकी वगैरे घालून त्यांच्या स्वागताची तयारी केली.

यथोचित स्वागत वगैरे झाल्यावर एक बादशाही खलिता शास्त्रीजींच्या हातीं देण्यांत आला; व कांहीं देणग्याहि त्यांना अर्पण करण्यांत आल्या.

त्यांना असेंहि समजलें कीं, धर्मविवादाच्या बादशाही सभेची स्वतंत्र इमारत लवकरच उघडावयाची असून या सभासदमंडळांत शास्त्रीजींची नेमणूक लवकरच व्हावयाची आहे. पण तोंपर्यंत सोबत पाठविलेल्या मुलास हिंदुधर्मशास्त्राची माहिती करून द्यावयाची, व हिंदु ब्राह्मणांच्या नैमित्तिक कर्मांत त्यास बसूं द्यावयाचें.

हा शेवटचा प्रश्न शास्त्रीजींस मान्य करणें कांहींसें अवघड वाटत होतें. तथापि तें त्यानें त्या वेळीं नाकारलें मात्र नाहीं. बादशहाच्या सर्व आज्ञा आपणांस शिरोधार्य आहेत असें शास्त्रीजींनीं सांगून पाठवलें व आपला आशीर्वादप्रसादहि बादशहास उलट भेट म्हणून पाठविला.

पण हा मुलगा कोण? हा मुलगा दिसतांना सुस्वभावी व पाणीदार डोळ्यांचा दिसत आहे. पोषाख सुद्धां ब्राह्मणी थाटाचा दिसतो. त्याच्या चेहऱ्यावर बुद्धिमत्तेचें तेज दिसतें आणि वर्तनानें तो विनयशील दिसतो. त्याच्या मस्तकाकडे एकाद्या सामुद्रिक शास्त्रवेत्त्यानें पाहिलें असतें, तर त्यानें हा मुलगा तत्त्वज्ञानी, विद्वान् व लौकिकवान् होणार असें भविष्य केलें असतें. पण तो मुलगा कोण?

त्यांची संभावना केल्यावर ते बादशहाचे लोक फिरून जावयास उठले. शास्त्रीजींच्या मठास एकादे वेळीं भेट देण्याची बादशहाची इच्छा आहे असेंहि जातांना त्यांनीं म्हटलें. तें ऐकून शास्त्रीजींस फारच आनंद झाला व त्यांनीं त्याच वेळीं आमंत्रणहि देऊन टाकलें. कांहीं वेळानें अशा प्रकारें निरवानिरव झाल्यावर ते लोक निघून गेले, पण शास्त्रीजींचे रजपूत अनुयायी व शिवशर्मा व त्यांच्याचसारखे आणखीहि कांहींजण आश्चर्यांत बुडून गेले. शास्त्रीजींच्या चरित्रावर गूढपणाचीं दिवसेंदिवस अधिकाधिक पुटें चढत चाललीं.

आलेले लोक निघून गेले. पण तो मुलगा मात्र तेथेंच राहिला. दोन तीन व्यक्तींशिवाय तो मुलगा कोणाचा कोण हें कोणासहि ठाऊक नव्हतें! हा शास्त्रीजींचा नवा शिष्य कीं काय? असेल, शिष्यहि असेल; पण तो मुलगा कोणाचा?

# प्रकरण दहावें.

## भविष्यवाणी !

तो मुलगा कोण होता हें सांगितल्याशिवायही कळण्यासारखें आहे. त्याला एकदां पाहिल्यावर तेव्हांच ओळख पटण्यासारखी आहे. तो मुलगा म्हणजे फैझी; शेक मुबारिकसाहेबांचा द्वितीय चिरंजीव फैझी तो तोच.

पण फैझी हा मुसलमान मुलगा ना ? तो हिंदूंच्या वेषांत ? आणि एका हिंदूच्या मठांत विद्याध्ययनाकरितां आला ? हें आश्चर्य नव्हे काय ? त्याचा बाप त्या काळचा एक उत्तम शिक्षक आग्र्याच्या पाठशाळेवर शिकवीत असतां फैझीला दिल्लीला कां यावें लागलें ? बरें दिल्लीला आला तर आला. दिल्लीच्या मशिदीला जोडून फारशी पाठशाळा असतांना तो शहराच्या बाहेर एकाबाजूस बसलेल्या या विश्वंभर शास्त्रीबोवांच्या मठांत काय म्हणून येतो ? हें काय आहे गौडबंगाल ? हें गौडबंगाल तुम्हांआम्हांलाच नव्हे, तें सर्वांनाच आहे. आणि हें गौडबंगाल याच्याहून जास्त जास्त वाढत जाणार आहे.

त्या काळीं मोंगली राज्यांत फारशी पाठशाळा होत्या, तशाच हिंदूंच्या संस्कृत पाठशाळाही होत्या. पण एकाद्या ठिकाणीं जर एकच पाठशाळा असली, तर हिंदु-मुसलमानांचीं मुलें त्या एकाच पाठशाळेंत शिकत असत. शिवाय राजभाषेला जो मान असतो, तो दुसऱ्या भाषेला--मग ती कितीहि संपन्न असो--कधींहि असत नाहीं. ज्या देशांत, ज्या काळीं, जी राजभाषा असेल तिच्या सासुरवासाखालीं त्या देशांत, त्या काळीं इतर भाषांना सेवावृत्ति पत्करून रहावें लागतें. त्यांना कोणीहि पुढें येऊं देत नाहीं. त्यांना आपली सद्दी येईपर्यंत अज्ञातवासांतच दिवस काढावे लागत असतात. त्याचप्रमाणें त्यावेळीं देखील जरी संस्कृतपाठशाळा असल्या, तरी त्या संस्कृत पाठशाळांमधून देखील फारशी भाषेचें शिक्षण हिंदु मुलांस दिलें जात असे. उलटपक्षीं मुसल्मान मुलांस संस्कृत भाषा शिकण्याची मात्र जरूर वाटत नसे. विद्याव्यासंगी मुसल्मान ज्ञानलालसेनें संस्कृत भाषेचें अध्ययन करीत असत. पण तीं त्यांची आवड म्हणून.

तेव्हां यावरून एवढें समजून येईल कीं, बहुधा सर्वच हिंदूंना आरंभीं शिकावें लागे. त्याचप्रमाणें कांहीं ज्ञानपिपासु मुसलमानांना संस्कृत शिकावेंसें वाटत असे. संस्कृत जाणणारे लोक आरबी व फारशी शिकूं लागले, त्याचमुळें उर्दू भाषा व त्यानंतर आतां हिंदी भाषा या दोन भाषा अस्तित्वांत आल्या आहेत. अस्सल फार-

शींत संस्कृतचें मिश्रण झालें, आणि ही उर्दू भाषा जन्माला आली. फारशीचें प्रमाण फार कमी आणि संस्कृताचें प्रमाण फार वाढलें आणि ती उर्दूची हिंदी भाषा नव्या अवतारांत निर्माण झाली. तेव्हां मोंगल राजवटीमुळें पूर्वी सांगितल्याप्रमाणें जशा कला हिंदुस्थानांत भरभराटल्या, तशाच या दोन तीन भाषाहि हिंदुस्थानांत वाढूं लागल्या.

आतां आज या विश्वंभरशास्त्रीजींच्या मठांत शेकमुबारिक यांचा मुलगा फैझी जो येऊन दाखल झाला तो तर मग केवळ संस्कृत शिकावयाच्या तीव्रतर लालसेनेंच कीं काय एवढें पहावयाचें राहिलें.

फैझीला संस्कृत आवडत होतें हें आपणाला पूर्वीपासून ठाऊक आहेच. त्याला वाचनाची अभिरुचि होती. ज्ञानांत व विद्येंत त्याची प्रगति होऊं लागली, तसतशी हिंदी तत्त्वज्ञान शिकण्याची त्याची जिज्ञासा अधिकाधिक वाढत चालली. पण इतकें झालें तरी एवढ्याचमुळें केवळ तो आपण होऊन या शास्त्रीजींच्या मठांत येऊन दाखल झाला होता असें मात्र नाहीं. तसेंच जर असतें, तर मग त्याच्याबरोबर ते बादशहाचे लोक कां आले असते ? तेव्हां हें प्रकरण कांहीं निराळेंच होतें, यांत मुळींच शंका नाहीं.

कसेंहि झालें तरी या प्रकरणामुळें मात्र जिकडेतिकडे बरीच खळबळ उडाली. कित्येक कडव्या मुसलमानांना या गोष्टीचा फारच क्रोध आला. बदाउनीसारख्या मुत्सद्दयांच्या आंगाचा तिळपापड होऊं लागला. कांहीं महिन्यांपूर्वी फाझलला इतमाम मिळाला होता, आणि आतां या फैझीला विश्वंभरशास्त्र्याच्या मठांत आणून ठेवण्यांत बादशहाचाच हात होता, असा लोकांस—म्हणजे अर्थात् असल्या खोल विचार करणाऱ्या संशोधक मुत्सद्द्यांस—संशय येऊं लागला होता. पण तो संशय खरा होता काय ?

खरा नव्हे, असें तरी कसें म्हणावें ? कांहीं दिवसांपूर्वी आम्हाला सुभेदारांमार्फत शेकसाहेबांना बोलावणें गेलें. शेकसाहेबांची वृत्ति कोणत्याहि फेरफारानें बदलून जाणारी नव्हती. आपला वडील मुलगा फाझल हा दौलतीवर चढला, एवढ्यानें दुसरा मनुष्य चढेल बनला असता, पण मुबारिकसाहेब तशा वर्गांतले नव्हते. त्यांचा शिक्षणदानाचा व तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाचा व्यासंग अखंड चालू होता. त्यांना थोडथोडें संस्कृत येऊं लागलें होतें. शिवशर्म्याकडून घेतलेली पोथी लावण्यांत, तींतील मजकुराचा फारशी तर्जुमा करण्यांत त्यांचा बराच वेळ जात असे. शिवाय ज्या बैराग्यानें त्यांच्या प्रियकर फैझीला प्राणदान दिलें होतें, त्या बैराग्याचाही त्यांना त्या दिवसापासून एक प्रकारचा ध्यास लागला होता. ते त्या ठिकाणीं नेहमीं जात व त्याची मार्गप्रतीक्षा करीत, तथापि तो त्यांना त्यानंतर कधींच दिसला नाहीं, कीं कोणी पाहिल्याचेंहि त्यांना सांगितलें नाहीं. ते मात्र चौकशी करीत असत.

अशा प्रकारें त्यांचे दिवस चालले असतां त्यांना फैझीसह येण्याबद्दल सम्राट्-शहाचें बोलावणें आलें. बादशहाशीं मुलाखत झाल्यावर त्यांनीं अंगीकारलेलें व थोडें-बहुत पार पाडलेलें आपलें कार्य बादशहांच्या नजरेस घातलें. बादशहांची स्वारी खुष झाली. त्यानंतर बादशहानें शेकसाहेबांस पहिल्या प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें पुनः एक-वार एकांतांत नेऊन फैझीला आपल्या स्वाधीन करावयास सांगितलें. मात्र पुढचा बेत त्यानें त्यांस कळविला नाहीं. फैझीला शिकेल तेवढें शिकूं द्यावयाचें व त्यास फार मोठा विद्वान् करावयाचें आपलें मनोगत आहे, एवढेंच त्यानें त्यावेळीं शेकसाहेबांस कळविलें होतें. शेकसाहेबांस तो एक मोठा अनुग्रहच वाटला व त्यानें कृतज्ञतापूर्वक आपली अनुमति दर्शविली. इतकें झाल्यावर फैझीला पूर्वी लिहिल्याप्रमाणें विश्वंभर-शास्त्रीजींच्या मठांत रवाना करण्यांत आलें. पण पाठविण्यापूर्वी मठांत वावरतांना विशेषेंकरून कोणकोणत्या गोष्टी शिकावयाच्या, कसकसें वागावयाचें व काय काय ध्यानांत ठेवावयाचें याविषयीं अनेक महत्त्वाच्या सूचना स्वतः दिलेल्या होत्या. त्यामुळें फैझीचें मन त्या गोष्टीस तयार झालें होतें, तथापि तें बावरलेलें होतें इतकें खरें.

फैझीला आपलें आतां भवितव्य काय होणार हें कळत नव्हतें. बादशहाचा या बाबतींत काय उद्देश आहे, हेंहि त्यास समजेना. पण आपणास सवन बनवून बादशहास कांहींतरी साध्य करावयाचें आहे, एवढेंच त्यास कळत होतें. तो मातृ-पितृभक्त मुलगा होता. तो आतां हळुहळू तारुण्यांत प्रवेश करूं पहात होता. तो फार धर्मनिष्ठ होता, तसाच राजनिष्ठहि होता. राजाची आज्ञा मोडणें बरें नाहीं, एवढें त्यानें ठरवून टाकलेलें होतें. अकबरशहांच्या सूचनेप्रमाणें त्यानें आपलें वर्तन ठेवण्याचा निश्चय केला होता व त्याप्रमाणें वागण्यास त्यानें सुरुवातहि केली.

शेखसाहेबांना देखील फैझीला बादशहाच्या स्वाधीन केल्यावर चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागलें होतें. आपण केलें हें बरें कीं वाईट हें त्यास समजेना. बादशहा फैझीला आपल्याजवळ ठेवून घेणार असा त्याचा पहिला अंदाज होता. कदाचित् जवळ नाहीं ठेवला तरी दुसऱ्या कोठल्या तरी पाठशाळेंत पाठवील. पण शास्त्रीजींच्या मठांत त्यास पाठवील असा तर्क मात्र त्याचा कधींहि वाहिला नव्हता. पण असा प्रकार घडून आल्यावर बादशहाच्या हेतूविषयीं त्याचें मन साशंक होऊं लागलें. क्षणोक्षणीं असें त्याला वाटे कीं त्या बैराग्यास भेटून, त्याचे पाय धरून आपल्या फैझीचें भवितव्य त्यास विचारून घ्यावें. शिवाय शेकसाहेबांच्या जिवास रुखरुख लावणारी आणखी एक गोष्ट घडली होती. ती अशी कीं, ज्या मुलानें तक्रार केल्याबद्दल त्या शंकेखोर मुलास इतर दोन मुलांबरोबर बैराग्याकडून प्राणदान मिळालें होतें, त्या मुलानें त्या तक्रार करणाऱ्या मुलाचा व शेकसाहेबांच्या दोघांपैकीं एका मुलाचा आपण सूड उगविणार अशी प्रतिज्ञा वाहिल्याची एक वार्ता त्यांना समजली होती; व

त्या मुलानें ही पाठशाळा सोडून देऊन पोबारा केल्याचें कळल्यामुळें त्यांच्या भीतीला एक प्रकारचा आधार मिळाला होता.

ह्या शंकेखोर मुलाचें नांव हुसेन असें होतें. त्याचीं आईबापें सच्छील पण अगदीं गरीब होतीं. आपल्या मुलानें विद्याभ्यास करून नोकरीचाकरी अगर रोजगार-धंदा करून म्हातारपणांत आपणांस पोसावें अशी त्यांची स्वाभाविक अपेक्षा होती. या गरीब कुटुंबाला शेकमुबारिकचाच आधार असे. मुलाच्या दुर्वर्तनाबद्दल मुबारिकच्या पायां पडून त्याचें दुखवलेलें मन सुप्रसन्न करण्याकरितां त्या गरीब नवराबायकोनें डोळ्यांचें पाणीहि खळूं दिलें नाहीं. एवढ्याचकरितां शक्य असूनहि त्या दुर्वर्तनी व व्रात्य मुलाचा बंदोबस्त शेखमुबारिकनें केला नाहीं. शिवाय अपकाराची फेड उपकारांनीं करावयाचें उदारतेचें शील शेखसाहेबांचें होतें. पण या त्यांच्या दयाशीलत्वानें त्यांचा वैरी दुसरीकडे वाढत होता व तो त्यांचा घात करावयाची संधि साधण्यासाठीं वाघासारखा टपून बसला होता ! या असल्या शत्रुत्वाला कारण तरीं किती क्षुल्लक ! पण दुर्जनाला वैर करावयाला क्षुल्लक कारण देखील लागत नाहीं. त्याच्या कुजक्या दुष्ट मनानें ठरविलें कीं एखाद्याचें वैर करावयाचें, कीं बस्स ! तेवढेंच कारण त्यांस पुरतें. मग लागले आपल्याला लागतील ते निंद्य उपाय योजायला. त्यांच्या मनाची घडणच परमेश्वरानें तशी केलेली आहे. त्याला त्यांचा तरी बिचाऱ्यांचा काय इलाज ?

हुसेन घरांतून नाहींसा झाला, तो कित्येक दिवस परत घरीं आलेला नव्हता. त्याचीं आईबापें त्याच्या नांवाचा जप अहोरात्र करीत काळ कंठीत होतीं. कित्येक दिवसांनीं तो फिरून घरीं आला, तेव्हां त्याच्या आंगावर चांगले कपडे व खिशांत थोडींशीं नाणींहि होतीं. तो घरीं आला, तो रात्रौ चोरासारखा आला, आणि फिरून निघाला तोहि एक दिवस राहून दुसऱ्या दिवशींच्या रात्रींच्या काळोखांतच ! आई-बापांना आठ दहा दिवस खायलाप्यायला पुरतील एवढींच नाणीं त्यानें जातांना आपल्या बापापाशीं दिलीं होतीं. जातांना त्यानें आपल्या आईबापांना जें कांहीं सांगितलें तें ऐकून मात्र त्या वृद्धांच्या हृदयास जबरदस्त धक्का बसला. त्यानें लवकर जाऊं नये म्हणून त्या प्रेमळ म्हाताऱ्यांनीं त्याच्या पुष्कळ विनवण्या केल्या, पण त्यानें त्यांचें मुळींच ऐकलें नाहीं. आपण लवकरच श्रीमंत होऊं असें तो म्हणाला.

" मला आतां थोड्याच दिवसांत पुष्कळ पैसा मिळूं लागेल. मग आपण श्रीमंत होऊं. तुम्ही मात्र शेखमुबारिकच्या हातचा एक दाणाहि ग्रहण करतां कामा नये. त्याच्याकडचें एक नाणेंहि कधीं घेऊं नका. त्यापेक्षां उपाशीं मेलेलें परकरलें; पण त्या दुष्टाच्या हातचें अन्न मात्र कधींहि घेऊं नका. त्याचा गळे उतरून जाण्याइतका मी त्याचा चांगलाच सूड उगवणार आहें ! मग तो खुद्द बादशहाच्या कृपाछत्राखालीं असो कीं बादशहाच्या आधाराला असो. तसेंच त्या दुसऱ्या पोराचाहि सूड—"

पुढचे शब्द तो बोलला नाहीं. त्याचे ओंठ थरथरूं लागले. त्याचीं आईबापें मूक रुदन करीत आंसवें ढाळीत बसलीं होतीं. आपल्या आडदांड मुलाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगांत नाहीं, हें तीं जाणून होतीं. पण मुलाला लागलेले गुण आत्मनाशाचे आहेत हें त्यांना कळत होतें. म्हणून त्यांच्या हातानें काम होणार होतें ? पुष्कळ दुष्टबुद्धीच्या तरुणांच्या हितचिंतकांना व वडील माणसांना कळत असतें कीं आपलीं पोरें आत्मनाशाला सजलीं आहेत, पण तीं थोडींच त्यांना आवरतां येतात ? आवरतां येण्यासारख्या स्थितींत तीं दुर्बुद्ध पोरें असतील, तर त्यांची बुद्धि पालटून तीं सद्गुणी होतील व त्यांचा विनाश टळेल. पण तसें व्हावयाचें भवितव्यच नसतें. तेथें कोणाचाच इलाज नसतो.

हुसेन निघून गेला. तो आला आणि निघून गेला, इतकेंच वर्तमान शेख-मुबारिकला त्या गरीब सत्वस्थ दांपत्याकडून समजलें. पण आपल्या उर्मट पोराची ती दुष्ट प्रतिज्ञा मात्र त्यांना त्या साधुपुरुषाच्या कानांवर घालण्याचें नैष्ठुर्य त्यावेळीं तरी करतां आलें नाहीं. ती दुष्ट प्रतिज्ञा शेकसाहेबांना सांगावी कीं सांगूं नये याचा खल त्या दोघांनीं आपल्याशीं केला आणि ठरविलें कीं पोराच्या व्रात्यपणाला इतकें महत्त्व देण्याचें कारण नाहीं. आहेत दोन दिवस रागाचे तोंपर्यंत बहकेल आणि मग येईल आपोआप ताळ्यावर. पण पोराला कसले गुण लागले होते आणि तो कसल्या व्यव-सायांत गढला होता, आणि त्याचे विचार कसे भटकत चालले होते याची कल्पना त्या सात्त्विक दांपत्यास कोठून असणार ?

पण शेखमुबारिकला त्या व्रात्य पोराची आठवण होती. त्यांना कधीं कधीं त्याची भीति वाटे व तो दुष्ट प्राणी आपल्या फाझलला अगर फैझीला अपाय करील अशी काळजीहि त्यांस वाटूं लागे.

आज देखील ते अशाच काळजींत बसले होते. इतक्यांत त्यांना त्या प्राणदात्या बैराग्याचें स्मरण झालें. हिंदु तपस्व्यांची ती अचाट मंत्रशक्ति पाहून त्यांना नवल वाटलें होतें. आतांहि तसेंच वाटलें. हिंदुधर्माबद्दल त्यांचा आदरभाव वाढूं लागला. हिंदु बैराग्यांना ते ईश्वरी अंश समजूं लागले. सत्त्वनिष्ठ, फकीर आणि हिंदु वैरागी त्यांना सारखेच पूज्य भासूं लागले; किंबहुना हिंदु बैराग्यांविषयींची पूज्यता त्यांची दरदिवस अधिकाधिक वाढत चालली.

यावेळीं त्या बैराग्याची ती भव्य शरीरयष्टि, तो मस्तकावरचा जटाजूट, तें भस्मविलेपन, तो कमंडलु, ती कौपीन, तें मृगचर्मवेष्टन ! आणि अहाहा ! काय ती मूर्ति ! शेखसाहेबांची वृत्ति तदाकार होऊन गेली. पण यावेळीं तो बैरागी कोठें होता?

श्रीकाशीक्षेत्रांतील गंगातीराजवळच्या एका बाजूस तो तरुण बैरागी आपल्या पोक्त गुरूसमोर होता. गुरु गृहस्थाश्रमी होते. गृहस्थाश्रमाचा त्याग त्यांनीं अद्याप केला नव्हता. त्यांची एक कन्या घरीं होती. ते आपला गृहस्थाश्रम कसाबसा चाल-वीत होते. ईश्वराराधनेंत त्यांचा बराच काळ जात असे. या शिष्याला मंत्रप्राप्ति

झाल्यानंतर त्यानें गुरूच्या आज्ञेनें अखंड ब्रह्मचर्य पाळण्याचा बेत ठरविला होता. त्याची तपश्चर्या अचाट होती. त्याचें तेज तसेंच असामान्य होतें. आपल्या गुरुदेवतेसमोर तो हात जोडून उभा होता. एकंदर परिस्थितीकडे पाहिलें असतां कोपलेल्या गुरुदेवतेची आराधनापूर्वक क्षमा मागण्यासाठीं व त्यास सुप्रसन्न करण्यासाठीं त्यानें प्रार्थना चालविली होतीसें दिसलें असतें.

प्रेमळ गुरुमाउली ! शिष्याच्या अपराधानें प्रथम कोपाविष्ट झाली, तरी पुन्हां तितकी कृपाविष्ट झाली. शिष्याचे अपराध पोटांत घालण्यास गुरुमाउली तयारच असते. मनाला किंचित् शांति प्राप्त झाल्यावर गुरुमाउली आपल्या प्रिय शिष्याला उपदेश करूं लागली.

तो प्रभातकालचा शांत समय होता. खालून गंगेचा प्रवाह संथपणें वहात होता. आकाशांतील तारागण आपल्या आंगचा धवलिमा थेंबाथेंबांनीं हिमगिरीवरील हिमाला अर्पण करीत होता. विस्तीर्ण जगतीतलावर शीतलता पसरण्यासाठीं वायूहि याच वेळीं आपल्या अदृश्य आंगांत शीतलतेची यथेच्छ सांठवणी करून घेत होता. सभोंवतालचें वातावरण प्रभातकालीं फार सुप्रसन्न दिसत होतें. अरुणरागाची ध्वजपताका कर्मनिष्ठ योग्यांना अर्घ्यदानाची ओंजळ अर्पण करण्याचा समय प्राप्त झाल्याचें सुचवीत होती; आणि लक्षपूर्वक कान देऊन ऐकल्यास आसपास कोठें कोठें अस्पष्ट मंत्रोच्चारांचा ध्वनि मधून मधून ऐकूं येण्यासारखा होता. अशा शांत काळीं गुरुशिष्यांची जोडी एकमेकांसमोर एकमेकांकडे पहात होती. गुरुमाउली आतां काय बोलावें या विचारांत होती, तर शिष्य गुरुमाउली आतां काय बोलतात, तें ऐकण्यास आतुर झाला होता.

" झाला हा प्रकार घडून गेला. म्हणून आतां त्याबद्दल रागावून अगर बोलून घडलेली गोष्ट फिरून मागें येत नाहीं. पण आपल्या मंत्रशक्तीचा उपयोग तूं असा करतां नये होता. ईश्वरी इच्छेनें घडणाऱ्या गोष्टींना आपण कधींहि आळा घालतां कामा नये. बाकी सारें असो, पण तूं एका दुष्ट प्राण्यालाहि जीवदान दिलें आहेस ! "

" पण महाराज ! तो देखील जिवंत व्हावा अशीच नियति नसेल कशावरून ? "

" होय, तशी नियति होती म्हणूनच तुला तेथें जाऊन त्याला जिवंत करण्याची बुद्धि झाली. पण तो पहा—तो पहा तो सरपटत जाणारा एक प्राणी; त्या गंगातीरावर पडला आहे, तडफडत आहे. त्याला वांचवणें योग्य नाहीं काय ? जा आणि त्याला वांचवून ये. जा, त्याला जिवंत करून ये, जा. "

शिष्य लागलींच निघाला. त्यानें आपल्या कमंडलूंतील पाणी मंत्रून त्या प्राण्यावर टाकलें, आणि काय आश्चर्य, तो तडफडणारा जलचर प्राणी तेथल्या तेथेंच मरून पडला आणि तो शिष्य अधोवदन होऊन गुरुजींपाशीं मागें परतला.

त्याच्यानें तोंड वर करवत नव्हतें. आतां गुरुजी पुढें काय बोलणार हें त्यानें जाडलें. आपल्या मंत्रशक्तीचा अस्त झाला हें त्याला समजलें. तो अर्धामेला झाला. त्याला पूर्ण पश्चात्ताप झाला.

" काय ? तो प्राणी अद्याप जिवंत कां नाहीं झाला ? " गुरुजींनीं प्रश्न केला. पण शिष्य खालीं मान घालून स्तब्ध होता.

" तुझ्या मंत्राची शक्ति कोणीं हरण केली ? "

" अविचारानें आणि दुरुपयोगानें. "

" असें कसें ? मरणाऱ्या प्राण्याला उठवणें ही भूतदया नव्हे काय ? "

" नेहमींच नव्हे; ईश्वरी नियंत्रणेला प्रतिबंध करण्यासारखें तें कृत्य आहे ! "

" भले शाबास ! अशा कृत्याचा परिणाम काय होतो ? "

" ईश्वरी शक्तीचा रोष, मंत्रशक्तीचा ऱ्हास आणि पुण्यक्षय ! "

" भले शाबास ! आपल्या योग्य उत्तरांनीं तूं मला संतुष्ट केलें आहेस. मीं तुला तुझ्या अपराधाची क्षमा केली आहे. झाल्या गोष्टी नियतीप्रमाणेंच झाल्या; पण ही गोष्ट लक्षांत आली नसती तर तुझ्या हातून आणखी अपाय घडले असते. बाकी घडलें हें देखील ईश्वरी इच्छेनेंच घडलें आहे. तूं पुन्हां तपश्चर्येला जाऊन बैस. तुझी मंत्रशक्ति ऱ्हास पावून खलास होऊन गेली आहे. पण त्याबद्दल आतां खेद करीत न बसतां ईश्वराकडे क्षमा मागून पुनः तपश्चर्येला जाऊन ध्यान लावून बैस. "

" महाराज—"

" समजलों ! तुझ्या मनांत कोणती शंका आली आहे, तें मला समजलें. त्याचें निवारण असें—"

पण मध्येंच ते किंचित्काल बोलावयाचे थांबले. त्यांनीं डोळे मिटून ध्यान केलें. तशा स्थितींत थोडासा वेळ गेल्यावर ते आपल्या शिष्यास उद्देशून म्हणाले—

" ती स्त्री उठल्यामुळें बादशहाला एका अपराधी मनुष्याला दंड करणें सोपें जाईल. तो मुलगा उठल्यामुळें एक सज्जन मनुष्य जगाला लाभेल; आणि तो दुसरा मुलगा उठल्यामुळें एका सज्जन मनुष्याचा अंत होईल व आणखीहि अपकृत्यें घडतील. पण हें काय ? या घडामोडीचा प्रकार खुद्द माझ्याशीं देखील येऊन भिडणार आहे ! "

गुरुजींची चर्या एकाएकीं बदलत चालली. शिष्याला वाटलें कीं, गुरुजींच्या नेत्रांसमोरून भविष्यकालाच्या पोटांतील होण्यमाण गोष्टींचा चित्रपट अगदीं ठळक ठशांत हळूहळू चालला आहे. ते आतां आणखी आतां काय काय बोलतात तें ऐकण्यांत त्याला गंमत वाटूं लागली.

" बादशहाला तूं माझें नांव देखील सांगून टाकलें म्हणतोस ना ? " गुरुजींनीं विचारलें

" होय महाराज ! " नम्रतापूर्वक शिष्य म्हणाला.

" मोठी चूक केलीस ! "

शिष्य गप्पच राहिला. त्यानें पुन्हां खालीं मान घातली. गुरुजी डोळे मिटूनच बसले होत. ते पुन्हां बोलूं लागले.

" तुझी तरी चूक कसली त्यांत? या कारस्थानाचा संबंध माझ्यापर्यंत येऊन ठेपेल असें दिसतें. तथापि भगवान् सांगतात त्याप्रमाणें आम्हां मनुष्य प्राण्यांना अज्ञात असलेल्या गोष्टी पूर्वींच परमेश्वरी इच्छेनें ठरलेल्या असतात. मला एवढेंच दिसतें आहे कीं, बादशहाच्या कारस्थानाचा संबंध माझ्यापर्यंत येऊन पोंचणार, पण तो कसा आणि कोणत्या स्वरूपाचा असणार हें मला दिसत नाहीं,—मुळींच दिसत नाहीं. प्रयत्न करून दिसलें, तरी तें पाहण्याची माझी इच्छा नाहीं. जग हें परमेश्वराचें क्रीडांगण आहे. मात्र स्वतः अलिप्त राहून तो या बाहुल्यांच्या करवीं हा खेळ सुरू करून आपण पहात बसतो. त्याच्या योजनेप्रमाणें खेळाचे डाव सुरू असतात. म्हणूनच माणसानें आपल्या पाळीचा डाव खेळला पाहिजे. त्यांतील यशापयशाचे भोक्ते आपण नव्हे, हें या बाहुल्यांना समजलें पाहिजे. तथापि सन्मार्गानें आणि न्यायानें एकादें बाहुलें ममत्व धरून आपला डाव खेळूं लागलें कीं, त्याचा डाव यशस्वी व्हावा असें खेळ पहाणाऱ्याला देखील वाटणें साहजिक आहे. उलटपक्षीं दुसऱ्याचा नाश करून आपलें कल्याण साधूं पहाण्याच्या दुष्ट इराद्यानें खेळ खेळण्याचें ममत्व एकाद्या बाहुल्यानें धरलें तर तें खेळ पहाणाराच्या मनांत तिटकारा उत्पन्न केल्याशिवाय राहणार नाहीं. आपापली भूमिका नीट बजावून प्रेक्षकास खुष करणें हें क्रीडांगणावरील नटाचें कर्तव्यच आहे. रंगभूमीवर असेपर्यंत धारण केलेल्या वेषाला साजेसा अभिनय न केल्यास ती चूक होईल व त्याबद्दल सूत्रधाराच्या रोषास पात्र व्हावें लागेल. या जगद्रंगभूमीवर सूत्रधार आणि प्रेक्षक एकच आहे आणि तो परमेश्वर आहे. तो अनेकरूपें नटला आहे. निरनिराळ्या युगधर्मांच्या वेळीं निरनिराळ्या रूपांनीं प्रगट होऊन त्या त्या देशकालपरिस्थितीप्रमाणें त्यानें धर्माज्ञा घालून दिल्या आहेत. त्या धर्माज्ञा पाळीत असतां सारासार-विवेकशक्तीचा लोप होऊं देणें इष्ट नाहीं. पण हाय—"

गुरुजींनीं दीर्घ श्वास सोडला !

गुरुजींना दीर्घ सुस्कारा सोडण्यासारखें काय वाटलें हें न समजल्यामुळें शिष्य सचिंतमुद्रेनें त्यांच्याकडे पाहूं लागला.

" हिंदुधर्मावर केवढीं गंडांतरें पुढें येणार आहेत हीं ! हें पाहिलें कीं, छाती दडपून जाते. पण या गंडांतरांमुळेंच हिंदुधर्माचा विजयध्वज सर्व विश्वांत अक्षय्य फडकत रहाणार आहे. हिंदुधर्म परधर्मसहिष्णु आहे, तो दुसऱ्यांचा अकारणद्वेष करणारा नाहीं. तो सख्यशील आहे. त्याला गांजणाऱ्यांना—आपला छळ करणाऱ्यांना देखील तो आपले मित्र बनवील. हिंदुधर्माचा जितका अधिक छळ होईल तितका तो

अधिक प्रभावी बनणार आहे. म्हणूनच त्याच्यावर अनेक आपत्ति आणण्याचा विधि-संकेत दिसतो. आपल्यावर एका मागून एक अनेक अपरिहार्य संकटें, आपला त्यांत हात नसतां, येऊं लागलीं कीं, नीतीवरील निष्ठा ढळूं न देतां सहन करीत व त्यांच्याशीं टकरा देत रहावें आणि त्याच वेळीं खूणगांठ बांधावी कीं, या वादळांच्या मागून परमेश्वरी शांत तेज प्रगट होणार आहे. आपल्या आवडत्या भक्तांवरच तो संकटें आणतो. संकटें हें त्याचें आगमन–सूचक पूर्वचिन्ह आहे. त्यांना न डगमगतां धैर्यानें तोंड दिलें पाहिजे. ''

डोळे मिटूनच गुरुजी शांतपणें बोलत होते.

'' विराट्स्वरूपी परमेश्वराचा एक अवतार पाहिला, तोच खरा, दुसरा खोटा असें मानणें योग्य होणार नाहीं. एक सोंड, एक कान, एक पाय, अगर एक शेपटी म्हणजे कांहीं तेवढा अवयवच सगळा हत्ती होत नाहीं. सगळे अवयव त्या एका हत्तीचे आहेत. तसेच सगळे धर्मावतार एका चिच्छक्तीचे आहेत. त्याच्या निरनिराळ्या काळच्या धर्मांशांत परस्परांचीं मनें न दुखवितां एकवाक्यता करणें हें शहाणपणाचें आहे. श्रीकृष्ण, झरथुष्ट्र, खिस्त आणि महंमद हे सर्व एकाचेच अंशभाग आहेत आणि हें सर्व मिळून एक आहे. हें, हे लोक कधीं शिकणार ? पण या बादशहानें हें तत्त्व ओळखलें आहे. म्हणूनच हा अकबर त्रिभुवनविख्यात बादशहा होणार आहे. याचीं बारीक सारीक विषम कृत्यें त्याच्या ह्या सद्वासनेमुळें लोपून जातील आणि त्याची उज्ज्वल कीर्ति मागें अखंड राहील. सर्व धर्मांची एकवाक्यता करण्याचा प्रचंड प्रयत्न आजवर कोणींहि केलेला नाहीं. तो करण्याचा याचाच हा पहिला प्रयत्न आहे व तो तसा होणें खरोखर इष्ट आहे. या त्याच्या प्रयत्नांत प्रत्येकानें त्याला सहाय्य करणें इष्ट आहे. पण त्याचेच अनुयायी त्याला या कामांत यश येऊं देणार नाहींत असा रंग दिसतो. तथापि पुढें ज्या ज्या वेळीं अशा कलागती होतील, त्या त्या वेळीं अनेक धर्म आपल्या ठिकाणीं रहिवासी करून घेणाऱ्या या उदार भरतखंडानें कसें वागावें एवढी चमक परमेश्वर अकबराच्या मिषानें हिंदुस्थानवासीयांना दाखवून देत आहे. हिंदवासीयांनीं सर्व धर्मांचें एकीकरण करणारीं तत्त्वें संकलित करून जर भरत-खंडाचा, राष्ट्रधर्म नांवाचा अभिनव धर्म बनविला तर भरतखंड साऱ्या विश्वांत अजिंक्य आणि प्रभावशाली बनेल. हिंदुस्थान ही परमेश्वराची आवडती भूमि आहे. त्या हिंदु-स्थानांत इतर कोणत्याहि देशापेक्षां त्याचे जास्त अवतार झालेले आहेत आणि सर्व राष्ट्रांचा आणि संस्कृतींचा संबंध या एकाच देशाशीं आला आहे, त्याच्याहि मुळाशीं ईश्वरी हेतु हा आहेच. पण हें लोकांना कसें उमगणार ? ''

तथापि ही त्यांची भविष्यवाणी आम्ही जगास सांगावी अशी त्यांची आम्हांस आज्ञाहि नाहीं. म्हणून त्यांच्या समोर हात जोडून उभा राहिलेल्या त्या शिष्याप्रमाणें आम्हीहि त्यांस हात जोडून त्यांची ऐकलेली ही भविष्यवाणी प्रगट केल्याबद्दल त्यांची

क्षमा मागतों. कदाचित् ही भविष्यवाणी आमच्या लेखणींतून स्वयंस्फूर्तीनें बाहेर पडण्यांत परमेश्वरी नियतीच कारणभूत असेल व ही भविष्यवाणी बाहेर पडल्यानें प्रिय हिंदभूमीचें कांहीं कल्याण व्हावें अशीच परमेश्वरी नियति असूं शकेल.

तथापि यापुढें त्या गुरुशिष्यांचें जें बोलणें झालें व त्या गुरुमाउलीनें आणखी अशींच पुढें खरीं ठरलेलीं व अजूनहि पुढें खरीं ठरणारीं जीं भविष्यें वर्तविलीं तीं आतां वाचकांस सांगणें योग्य होणार नाहीं. त्यांतील बऱ्याच गोष्टी खऱ्या ठरलेल्या इतिहासावरून दिसत आहेत व बाकीच्या अद्याप घडूनच यावयाच्या आहेत. शिवाय सर्वच बारीक सारीक गोष्टी आम्हीं याच वेळीं वाचकांस सांगून टाकल्या तर पुढील कथा लिहिण्याचें तरी प्रयोजन मग काय राहिलें? भविष्यकाळ अज्ञात राहण्यांत खरी गंमत असते. तो आधीं कळला तर जीवनांत स्वारस्य राहणार नाहीं, आणि प्रत्येक-जण आपलें उरलेलें आयुष्य टाकून देऊन प्रत्येकाला पुढील मरण आजच मरावेंसें वाटूं लागेल! भविष्यकाळाच्या जाणीवेनें जगावर कहर कोसळल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणूनच भविष्यकाळचें खरें ज्ञान तंतोतंत करून घेण्याचें कोणास साध्य होत नाहीं आणि ज्यास तें साधतें—अशी विभूति बहुधा क्वचितच एखादी असते—तो भविष्य कधीं कोणास कळविण्यास तयार होत नाहीं. पण भविष्य कळविण्यास जे तयार असतात, त्यांच्यापैकीं फार थोड्यांस तंतोतंत भविष्य फारच अल्पप्रमाणांत कळत असतें. हीहि एक ईश्वरी नियतीच असेल!

ती परमपूज्य गुरुमाउली त्या वेळीं शिष्यासमवेत पुढें अशाच भविष्यकाळच्या भरतखंडाच्या, उन्नतीच्या, जीवाच्या, अध्यात्मिक उन्नतीच्या, परमेश्वरप्राप्तीच्या, जीवांच्या, इहलोकींच्या, कर्तव्यांच्या वगैरे अनेक गोष्टी बोलत राहिली होती. त्यांचा संवाद अहोरात्र तीन दिवस सारखा चाललेला होता. परंतु अखेरीस शिष्यानें तपः-समाप्ति होईपर्यंत संचार करावयाचें सोडून ध्यानस्थ होण्याचें ठरविलें आणि तसें त्यानें आपल्या पूज्य गुरुमाउलीच्या पायांना स्पर्श करून सांगूनहि टाकलें.

शिष्य जाऊं लागला, तेव्हां गुरुमाउलीचा कंठ दाटून आला. त्यांनीं त्याला पोटाशीं धरिलें; व सांगितलें.

" बेटा, ही भरतभूमि परमेश्वराचें लीलाक्षेत्र आहे. त्या या आपल्या मातृ-भूमीचें शुभ व्हावें यासाठीं परमेश्वराचा धांवा कर. जगत्कल्याण हें त्याच्यापुढचें ध्येय आहे. पण भारतदेशाच्या कल्याणांतच जगत्कल्याण सांठलेलें आहे. कारण भारत-देशाचें हित जगाच्या हिताविरुद्ध नाहीं. भारतदेश इतर देशांचा द्वेष करीत नाहीं. भारतदेश आपलें ज्ञान जगाला शिकवून जगाला शहाणा करीत आलेला आहे, आणि हें आपलें व्रत तो पुढेंहि चालविणार आहे. म्हणून भारतदेशाचें हित चिंतण्यांत मनाचा संकुचितपणा होत नाहीं. भारताचें कल्याण तेंच जगाचें कल्याण. जा, तुझी तपश्चर्या सुसिद्ध होवो ! "

# प्रकरण अकरावें.

## सतीची गुप्त हकीगत.

अकबरशहाला त्या बैराग्याकडून त्याच्या गुरूचें नांव व पत्ता कळल्यापासून त्या तपस्वी ब्राह्मणाचा शोध करण्याची त्याची इच्छा बळावत चालली. त्या रात्रीं, त्या मीनाबाजारच्या रात्रीं, त्या स्त्रीला जिवंत करून अदृश्य होणारा तो बैरागी फिरून कधींहि कोणाच्या दृष्टीस पडला नाहीं. शेख मुबारिक ज्याची वाट पहात होता तोही हाच बैरागी. शेख मुबारिक आणि खुद्द अकबर बादशहा या दोघांसहि त्यानें वेड लावलें होतें. पण तो स्वतः कोठें गेला होता ?

तो कोठें गेला होता तें मागील प्रकरणांत आलेंच आहे. तो आपल्या गुरुजींची आज्ञा घेऊन क्षय झालेल्या तपःसिद्धीचा पुनः संचय करीत होता. पण त्यानें मागें या दोघांजणांस वेड लावून टाकिलें होतें.

या दोघांशिवाय फाझल आणि फैझी या दोघांनाही त्याची आठवण होत असे, पण त्यांना पहिल्या दोघांसारखा त्याचा निदिध्यास लागला नव्हता. अकबरशहाला त्या बैराग्याच्या ध्यासाबरोबरच त्याच्या गुरूचाही ध्यास लागला हें त्यांत आणखी एक विशेष होतें. त्या बैराग्याचा जर एवढा प्रभाव, तर त्याच्या गुरूचा केवढा प्रभाव असेल ? शिवाय त्याचा पत्ताही आतां त्याला कळला होता. तेव्हां त्याला बोलावून आणावा असें त्यास वाटलें.

पण असले अवलिया राजाच्या बोलावण्याला जुमानणारे नसतात, हेंहि तो जाणून होता. तेव्हां आपणच त्याच्याकडे जावें, तर तेंही विनाकारण लोकचर्चेस कारण होईल आणि शिवाय आपला कार्यभागही साधणार नाहीं. यासाठीं निराळाच डाव टाकण्याचें त्यानें ठरविलें. फैझीला विश्वंभरशास्त्रीजींच्या मठांत पाठविणें हा त्या डावाचा पूर्वरंग होता. तो कसा हें मात्र कोणालाही समजण्यासारखें नाहीं. त्याचा उलगडा ओघाओघानें आपोआपच होत जाणार आहे.

ती वेडी बाई सावध झाल्यावर तिला औषधोपचार करण्यांत आले. वैद्यांकडून तपासून घेण्यांत आलें; व त्या तपासणींत आढळून आलें कीं तिच्यावर विषप्रयोग झालेला होता ! जोधबाईचा त्या बाईविषयीं अनुकूल ग्रह झाल्यामुळें ती तिच्याच

आश्रयाखालीं होती. ती सुंदर होती, तरुण होती, मधुरकंठाची होती, सुशील होती, पण हिंदु होती. हें शेवटचेंच कारण तिला जवळ करण्यांत जोधबाईला विशेष वाटलें असावें असें आजूबाजूचीं माणसें म्हणत. पण ती विधवा होती. आणि तिच्याजवळ असलेला एक गुंडाळलेला कपडा होता, त्याला ती कोणालाच स्पर्श करूं देत नसे. हकीम–वैद्यांच्या औषधोपचारांनीं शुद्धीवर येईपर्यंत कांहीं खाद्यपेय तिच्या पोटांत गेलें असेल तेवढेंच, पण शुद्धीवर आल्यापासून ती उपोषणें करूं लागली. महाराणी साहेबांचा फारच आग्रह झाला, तेव्हांपासून दिवसांतून एक वेळ थोडासा फलाहार अगर दूध सेवन करूं लागली. पण ती अन्न कधींहि घेत नसे. जोधबाईनीं तिला किती किती आग्रह केला पण ती आपली हकीगतहीं कधीं सांगत नसे. फक्त जलालुद्दिन नांवाच्या सरदारानें आपले हाल केले एवढेंच ती सांगत असे. आपल्याला वैधव्य त्यानेंच आणलें आणि आपली गांजणूकही त्यानेंच केली, इतकीच माहिती ती सांगे.

पण आतांशा त्या रजपूत स्त्रीनें जोधबाईशीं बोलण्याचेंहि सोडून दिलें होतें. त्यामुळें जोधबाईला वाईट वाटूं लागलें. ती बाई न बोलायला जोधबाईचेंच बोलणें कारण झालें होतें. जोधबाईनीं त्या बाईला तिच्या मनाविरुद्ध उपदेश चालविला होता; आणि तो कोणता ? तर पुनः विवाह करून सुखानें नवा संसार थाटण्याचा.

त्या स्त्रीचा सती जाण्याचा निश्चय ठरलेला होता. त्या तिच्या निश्चयाच्या आड जो कोणी येई त्याच्याबद्दल तिला मुळींच आदर वाटत नसे. जोधबाईसंबंधीं तिला जो कांहीं आदर होता, तोहि ती तिला सती न जातां पुनः लग्न करून सुखी होण्याचा उपदेश करूं लागल्यापासून नाहींसा होऊं लागला.

पण जोधबाई बोलत होती, ती स्वतःच्या मतापेक्षां अकबराचें मत बोलत होती, असें म्हणणेंच अधिक खरें होईल. जोधबाईच्या वाड्यांत दाखल झालेली ही रजपूत बाई म्हणजे राजकारणांतून निवृत्त झाल्यावर समाजकारणांत मन घालणाऱ्या अभ्यासी अकबराला आपल्या नव्या प्रघाताचें मनन करण्यास उत्तम विषय झालेला होता; आणि त्याप्रमाणें त्यानें विचार चालविलेलाहि होता.

सर्व इतिहासज्ञांस ठाऊक आहे कीं अकबरानें आपल्या राज्यांत सती जाण्याची चाल बंद केली होती. हा त्याचा कायदा चुकीचा अथवा वाईट असें कोणीच म्हणणार नाहीं. तथापि ज्या स्त्रिया पतिनिधनानंतर लग्न करण्यास तयार असतील, आणि असें असतां वारशाच्या अगर अन्य लोभानें ज्यांना सती जाणें त्यांचे आप्त, नातेवाईक भाग पाडीत असतील, त्यांच्या बाबतींत हा कायदा ठीक होता. पण पतिनिधनानंतर मृत्युलोकींचें वास्तव्य म्हणजे केवळ रौरव–नरकवास अशीच ज्यांची भावना; आपल्या प्रिय पतीशिवाय सर्व जगत् ज्यांना स्मशानासमान भासतें; पतिसहवासाशिवाय राहणें म्हणजे प्राणहीन कलेवराप्रमाणें अस्तित्व, असाच ज्यांचा प्रामाणिक अनुभव; पतीच्या कुलाचा उद्धार करणारा त्याचा वंश बालस्वरूपांत परिवर्धित करण्याची जिच्यावर अद्याप जबाबदारी देखील नाहीं, अशी जिची स्थिति; आणि आपलें

तारुण्य व सौंदर्य हें समाजांतील बुभुक्षित नीतिशून्य वृकव्याघ्रांना एक प्रकारचें आमिष अशी जाणीव ज्यांचें अंतर्याम अहर्निश देत राहत असतें; अशा गतधवांना आपल्या प्रियपतींच्या मागें जीवन कंठणें असह्य होतें. सुखभोगेच्छा संपली अशा स्वार्थी दृष्टीनें त्या चिताप्रवेश करीत नसतात. आपल्या पतिदेवतेच्या मागून जीवित कंठणें हें त्यांना सुतराम् अशक्य होतें. पति आणि सती यांच्या दोन जीवनांचा मिलाफ इतका बेमालूम झालेला असतो कीं एकाचें मरण दुसऱ्यालाहि आपलें मरण असेंच वाटतें. तें मरण त्यांना प्राप्त झालें नाहीं तर जीवन हेंच त्यांना मरण वाटतें; आणि मरणानें त्यांना जीवन प्राप्त करून घ्यावयाचें असतें.

एकाचें मरण तेंच दुसऱ्याचें जीवन असें जर वाटावयाचें तर तें पुरुषाकाहि कां वाटूं नये ? अशी शंका या ठिकाणीं येईल. पण पत्नीनिधनानंतर अशी विरहावस्था कंठून कालक्रमणा करणारे पुरुष मुळींच नाहींत असें म्हणतां येणार नाहीं. त्याचें प्रमाण स्त्रियांच्यापेक्षां कमी असलें तरी त्याचें कारण निराळें आहे. वंशविस्ताराचा प्रश्न त्यांना सोडवावयाचा असतो. पण निदान ऐहिकसुखाच्या लालसेनें पुनर्विवाह करणाऱ्या स्वार्थी पुरुषांचें प्रमाण समाजांत केवढें तरी अवाढव्य आहे हें अगदीं उघड आहे. अशाच प्रकारचे विचार अकबरशहाच्या मनांत घोळत असत. पण त्याला वाटे बहुपत्निकत्वाची चाल हिंदु आणि मुसलमान या दोन्ही धर्मांत आहे, त्या अर्थी त्या चालीला प्रतिरोध करणें कोणत्याहि दृष्टीनें बरोबर होणार नाहीं. पतिपत्नींला एकमेकांचा विरह असह्य होणें व एकमेकांच्या ठिकाणीं अव्यभिचारी निष्ठा असणें ही परस्परांच्या परस्परविषयक प्रेमाच्या उत्कटत्वाचा मनोधर्म आहे. तो कायद्यानें कसा उत्पन्न अगर विरुद्ध करतां येईल ?

या स्त्रीला सर्व सती असेंच म्हणत असत व त्याच नांवानें आपणास संबोधावयास तिनें सांगितलें होतें. या सतीच्या पातिव्रत्याचें प्रखर तेज अकबराला कळून आलें होतें व त्यावरून त्याला असेंहि वाटे कीं रजपुतान्यांत जे जोहार होतात व ज्या स्त्रिया सती जातात त्यांत बळजबरीपेक्षां खुषीच अधिक असते. हिंदु स्त्रियांची मनोघटनाच तशी बनलेली असते. अर्थात् एखाद्या सतीला तिच्या धर्मसमजुतीप्रमाणें आणि तिच्या पातिव्रत्यधर्माप्रमाणें पतीशीं सहगमन करावयास अवरोध करणें हें देखील चुकीचें आहे. बळजबरीनें एखाद्या स्त्रीला सती जावयास जितकें क्रूरपणाचें आणि निषिद्ध तितकेंच खऱ्या दृढनिश्चयी सतीला तिच्या सतीत्वाच्या निश्चयापासून च्युत करणें हें देखील निषिद्ध आहे. अकबरशहानें आपल्या राणीमार्फत त्या सतीच्या मनाची अनेक प्रकारें छाननी करून पाहिली, पण व्यर्थ. ती आपला निश्चय सोडण्यास मुळींच कबूल झाली नाहीं !

जोधबाई जेव्हां जेव्हां तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करी तेव्हां तेव्हां ती स्त्री तिची निर्भर्त्सना करूं लागत असे. ती बोलूं लागली कीं तिच्या उत्तराला प्रत्युत्तर देण्याचें धैर्य जोधबाईला होत नसे. " इतका अकबरशहा न्यायी आणि धर्मशील

म्हणवतो, पण माझ्यासारख्या एका दीन अबलेवर त्याच्या एका सरदारानें हात टाकण्यासाठीं हालहाल केले असतां त्याची जागमागही याला असूं नये, अथवा असली तरी आपणाला न्याय देऊन अपराध्याला शासन करूं नये हा केवढा घोर अन्याय ? आणि असल्या अधर्मी बादशहाची राणी म्हणवून घेण्यास तुझ्या स्त्रीत्वाला लाज कशी नाहीं वाटत ? मुसलमान राजघराण्यांत येऊन पडलीस, तरी माहेरचा रजपूत रक्ताचा बाणा इतक्यांतच कांहीं रक्तांतून घालवावयाला नको " अशासारखीं भेदक वचनें ती जोधबाईला टोंचून बोले. केव्हां केव्हां आडबाजूस ऐकत राहणाऱ्या त्या बादशहाच्या कानांत हा संवाद पडून त्याला पश्चात्ताप होई.

सती जोधबाईच्या महालांत येऊन सावध झाल्यावर व तिची हकीगत कळल्यावर अकबरानें तिच्या गाऱ्हाण्याची चौकशी करावयाची ठेवली नव्हती. पण खरा प्रकार त्याला समजून घ्यावयाचा होता आणि सतीत्वाचा बाणा त्याला पारखून पहावयाचा होता.

अकबरशहानें या प्रकरणाची चौकशी चालविलीच होती. म्हणूनच तर त्यानें जलालुद्दीनला मेवाडच्या स्वारीवरून मागें परतविलें आणि दुसऱ्याची त्याच्याऐवजी नेमणूक केली. तथापि मामुली पद्धतीस अनुसरून त्यानें जी चौकशी केली, त्यावरून त्याला गैरसमज करणारीच हकीगत समजून आली होती.

सती आपल्या हातीं लागल्यानंतर ती आपल्याशीं विवाह करण्यास तयार झाली. तथापि कांहीं दिवसांनीं आपलें दोघांचें पटेनासें होतांच तिनें सती जाण्याचे ढोंग उठविलें आणि शेवटीं आपला सूड उगविण्यासाठीं तिनें आपला राजवाड्यांत प्रवेश करून घेतला आणि सतीपणाच्या ढोंगाखालीं आपलें दुराचरण लपवूं पहात आहे.

अशा प्रकारची कैफियत चौकशीअंतीं जलालुद्दीनकडून अकबराच्या हातीं आली होती. जलालुद्दीनाची चौकशी करून आणि सतीला न्याय मिळावा असा जोधबाईचा देखील फार आग्रह होता. अकबरालाही या प्रकरणाचा पुरता तपास करावयाचा होता. सतीच्या सतीत्वाची त्या उभयतांना बालंबाल खात्री पटली होती. पण जलालुद्दीनचेच आंगठे त्याच्या डोळ्यांत घालावयास मिळाल्यास बरें असें अकबरास वाटल्यामुळें तो कांहीं दिवस वाट पहात राहिला होता. सतीच्या इच्छेप्रमाणें तिला सती जावयास खास परवानगी बादशहाकडून देवविण्याची तिची खातरजमा जोधबाईनें केल्यामुळें व आपल्या वैऱ्यास प्रायश्चित्त मिळण्याचा संभव आहे असेंहि समजून आल्यामुळें सतीहि जोधबाईशीं पूर्ववत् बोलूं लागली होती.

सती साधारण प्रसन्नचित्त आहे अशी संधि साधून जोधबाईनें तिला विचारलें—

" बाई ! तुमची हकीगत मला अजून नाहीं सांगितलीत ? "

" कशाला पाहिजे माझी हकीकत, आणि ती कळून घेऊन आपल्याला काय

करायचें आहे ? माझे हाल करणारा, माझें पातिव्रत्य भ्रष्ट करण्याकरितां, अहोरात्र मला छळणारा आपल्या कृपाछत्राखालीं सुखांत आहे, माझे सौभाग्याचे मालक स्वातंत्र्यासाठीं धारातीर्थी देह ठेवून स्वर्गलोकीं गेले आहेत, आणि मी अजून या पापभूमींत त्यांच्या शत्रूच्या घरांत त्यांना विसरून जिवंत राहिलें आहे म्हणून ते माझ्यावर संतप्त झाले आहेत. असल्या या स्थितींत मी केव्हां एकदांची इथून सुटेन अशी वाट बघत असतां माझी पूर्वकथा आपण कशाला विचारतां ? आणि ती मला सांगायला सुचेल तरी कशी ? हीनदीन स्थितीमध्यें पूर्वकथेची सुखस्मृति अधिक कष्टप्रद होते याचा अनुभव आपल्याला नाहीं व तो येऊंही नये. मी माझ्या जिवाचा अंत याच्यापूर्वीच करून घेतला असता; पण माझी इच्छा तशी आत्महत्या करण्याची नाहीं. या शरीराचे जे हाल होत आहेत ते चुकविण्याकरितां मी आत्महत्या करून माझी सुटका करून घेईन खरी, पण त्यामुळें मला अधोगति प्राप्त होईल आणि त्यांची माझी तुटातूट पडेल. इतकेंच नव्हे, तर माझ्या असल्या कृत्यानें त्यांचाही पुण्यक्षय होईल. म्हणून तर हें असलें कष्टमय जीवित मी अद्याप सहन करीत आलें आहे. "

" पण आपण माझ्या वाड्यांत आहां ना ? " जोधबाईंनीं मध्येंच विचारलें.

" मी कुठें नाहीं म्हणत्यें ? "

" तुम्ही नाहीं म्हणत नाहीं, पण आतां बोलतांना शत्रूच्या घरांत असें म्हणालांत तें काय तर मग ? "

" शत्रूच्याच घरांत आहे मी, नाहीं कशी ? "

" म्हणजे ? "

" म्हणजे असं, " बोलतां बोलतां सतीचा स्वर चढूं लागला, ती आवेशांत येऊन बोलूं लागली.

" म्हणजे असं, कीं मेवाडवर आपलें सैन्य एकसारखें धसरत आहे ना ? अशाच एका मोंगली सैन्याच्या हल्ल्यांत मेवाडभूमीचें स्वातंत्र्य राखण्याकरितां माझे स्वातंत्र्यवीर, उदेसिंह महाराजांचे साथीदार रणांगणावर पडले. त्या चकमकींत उरलेल्या लोकांनीं पळ काढला आणि जंगलांत शिरले. मला ही हकीगत समजल्यावर मी त्यांचा शोध करीत त्या युद्धभूमीवर जाऊन त्यांच्या देहाचा शोध करूं लागलें. पण आसपास दडी धरून बसलेल्या दोन स्वारांच्या तडाक्यांत सांपडलें. कोणाला न कळत मी एकटीच शोध करीत त्याठिकाणीं आलें होतें. मला त्या स्वारांनीं पकडून आपल्या मालकाच्या समोर उभें केलें. तेथून जातांना माझ्या सरदारांच्या, माझ्या जीवितेश्वरांच्या अंगावरचा, हा पिवळा शेला मी जवळ घेतला होता, तो हा अद्याप मी माझ्या हृदयाशीं बाळगून ठेवला आहे. त्या ह्या शेल्याबरोबरच मी आतां सहगमन करणार आहे. मला हा शेलाच स्वर्गांत त्यांचा ठावठिकाणा दाखवून देणार आहे. ह्या शेल्याच्या दर्शनाच्या जीवनानेंच मी आजपर्यंत प्राण धारण करून राहिलें आहे. ह्या शेल्यावर मी माझ्या डोळ्यांतलें गुलाबपाणी शिंपडीत आलें आहे. आणि ह्यालाच

हृदयाशीं धरून मी ही काया अग्निनारायणाला अर्पण करणार आहे,—पण—पण—मला ही संधि आपण कधीं देणार आहांत ? तो दिवस कधीं बरें आपण मला दाखविणार आहांत ? मी आपलें सौभाग्य चिंतिल्याशिवाय खात्रीनें रहायची नाहीं. ”

बोलतां बोलतां त्या सतीच्या भावना उचंबळून आल्या. राष्ट्रभक्ति, स्वातंत्र्यलालसा, जाज्वल्य पातिव्रताधर्म, उत्कट पतिभक्ति, मनाचा खंबीरपणा, धर्मनिष्ठा असे अनेक गुण तिच्या भाषणावरून जोधबाईच्या हृदयास पटत होते. तिच्या मनांत आणखी बरेच प्रश्न सतीला विचारावयाचे होते; पण आतां ती या भाषणानें अगदीं मूक झाली. आपण दोघींही रजपूतरक्ताच्या, पण दोघींमध्यें तफावत आहे हें तिला कळून आलें. तिची ही जागृति इतकी स्पष्टपणें यापूर्वी झाली नव्हती. अनेक सद्गुणांची एक मूर्तिमंत पुतळी आपल्यासमोर असून तिच्या पदांगुष्ठावरून आपल्यासारख्या शेंकडों राण्या ओंवाळून टाकण्याइतकी त्या देवीची योग्यता आहे, हें ती समजून चुकली आणि तिच्या भाषणाचा स्वमनाशीं विचार करूं लागली. तिला सतीच्या भाषणानें मोहित करून टाकलें होतें.

बऱ्याच वेळानें जोधबाईनें सतीच्याकडे पाहिलें, तों ती बासनांत गुंडाळलेल्या त्या शेल्यावर अश्रुमोचन करीत असल्याचें दृश्य तिच्या दृष्टीस पडलें. तिच्या हृदयाचें पाणी झालें. आपल्या नवऱ्यानें पाठविलेल्या सरदारानें हिची ही अवस्था केली आहे, असें लक्ष्यांत येतांच आपल्या मातृभूमीच्या पारतंत्र्याची कल्पना तिच्याहि मनांत क्षणभर चमकून गेल्याशिवाय कशी राहील? तीहि शोकविव्हल झाली. असल्या अनेक रजपूत सतींचे हाल आपल्या पतीच्या सैनिकांच्या हातून होत असतील असेंहि तिला वाटलें. म्हणून जोधबाईनीं तिला धीर देत म्हटलें—

“ बाई, तुमच्या या कथेनें मला खरोखरच वाईट वाटतें. आम्ही या असल्याच. पण तुमच्यासारख्या सती ज्या जन्माला येतात, त्या आपल्या पुण्याईनें आपल्या बांधवांच्या मनांत स्वाभिमान जागृत ठेवतात आणि त्या ज्या देशांत जन्माला येतात, त्या देशाला भूषण होऊन जगांत अजरामर होतात. आमच्यासारख्या स्त्रिया स्त्रीत्वाला दूषण आहेत. तुमच्या कीर्तीच्या आठवणीनें पुरुषांचें शौर्य जागृत राहून त्यांचा स्वाभिमान उसळतो आणि तो गेलेलें सत्त्व फिरून प्राप्त करून देण्यास त्यांस प्रवृत्त करीत राहतो. मी आपली मोकळीक शक्य तितक्या लवकरच करवितें आणि तुमच्या शत्रूचेंहि पारिपत्य करवितें. तुम्ही निश्चिंत रहा. ”

“ तुम्ही मी बोललेल्या शब्दांबद्दल राग मानून घेऊं नका. उद्वेगानें मी कांहीं तरी भलतेंच बोलून गेलें असेन. आपण कृपा करून तें मनाला लावून घेऊं नये, अशी या आपल्या बहिणीची आपणाला विनंति आहे. ”

“ छे ! छे ! बाई ! आतां आपण मला आपली बहीण मानूं नका. त्या पदवीची लायकी माझी नाहीं. आतांपर्यंत मी आपणाला माझी मानावयास बोललें असेन, पण तें मी आतां विसरतें. आपणाला मला अजूनहि एक दोन प्रश्न विचारावेसे वाटतात. विचारूं का ? ”

" खुशाल विचारा. सांगण्यासारखे असल्यास सांगेन मी. " डोळे पुशीत पुशीत सती म्हणाली.

" आपण मीनाबाजाराच्या दिवशीं आलांत त्याला आतां बरेंच दिवस झाले. त्या वेळीं आपण गुजराथी भाषेंत एक गाणें म्हणत होतां. आपणाला गुजराथी, संस्कृत, या भाषा कशा येतात ? "

" माझें आजोळ गुर्जर देशांत होतें. माझ्या बालपणींचे बरेच दिवस गुर्जर देशांत गेले. तेथें मला गुजराथी बोलतां येऊं लागलें. आमच्या आजोळीं एक संस्कृत जाणणारे शास्त्री होते, त्यांच्याकडून मला संस्कृत भाषेची माहिती झाली. ते शास्त्रीबुवा मला—"

पण यापुढें ती बोलेना. तिनें आपलें बोलणें मध्येंच थांबविलें. पण तिकडे जोधबाईचें लक्ष नव्हतें. तिच्या मनांत मीनाबाजारांत सती ज्या स्थितींत आली होती, ती स्थिति घोळत होती. तिनें सतीला विचारलें—

" आपण ज्या दिवशीं आलां, त्या दिवशीं बोलतां बोलतां आपला चेहरा काळा पडून आपण मूर्च्छित झालां. पण अद्याप हल्लीं हल्लींपर्यंत आपणाला नीट शुद्धि नव्हती. आपणाला आम्ही वेडीच ठरविलें होतें. पण आतां आपले विचार ऐकून माझी बुद्धि गुंग होऊन गेली आहे. हकीमांच्या मतें आपणाला विषप्रयोग कोणी तरी दुष्टानें केला होता. त्या विषाचा परिणाम शरीरावर होतांच मेंदु बिघडून जावा व तें विष जास्त पोटांत गेल्यास तात्काल मृत्यु यावा असलें जालीम तें विष होतें. आतां तरी आपणांस आठवतें का ? आपणाला कोणीं विष पाजलें होतें का ? "

सती आठवण करूं लागली. मीनाबाजाराकडे येतांना तिच्या बरोबरच्या तिचे नातलग म्हणविणारांनीं तिला खाऊ घातला होता हें वाचकांच्या ध्यानांत असेलच. ती उपोषित असून कित्येक दिवस तिच्या पोटांत पुरेसें अन्न गेलेलें नाहीं, असें सांगून त्यांनीं तिच्या पोटांत बळजबरीनें विष कोंबलें होतें. तिला मस्तक फिरून गेल्यामुळें कशाचीच शुद्धि नव्हती. पण पोटाला भूक असल्यामुळें जिभेला गोड लागणारी मिठाई तिनें बकाबक गिळली. आणि त्याचाच परिणाम मग व्हावयाचा तसाच झाला.

पण सतीला त्या स्थितीची आतां आठवण नव्हती. आणि ज्या गोष्टींची तिला आठवण होती त्या गोष्टी बोलत असतां तिनें मुद्दाम गिळून टाकल्या होत्या. ती आतां आपण मीनाबाजाराकडे यावयाच्यापूर्वी काय काय गोष्टी घडल्या त्यांची आठवण करूं लागली. पण विश्वंभरशास्त्री व त्यांचे साथीदार यांनीं आपली मुक्तता करीपर्यंतची तिला हकीगत पुसट पुसट आठवत होती. ती सांगावी कीं, सांगू नये हें तिला निश्चित करतां येत नव्हतें.

इतक्यांत बादशहाची स्वारी जोधबाईच्या भेटीकरितां येत असल्याची वर्दी आली. तेव्हां साहजिकपणेंच त्या दोघींचें बोलणें थांबलें आणि सतीच्यावरचा प्रसंग टळला. तिला आपली गुप्त हकीगत सांगण्याचा प्रसंग आला नाहीं. तो प्रसंग टाळण्यांत तिचें हित होतें कीं अहित होतें? दोन्हींहि होतीं. पण अहितापेक्षां हितच अधिक झालें असतें. तथापि ज्या वेळीं ज्या गोष्टी घडावयाचा योगायोग असतो त्याच वेळीं त्या घडत असतात.

अकबराला सतीच्या वाड्यांत राहण्याचा धोका वाटत होता. सती वाईट नव्हती. पण तिच्या सहवासाचा परिणाम जोधबाईवर पुढेंमागें आपणास अनिष्ट असा होईल असें त्या धूर्त बादशहानें हेरलें होतें. त्याचा तो आदमास खोटा नव्हता. हें वरील संभाषणावरून कोणासहि सहज कळण्यासारखें आहे. तेव्हां वाड्यांत शिरलेली ही स्त्री बाहेर कशी जाईल याचा बेत तो मनाशीं करीत होता. ती बिचारी मरावयास त्याच क्षणीं एका पायावर तयार होती. पण जन्म आणि मरण जीवाच्या स्वेच्छेवर थोडेंच अवलंबून असतें!

---

# प्रकरण बारावें.

## हातची सुटली!

"असें कसें म्हणतां, पंडितजी? आणखीं एकहि ग्रंथ तुमच्यापाशीं आतां शिल्लक नाहीं म्हणतां, असें कसें होईल?"

"सध्यां नाहीं. रामायण, महाभारत आणि अमरकोश हे तीन ग्रंथ फाझलनीं हल्लींच खरेदी केले. शिवशर्मालाच विचारा. त्यांनींच नेऊन दिले. आम्हाला काय? गिऱ्हाइकाला द्यायची वस्तु आम्हाला घरीं ठेवून तरी काय करावयाची आहे. पुजायची आहे?"

"हो पुजायचीच आहे. तुम्ही हिंदु लोक पुजीत नाहीं असें काय शिल्लक राहिलें आहे?" हेटाळणीच्या स्वरानें हाजी इब्राहिमनें म्हटलें.

"ज्या ज्या ठिकाणीं पूज्यताभाव उत्पन्न होतो, ज्या ज्या ठिकाणीं ईश्वरी अंश दिसतो, ज्या ज्या ठिकाणीं कांहीं अमानुष, अलौकिक असें दिसतें, तें तें स्थान अथवा ती ती वस्तु आम्ही पूज्य समजतों, नव्हे पुजतों देखील. मग त्यांत हांसण्यासारखें काय झालें?" विश्वंभरपंडित म्हणाले. हाजी इब्राहिम शास्त्रीजींना पंडित असेंच म्हणत असत.

" पंच महाभूतें व इतर कांहीं भव्य आणि मनुष्यांना हितावह असलेलीं तत्त्वें तुम्हीं पूर्वीपासून पूज्य मानीत आलां हें तुमच्या वेदांवरून दिसतेंच आहे. पण नदी, पर्वत, झाडें, गाई, बैल, उंदीर, साप, मोर, कावळा, कागद, चित्रें, लाकूड, शाळें, दगड, धोंडे, माती, वहाणा, अरेबाप ! किती म्हणून बोलायचें ? कोणती वस्तु— कोणती बरी अथवा वाईट वस्तु, कोणता स्वच्छ अथवा गलिच्छ प्राणी तुम्हीं पुजावयाचा ठेवला आहे ? मूर्तिपूजा ही अशा प्रकारें माणसास हीन बनविते असें तुम्हांस नाहीं वाटत ? "

हाजी इब्राहिम नुसती शब्दांची गोलंदाजी करीत सुटले होते.

" हें पहा ! पूजा याचा शाब्दिक अर्थ तुम्ही घेतां तो चूक आहे. या जगांत जे धर्म आहेत, त्यांत मूर्तिपूजेशिवाय एकहि धर्म नाहीं. मनाची स्थिति परमहंसपदाला पोंचली नाहीं, तोंपर्यंत ईश्वराच्या ठिकाणीं चित्त जडण्याकरितां त्याला सगुणत्व कल्पिणें कधींहि चूक नाहीं. आतां वरील तुम्हीं जीं पशुपक्ष्यांचीं आणि वस्तूंचीं नांवें घेतलीं, त्यांत तुम्ही आणखी किती तरी नांवें सोडलीं आहेत. कित्येक महिने, कित्येक दिवस, कित्येक तिथि देखील आम्हां हिंदूंना पूज्य वाटतात. आम्ही गोरसाची पूजा करतों आणि गोमयही पूज्य मानतों. म्हणजे या प्रत्येक वस्तूला अगर प्राण्याला सर्वशक्तिमान् परमेश्वर समजतों असें नव्हे. ही तुम्ही परधर्मीयांची चूक आहे. परमेश्वर " एकमेवाद्वितीयं " आहे, हें तत्त्व आमच्या पोरासोराला देखील उपजतच समजत असतें. तथापि विश्वांतल्या ज्या ज्या शक्तीपासून आपल्या शरीराचा आणि मनाचा विकास होतो, त्या त्या शक्तींशीं कृतज्ञ राहून त्यांचें स्मरण ठेवणें हें केव्हांहि आणि कोणालाहि इष्ट आहे. आमच्या पूजेच्या प्रकारांतील गूढ तत्त्वें तुम्हांला सांगून कळण्यासारखीं आहेत. कृतज्ञ राहणें हा कांहीं दुर्गुण नव्हे. नुसतें मनानें स्मरण करून कोणाचें समाधान होईल ? हत्तीनें दुग्धाभिषेक करण्याची शक्ति फक्त एका कासवीलाच काय ती देवानें दिलेली आहे. जी जी वस्तु आपल्याला प्रिय असेल तिला जवळ घेऊन तिला भावनाशीलतेनें कांहीं उपचार करण्यानें भोळ्या भाविक मनाचें समाधान होत असतें. बाहेरून क्रूर अगर विनाशक दिसणारे प्राणी अगर वस्तु देखील मनुष्यमात्राला उपकारक होत असतात, त्यांच्या उपकारांचें स्मरण ठेवणें हें थोर मनाचें व कृतज्ञतेचें द्योतक आहे. अमूर्त कल्पनेला आकृति कल्पिणें ही कांहीं अधोगति मानतां येणार नाहीं. तथापि या गोष्टी योग्यपणें मनाला पटायला हिंदुधर्मांतच जन्म घेतला पाहिजे. "

" कोणाला काय बोलतां हें, पंडितजी ? "

" चराचराच्या ठिकाणीं ईश्वरत्वाच्या खुणा पटायला, मी दक्षिणेंतला एक विश्वंभरपंडित, तुम्हाला—हाजी इब्राहिम शिरहिंदी नामक एका इस्लामी पंडिताला ठासून सांगतों कीं, हिंदुधर्मांतच जन्म घेतला पाहिजे, आणि बालपणापासून हिंदु-

धर्माचीं सोज्वल तत्त्वें मातेच्या दुग्धपानाबरोबर सेवन केलीं पाहिजेत ! " पंडितजी आवेशाच्या उसळीनें उत्तरले.

" तुम्ही हा माझा अपमान करीत आहांत ! "

" बिलकुल नाहीं. "

" पण आतां ओघाला आलें म्हणूनच सांगतों कीं मी कांहीं हिंदु होत नाहीं, पण तुम्हांला मात्र लवकरच मुसलमान व्हावें लागेल. " धमकावणीच्या स्वरानें शिरहिंदीनें म्हटलें.

" तें सर्व मला ठाऊक आहे. मला जबरीनें मुसलमान करण्याची प्राज्ञा कोणा-चीहि नाहीं. मी मुसलमान झालों, तर एका विशिष्ट कार्याकरितां स्वखुषीनें होईन. इब्राहिमजी ! तुम्ही एक गोष्ट पुरी लक्षांत घेऊन ठेवा, कीं बळजबरीनें बाटवून कोणा-लाहि आपल्या धर्माचे अनुयायी केल्यानें धर्माच्या हितापेक्षां अहितच अधिक होईल; आणि या हिंदुस्थानांत तर धार्मिक जुलूम कधींहि हितपरिणामी होणार नाहीं. धार्मिक जुलूम करणारी, मग ती राजसत्ता असो कीं अन्य कोणत्याहि प्रकारची शक्ति असो. आपल्या पुण्यशील बादशहानें हें तत्त्व ओळखिलें आहे, तथापि तुमच्यासारख्या अर्वाकच्या पंडितांनीं बादशहाविरुद्ध कट चालविला आहे, पण तुमचीं सर्वांचीं सर्व कारस्थानें मला पक्कीं ठाऊक आहेत. "

पंडितजींच्या या सडेतोड भाषणानें हाजी इब्राहिम गारठून गेला. पंडितजीला मुसलमान बनविण्याच्या बेताची धमकी द्यावयाला व त्याला धाकानें चूप करावयाला त्यानें ज्या काडीचा आधार घेतला होता, त्या काडीची तरवार बनून त्याच्याच गळ्याला खेटली. कुठली चूक केली आणि आपण हा विषय काढला असें त्यास झालें. कारण जवळ फैझी वगैरे मंडळी बसली होती, व त्यांच्या देखत आपलें इंगित आणखी एक एक बाहेर पडत जाईल तर तें घातक झाल्याशिवाय राहणार नाहीं. हें शिरहिंदीला ठाऊक असल्यामुळें तो आपल्या हातांतल्या पोथीचीं पानें खालीं मान घालून चाळीत असल्याचा बहाणा करीत होता. पण या त्या दोघांच्या चुरशीच्या वादविवादांत आपल्याला एक दोन गोष्टी सहजासहजीं कळून आल्या. माणसें एकमेकांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढून भांडूं तंडूं लागलीं कीं तिसऱ्याला अशाच त्यांच्या गुह्य गोष्टी आपो-आप कळून येत असतात. म्हणूनच भांडतांना देखील ज्यानें त्यानें चोरून आणि हलक्या सुरांत एका बाजूस जाऊन भांडलें तर बरें नाहीं कां ?

" पंडितजी ! तुम्ही भलतीकडेच वहावत चाललां. आपण तो विषय सध्या सोडून देऊं. आम्हाला काय, खुषीनें असो अगर नाखुषीनें असो, आमच्या धर्माला अनुयायी मिळाले म्हणजे झालें. मूर्तिपूजा निषिद्ध आहे असें आम्हाला वाटतें—"

" असें तुम्हाला वाटतें ? अं ? " वाटतें शब्दावर जोर देऊन पंडितजींनें विचारलें, " महंमद पैगंबरला तरी तुम्ही पूज्य मानतां काय ? "

" हो, हो ! "

" त्याच्या कृतीबद्दल तुम्हांला आदर आहे काय ? "

" कां असणार नाहीं ? "

" तर मग हजरत मोहम्मद साहेबांच्या घरीं एक मूर्तिपूजक गृहस्थ त्यांचा पाहुणा म्हणून आला, त्याला त्यांनीं कसें वागविलें ? त्याचें आगतस्वागत व आदरातिथ्य एकाद्या हिंदु गृहस्थाप्रमाणेंच केलें ना ? त्याच्यावर कुऱ्हाड उचलून घातली नाहीं ना ? किंवा त्याला " आतां मुसलमान हो. नाहींतर कापतो तुझी मान " असें म्हणाले नाहींत ना ? " आतां सरबत्ती सुरू करण्याची पाळी पंडितजींची होती !

" नाहीं. "

" दुसऱ्याच्या मताबद्दल अनादर न दर्शविण्याची ती त्यांची सहिष्णुता त्यांच्या कोणत्या अनुयायांच्या ठिकाणीं आहे ? तशी ती असावयास नको काय ? "

" पण, पंडितजी हें असें चालावयाचेंच, धर्मांचीं उदात्त तत्त्वें त्या धर्मांतले एकूण एक लोक आचारांत कधींच आणीत नाहींत. तसें जेव्हां शक्य होईल, तेव्हां धर्मकर्मांच्या आरडाओरडीची गरजच राहणार नाहीं. मीही उलट तुम्हाला विचारतों कीं हिंदुधर्मांत जीं उदात्त तत्त्वें आहेत, तीं एकूण एक हिंदु आचारांत आणतो असें तुम्ही छातीस हात लावून सांगावयास तयार आहांत काय ? "

" एकूण एक नाहीं, तरी बरेच जण धर्माचार पाळतात; आणि एकूण एक नाहींत, तरी बरींच तत्त्वेंही ते पाळतात. त्यांच्या तत्त्वपालनाच्या कसुरीमुळें त्यांचे स्वतःची उन्नति होवो अगर न होवो, पण दुसऱ्यास तरी क्लेश आणि जुलूमजबरदस्ती सहन करावी लागत नाहीं. दोन्ही धर्मांमध्यें अंधानुयायी असतील—आहेतही. पण दोघांच्याहि अंधानुकरणांत बराच फरक आहे, हें तुम्ही विसरूं नका. हिंदूंचें अंधानुकरण हानिकारक झालें, तर तें त्यांचें त्यांनाच होईल; पण मुसलमानांचें अंधानुकरण प्रथम परक्यांना आणि नंतर ज्यांचें त्यांना असें दुहेरी हानिकारक ठरतें आणि ठरलेंही. "

" पंडितजी, त्याच्याकरितां वादविवाद तुम्हांआम्हांमध्यें आज या घटकेला कशाला ? तें तुमचें भाकीत अथवा अनुमान खरेंखोटें ठरवायचा प्रश्न कालाचा आहे. मागें याच्यापूर्वी जो येथें जुलूम झाला त्याबद्दल मुसलमानांना कोणतें प्रायश्चित्त दिलें आहे हिंदूंनीं ? "

" शाबास, अद्याप मुसलमानी तख्त येथें कायम होऊन फार दिवस झाले नाहींत. पूर्वीं दिल्ली जिंकणारे पराक्रमी मुसलमान दिल्ली जिंकून गेले. इथें राहिले नाहींत. होय कीं नाहीं बोला. मोंगल इथें राहिले. ही आतां तिसरी पिढी आहे. तरी अद्याप निम्मे हिंदुस्थान अंमलाखालीं आलेलें नाहीं. पूर्वीं जीं मुसलमान घराणीं इथें राहिलीं त्यांचा राज्यविस्तार एक दोन प्रांतांपुरताच होता. हिंमत असेल तर अकबरशहास तैमूरलंगाचा अवतार घ्यावयास आपण उद्यांच सल्ला द्या. आपण बादशहांचे

सल्लागार आहांत. चला. त्यांच तसा सल्ला द्या. बादशहाला प्रथम आपले सगळे हिंदु सरदार हांकलून द्यावे लागतील, आणि मुसलमान सरदारांनिशीं हिंदुस्थान जिंकावयाच्या स्वारीवर निघावें लागेल. दीनेइलाही धर्म आणि श्रयादतखाना आहे तसा अर्धा अधुराच राहील. काय, करतां ज्यां असें ? " पंडितजींनीं पैजच लावली.

" असें होणार नाहीं म्हणून कशावरून ? अकबर नाहीं, त्याचा नातू, नातू नाहीं तर- पणतू असें करावयास तयार होणार नाहीं म्हणून कशावरून ? बादशाही स्थिर व्हावयास जर तीन पिढ्या गेल्या, तर दौलतीचा जोर वाढून इस्लाममय हिंदुस्थान करावयास आणखी तीन चार पिढ्याच नकोत ? "

" होय ! " शांत स्वरांत पंडितजी म्हणाले, " आणखी तीन चार पिढ्या पाहिजेत तर, अवश्य पाहिजेत. नको कशा ? पण ज्या पिढीच्या बादशहा हिंदुस्थानला धार्मिक जुलूम भोगावयास लावील, तीच पिढी शेवटची होईल; आणि तोच बादशहा अखेरचा होईल. मी कांहीं साधु नाहीं. पण मी बराच अभ्यास केला आहे. माझें हें भविष्य नव्हें, हें एक धोरण आहे. हें खरें कीं खोटें, तें तुम्ही आतां म्हणाल्याप्रमाणें कालच ठरविणार आहे " पंडितजी इतकें बोलून एक सरबताचा प्याला पुढें करून म्हणाले—

" हं ! हा घ्या. " शिरहिंदींनीं तो प्याला ओठास लावला. दुसरा एक पेला पंडिजींनीं स्वतः रिकामा केला.

" मी आलों अथर्ववेदांतल्या कांहीं शंका विचारायाला आणि हा आपला तिसराच वाद निघून वेळ फुकट गेला " आपल्या पांढऱ्या शुभ्र दाढीवरून हात फिरवीत शिरहिंदी म्हणाले.

" शंका ? मला तरी कुठें तो कळतो आहे पुरता ? आपण दोघांचौघांनीं मिळून तें काम पार पाडलें पाहिजे. "

" दोघे—चौघे ? कोण दोघे चौघे आहेत एवढे विद्वान् तुमच्यापेक्षा ? "

" वः असें काय समजतां ? बदाउनी आहेत, फाझल आहेत. आणखी कोणी असतील, नाहीं कसे ? "

" उं ! राहूं द्या हो. बदाउनी आणि म्हणे फाझल. ह्या दोघांचें बस्तान हल्लीं फारच वाढलें आहे दरबारांत. फाझलच्या सल्ल्याशिवाय आतांशा बादशहाचें पानच हालेनासें झालें आहे. आणि बदाउनी तर आपल्याच झोंकांत ताठ असतात. जसे कांहीं इतर लोक जनावरेंच आहेत. ह्या अथर्ववेदावर त्यांची दृष्टि होती. पण आपण शिवशर्म्याच्या मार्फत तो आम्हाला दिला हे आपले मोठे उपकार आहेत आमच्यावर. "

" मग आपण आमचें एक काम कराल काय ? "

" अगदीं पाहिजे तें. " जोरानें खात्रीपूर्वक शिरहिंदी म्हणाले.

" कुराणचा अभ्यास आम्हाला पद्धतशीर आणि पुरता करावयाचा आहे. "

" मग ? "

" तुमच्याशीं तो करावा म्हणतों. "

" मग जमलेंच. "

" कसें ? "

" आम्हाला अथर्ववेद शिकावयाचा आणि तुम्हाला कुराण शिकावयाचें. दोघेहि एकमेकांचे शिष्य आणि दोघेहि एकमेकांचे गुरुजी. "

" हो, असें झालें खरें. पण आम्हाला आणखी एक मदत आपण केली पाहिजे. "

" करूं. पण तुम्हाला कुराण शिकवायचें म्हणजे तुम्ही आधीं मुसलमान झालें पाहिजे. "

" हा जुलूम कां बुवा ? अथर्ववेद शिकवायला तुम्ही हिंदू व्हा अशी अट आम्हीं तुम्हाला घातलेली नाहीं. "

" म्हणून आम्ही घालूं नये असें थोडेंच आहे ? तुम्हाला कोणीहि मुसलमान स्वधर्मांत घेतल्याशिवाय कुराण पढूं देणार नाहीं. म्हणजे कुराण शिकवणार नाहीं. "

" शेख मुबारिक शिकवितील. "

" बिलकूल खोटें ! कोणी मुसलमान शिकवणार नाहीं. "

" बरं नाहीं तर होऊं मग मुसलमान. पण तुमच्या त्या दोस्ताची खबर हल्ली कांहींच नाहीं बोललांत ? "

" कोणत्या दोस्ताची ? "

" जलालुद्दीनची. "

" तो जलालुद्दीन आमचा दोस्त कसला ? तो मोठा पाजी मनुष्य आहे. आतां कैद झालाच आहे; पण एवढ्यावरच सुटतें कीं नाहीं याचाहि वानवाच आहे. "

" कां, कांहो ? असें कैद व्हावयाला झालें काय त्याचें ? "

" काय पंडितजी ढोंग करतां हें ? जसें कांहीं तुम्हाला ठाऊकच नाहीं यांतलें कांहीं ? कुणाला तरी खरी वाटेल ही तुमची बतावणी ? अहो सोंग–ढोंग कामं करतात खरीं, पण चालतील तिथेंच तीं करावींत. भलत्या ठिकाणीं केलीं तर उगाच अंगीं उलटतात. "

" या मठाच्या कामधामापलीकडे मला कांहीं इतर गोष्टींत मन घालावयास फुरसत मिळत नाहीं. खरंच सांगतों. जलालुद्दीनला शिक्षा कशाबद्दल होणार आहे ? "

" म्हणजे ? खुषरोजच्या दिवशीं मीनाबाजारांत घडलेली हकीगत सगळ्या दुनियेला समजली तरी तुम्हाला ठाऊक नाहीं ? "

" ती हकीगत समजली, हो त्या एका वेड्या बाईची. इथेंच कोणीसे त्या दिवशीं बोलत होते. पण त्या प्रकरणाशीं जलालुद्दीनचा काय संबंध ? "

" सगळा त्याचाच संबंध. फार वाईट वर्तनाचा आहे तो. बरं पण आमचा फैझी कसा काय आहे संस्कृत अभ्यासांत ? " विषय पालटण्याकरितां त्या बाजूकडून

जाणाऱ्या फैझीकडे पाहून शिरहिंदी म्हणाले. आरंभीं फैझी व एक दोन माणसें तिथें होतीं; पण दोघांचें बोलणें वाढत चाललें त्यावेळीं त्या सर्वांना पंडितजींनीं उठून जावयास सांगितल्यावरून ते सगळेजण निघून गेले होते.

" हो, हो, तो संस्कृतांत तर उत्तम तयार झाला, पण हिंदूंच्याप्रमाणें स्नान-संध्या हव्यकव्य सुद्धां करूं पाहतो. "

" आतां काय, अर्धामुर्धा हिंदूच बनला आहे तो. " उपरोधिकपणें शिरहिंदी म्हणाले.

" लवकरच सगळा हिंदु बनेल. "

" अगदीं अशक्य. "

" बरं राहिलं आमचं बोलणं. "

" आतांशा शिक्रीला आपल्या फारशा खेपा पडतात ! "

" आमचा मठ थोड्या दिवसांनीं शिक्रीसच न्यायचा आमचा विचार आहे. "

" तशी बादशहांची इच्छा आहे कीं काय ? "

" तें तुम्हांला ठाऊक असणार. "

" अशी कशाला टाळाटाळ करतां आहां पंडितजी ! " हासत शिरहिंदी म्हणाले; " आतां अबादतखाना पुरा होत आलाच आहे. बादशहांची आठवड्याची धर्मचर्चासभा आतां फत्तेपूर शिक्रीलाच होणार आहे. देशोदेशींचे विद्वान् आतां शिक्रीलाच रहाणार आहेत. त्यांच्यासाठीं इमारती देखील तयार होऊं लागल्या आहेत. यहुदी, पारशी, बौद्ध, हिंदू, खिश्चन, वगैरे अनेक भिन्नधर्मीय विद्वान् लोकांच्या कायम सोयीसाठीं इमारती बांधण्याचें काम नेटानें सुरू आहे. आपणाला हें सर्व ठाऊक आहे. अर्थात् शिक्रीला आपलाहि मुक्काम होणार हें ठरलेलेंच. मग त्यांत लपवालपवी कशाला ? "

" हो कां ? हें आपल्याला ठाऊक होतें तर ! "

" हो म्हणजे ? "

" मग मला कशाला बरें विचारण्याचे एवढे श्रम घेतलेत ! "

" तुमच्या तोंडून ऐकावयास मिळतें कीं काय तें म्हटलें पहावें. "

" आम्ही जाणार ते आमच्या सोईसाठीं. पण काय हो, शिरहिंदीसाहेब, फाझल दिल्लीलाच रहाणार कीं शिक्रीला ? "

" फाझलही शिक्रीलाच राहतील असें वाटतें. " हा प्रश्न निघाला तेव्हां शिरहिंदींच्या बरोबर पंडितजी बोलत असतां बाजूस उभ्या राहिलेल्या एका तरुण मुसलमानानें आपले कान त्यांच्या बोलण्याकडे लावले होते. त्यांच्या इतर भाषणाशीं जणूं काय त्याचा संबंधच नव्हता व याच प्रश्नावर जणूं काय त्याचें नफानुकसान अवलंबून होतें. त्याचा चेहरा अनेक प्रकारच्या मनोविकारांच्या छटांनीं क्षणोक्षणीं एकसारखा पालटत होता. पण त्याच्या या भावना पंडितजींच्या नजरेच्या आटोक्यांतून सुटल्या नव्हत्या.

“ फाजल शिकीलाच जाईल असें वाटतें व तोहि आमच्या मठाशेजारींच राहील. ” असें पुनः एकवार उत्तर देऊन त्यांनीं नकळत त्या मुसलमान तरुणाचा चेहरा न्याहाळला; पण तो त्याच्या लक्ष्यांत न येतां न्याहाळला; त्याबरोबर त्या तरुणाचा पंडितजींना चमत्कार वाटला व त्या तरुणाचा संशयहि आला. ”

“ आतां पुढच्या बैठकींत सर्व धर्मांत क्षमेच्या तत्त्वाचा पुरस्कार कितपत करण्यांत आलेला आहे याची चर्चा व्हावी असें ठरलेलें आहे, आपल्याला कळलें असेलच. ” शिरहिंदी म्हणाले.

“ आम्हांला कसें बोवा कळणार ? आम्ही कांहीं धर्मसभेचे सभासद नाहीं. ” पंडितजी टोमण्यानें म्हणाले.

“ काय टोले लगावतां आहांत हे आज पंडितजी ? ”

“ टोले कसले आले आहेत त्यांत ? मी खरें तें बोलतों. ”

“ हो तर, पण शिकीला गेल्याबरोबर आपण धर्मसभेचे सभासद होणार आहांत, हें मी आपल्याला ठाऊक नसेल तर आतांच सांगून टाकतों. ”

“ त्याबद्दल मी आपले मनापासून आभार मानतों. ”

“ म्हणजे तिकडे त्या युरोपांतून गोरेलोक आलेले आहेत, ते दर श्वासागणिक म्हणे अशाच अर्थाचे शब्द उच्चारीत असतात असें ऐकतों. तितकेंच जरी नाहीं, तरी आतां आपण दोनदां तरी माझे आभार मानलेंत नाहीं वरें ? ”

“ अहो, कृतज्ञता आणि क्षमा हा हिंदुधर्माचा आत्माच आहे. ”

“ काय, क्षमा आमच्या धर्मापेक्षां तुमच्या धर्मांत जास्त आहे ? ”

“ नव्हे, तसें नव्हे. क्षमेचा अभाव तुमच्या धर्माइतका दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत नाहीं. ”

“ बरें आहे. आतां धर्मसभेंत ठरेलच कायतें. मी येतों आतां. या खुणा केलेल्या आहेत ना ? तेवढ्या शब्दांचें स्पष्टीकरण मला पाहिजे. तेवढा खुलासा करा. आपण आमचेकडे याल तेव्हां मी या शंका विचारून घ्यायला विसरणार नाहीं. ” असें म्हणून शिरहिंदी जावयास उठले.

“ बरें आहे ” असें म्हणून त्यांना पोंचवून आल्यावर फैझीच्या शंकांचें त्यांनीं निवारण केलें, त्याला नवीन अभ्यास नेमून दिला आणि ते त्या तरुण मुसलमानाकडे वळले.

“ केव्हांसा आलास तूं ? ”

“ शिरहिंदी आल्यानंतर थोड्याच वेळानें. ”

“ कोणाकडून ? ”

“ मी हा मठ पहावा म्हणून आलों. ”

“ तूं इकडे असा लपून कां उभा राहिला आहेस ? ”

“ नाहीं. मी माझ्या मालकास न सांगतां आलों आहें. ” हें वाक्य तो बोलला, पण तें खोटें होतें हें पंडितजींच्या ध्यानांत आल्यावांचून राहिलें नाहीं. ”

" इथें कोणी तुझ्या ओळखीचा आहे काय ? "

" हो—नाहीं. "

" म्हणजे ? या दोन उत्तरांतलें खरें कोणतें ? होय कीं नाहीं ? "

" मी होय-म्हटलेंच नाहीं. माझ्या ओळखीचा नाहीं कोणी. "

" मग चल तर बाहेर. "

" नाहीं मला आपल्याशीं कांहीं बोलायचें होतें म्हणून आलों होतों. "

" काय बोलायचें होतें ? "

" मला देखील आपल्याकडे शिकायला रहावयाचें आहे. "

" कोणाच्या परवानगीनें ? "

" स्वतःच्या इच्छेनें. "

" तुझीं वडील माणसें कुणी आहेत कीं नाहींत ? "

" नाहींत. "

" तुझें घर कुठें ? "

" मुलतानला. "

" बराच लांब आलास तर ! इथें तुझी सोयधाय कोणाकडे आहे ? कोणी नातेवाईक वगैरे ?— "

" मी तात्पुरती नोकरी पत्करिली आहे पोटासाठीं. "

" कोणाकडे. "

" जलालुद्दीनसाहेबांकडे. "

" ऑं ! ठीक आहे ! " किंचित् विचार करून पंडितजी पुनः म्हणाले—

" कसली नोकरी ? काय काम आहे तुझ्याकडे ? "

" निरोप पोंचविण्याचें. "

" काम छान आहे. "

" कसें म्हणतां ? "

" कारण तुझ्या इच्छेप्रमाणें तुला इकडेतिकडे फिरावयास अगर आमच्या मठा-कडे यावयास तुला सवड मिळेल या नोकरींत राहून. "

" होय " आनंदून तो मुसलमान तरुण म्हणाला.

" कायरे पण, तूं दिल्लींतल्या " मामा नागा " च्या मद्रशांत कां गेला नाहींस ? "

" मक्तबांतला आणि मद्रशांतला माझा अभ्यास थोडथोडा झाला आहे. मला हिंदी तत्त्वज्ञानाचा वगैरे थोडथोडा अभ्यास करावासा वाटूं लागला आहे. म्हणून आपल्याकडे आलों. "

" अस्सें ! तुझें पूर्वी अध्ययन कुठल्या मक्तबांत झालें ? "

" अं—कं—उं—मु—मुलतानच्याच. "

या अडखळण्यावरून पंडितजींची शंका दृढ झाली. हा तरुण मुसलमान कोणी

तेरी हेर आहे असा त्यांनीं कयास बांधला. तो बहुतकरून जलालुद्दीनचाच हेर असावा असें वाटलें. पण तरी त्यांना अद्यून त्या बाबतींत एक संशय होता. तो जलालुद्दीनचा हेर असता, तर जलालुद्दीनकडे आपण नोकरीस असल्याचें बोलला नसता. पण तसेंहि नाहीं. त्याला उघड उघड दिसणारी तेवढी खरी गोष्ट सांगून सत्याभास, व त्यामुळें आपल्या ठिकाणीं विश्वास उत्पन्न करावयाचा असेल.

" मग तुझा कसा काय बेत आहे ? "

" आपल्या सांगण्याप्रमाणें. "

" तूं इकडे येणार तो आपल्या धन्याच्या परवानगीनें कीं चोरून मारून ? " पंडितजींनीं आपली उलट तपासणी पुढें चालू केली.

" शिकावयाचें जमलें तर मी नोकरी सोडूनच देईन आणि येईन. "

" शिकण्याची तुझी इच्छा बरीच दांडगी दिसते. पण आपल्या आईबापांचा ठावठिकाणा कांहीं सांगितला नाहीं ? "

तरुण उगी राहिला.

" काय तुझ्या बापाचें नांव ? "

" कासीमखान. "

" आणि तुझें ? "

" गफूर. "

" तूं नोकरीवर असतांनाच तुला शिकण्याची संधि मिळाली तर ? "

या प्रश्नावर तो तरुण फार आनंदून गेला आणि हासला—त्याचें पंडितजींना नवल वाटलें.

" कां हांसलास ? "

" उगाच "

" उगाच नाहीं, खरें बोल ! "

" मी मघाशीं म्हटलें खरें कीं, शिकण्याकरितां नोकरी सोडीन म्हणून. पण नोकरी न सोडतां रात्रीच्या वेळीं सवड काढून शिकावें असा माझाहि बेत होता. तीच कल्पना आपणालाहि बरोबरच सुचली म्हणून मला हांसूं आलें. "

एवढें एकच उत्तर आतांपर्यंत झालेल्या प्रश्नोत्तरांत खरें होतें. बाकी एकही शब्द हा तरुण खरें बोलला नव्हता.

पण या त्याच्या खऱ्या उत्तरानें पंडितजींनाहि आनंद झाला. आणि तेहि हसले. एवढे कारस्थानी पंडितजी, पण तेहि या तरुणाच्या बातीला फसले. त्यांना वाटलें आजपर्यंत आपण ज्या संधीची वाट पहात होतों, ती आज आयतीच चालून आली. पण त्या तरुणाची परीक्षा पाहिल्याशिवाय ते त्याला कसील विश्वासांत घेण्यास तयार झाले नसते.

पंडितजींनीं आपली पुन्हा भेटण्याची वेळ व स्थळ सांगून त्याला वाटेस लावलें. आतां काळोख असूनहि तो इकडे तिकडे पहात चोरासारखा लपून छपतछपत चालला होता. पण ज्यानें त्याला पाहूं नये असें वाटत होतें त्याची नजर त्या लपत जाणाऱ्या तरुण मुसलमानावर गेलीच होती.

या प्रकरणांतल्या संवादांत पंडितजी हे मूळचे दक्षिणेकडचे असें खुद्द त्यांच्याच तोंडून आपल्याला समजलें आहे. ते गुजराथच्या बाजूचे इतकें आपणास सतीच्या जोधबाईशीं झालेल्या बोलण्यावरून कळून चुकलें होतें. तिच्या बोलण्यांत जेव्हां पंडितजींचा संबंध येऊं लागला, तेव्हां सतीनें आपलें बोलणें आवरलें, हेंहि आपण पाहिलें आहे. तेव्हां पंडितजींचा आणि सतीचा कांहीं तरी संबंध असला पाहिजे हें उघड होतें. तो संबंध काय असावा बरें?

दुसरी आश्चर्याची गोष्ट आपल्या ऐकण्यांत आली ती ही कीं, पंडितजींचा कल मुसलमान होण्याकडे आहे. पुष्कळ लोकांच्या तोंडून या गोष्टींचा उच्चार झालेला आहे. खुद्द पंडितजींनीं सुद्धां असें बोलून दाखविलें आहे. पण मुसलमान लोकांबरोबर पंडितजींनीं आपल्या धर्माचा कैवार घेऊन भांडतांनाहि आपण ऐकलेंच आहे. मग या परस्परविरुद्ध दोन गोष्टींचा मेळ कसा घालावयाचा? पंडितजींना खरोखरच बाटावयाचें होतें कीं, काय? तर मग हिंदू लोकांचा ते विश्वासघातच करीत होते, असें म्हणावें लागेल. पण या सर्व गोष्टी पाहिल्या आणि ऐकल्या कीं, सर्वांनाच गूढ पडे; मग तें तसें आपणांस पडलें तर काय नवल!

पंडितजींचा प्रवेश धर्मसभेंत होणार असेंहि आपण आतांच शिरहिंदीच्या तोंडून ऐकलें आहे. हा मान पंडितजींना कशाच्या वशिल्यावर मिळाला? पंडितजींच्या विद्वत्तेवरच काय? आणि फैझीला अकबरशहानें पंडितजींकडे कां ठेवला?

शिवाय पंडितजींना जलालुद्दीनची इतकी चौकशी कां बरें? आणि ते हिंदूंचे ग्रंथ विकण्यांत कोणतें पुण्य संपादन करीत होते? हें पंडितजींचें चरित्र सर्वच विचित्र आणि तोंडांत बोट घालावयास लावणारें आहे. हें कोडें केव्हां तरी उलगडणार यांत शंका नाहीं. आपणास पंडितजींच्या पाळतीवर फक्त राहिलें पाहिजे; अगदीं डोळ्यांत तेल घालून जागलें पाहिजे. पण पंडितजीवर पाळत ठेवणारे थोडे थोडके नाहींत किती तरी आहेत. आणि त्या सर्वांस चकवून पंडितजी उर्फ शास्त्रीजी आपलीं कारस्थानें चालवीत आहेत. तेव्हां त्यांचें रहस्य सहजासहजीं आपणास समजणार नाहीं.

आपण आणखी एक पाहिलें आहे कीं, आतांशा शिवशर्मा मठाकडे फारसा नसतो. मठाच्याच सेवेंत व कामागिरींत असतो. पण निराळ्या गोष्टींत मन घालीत असतो. पंडितजींना हें पुरतें समजलें आहे आणि पंडितजी या गोष्टीचा जाब शिवशर्म्याला विचारल्याशिवायहि रहाणार नाहींत.

तों पहा घाईघाईनें शिवशर्मा येतो आहे. त्यानें कांहीं तरी निरोप आणला आहे.

" काय, इतकी घाई कां ? "

" सतीला मोकळीक मिळाली. "

" खरेंच ? "

" ती सुटली देखील. "

" आपल्या नोकराला मी तिच्यावर नजर ठेवायला सांगून आपल्याला वर्दी द्यायला आलों. "

" पण तिला सोडली कशी ? "

आपल्या मर्जीनुरूप तिनें सती जावयाचें असल्यास जावें. अशा आशयानें तिला सोडून दिलें म्हणतात. "

" मग ती आतां कुठें आहे ? "

" ती आजची रात्र मठांत घालविण्याकारितां म्हणून इकडेच येत आहे. "

" पण तिच्या बरोबर—"

" हो आपला रजपूत गडी आहेच बाजूबाजूनें. "

" बरें ती आतां येईलच. पण शिवशर्मा ! जरा इकडे या आंत. " पंडितजी म्हणाले.

ते दोघे आंत गेले. दरवाजा बंद केल्यावर पंडितजी म्हणाले—

" तुम्ही आमच्या रहस्याचा स्फोट कोठें केला नाहीं ना ? "

हें ऐकून शिवशर्मा चपापला. तो म्हणाला—

" असें कां आपण आज मला विचारतां ? "

" मला तशी शंका येते म्हणून विचारतों. "

" कसली माझी शंका येते आपल्याला ? "

" काशीचे व इतर ठिकाणचे ब्राह्मण मला मारावयाचा बेत करीत आहेत हें आपण मला कसें कळविलें नाहीं ? "

" तें मी मागें एकवार बोलल्लों होतों. "

" पण हल्लीं त्यांचे हेर माझ्या मठाभोंवतीं घिरट्या घालीत असलेले मला दिसतात. "

" पण मला नाहीं उमगलें ! "

" खोटी गोष्ट. "

" अगदीं खरी. "

" माझ्या मागून या मठाचें स्वामित्व कोणाकडे जाणार आहे ? "

" फैझीकडे ? "

" काय मुसलमानाकडे ? "

काहूर उठायला तसेंच बलवत्तर कारण होतें. बदाउनी, हाजी, इब्राहिम प्रभृति मंडळी त्याचा आंतून द्वेष करीत असे. आणि या मंडळींचें विश्वंभरशास्त्री ऊर्फ पंडित-जीशीं सूत जमत आहे असें त्यांस समजलें होतें. शिवशर्म्यावर नाइलाजास्तव त्यानें विश्वास टाकला असला, तरी शिवशर्मा आपल्या मालकाच्या विरुद्ध वागणार नाहीं असेंहि याला वारंवार सकारण वाटे. दरबारचे मुत्सद्दी विश्वंभर शास्त्र्याला मुसलमान बनविण्याच्या विचारांत आहेत, ही चमत्कारिक हकीगत त्याला समजली होती. म्हणूनच ह्या खेपेस दिल्लीस गेल्यावर पंडितजींची भेट घ्यावयाचा निश्चय मुबारिकनें आपल्या मनाशीं करून ठेवला होता.

दिल्लीची मद्राशा म्हणजे फारशी पाठशाळा जिनें आपल्या दातृत्वानें स्थापन केली होती ती माम् अनागा ही मुबारिकच्या थोडीशी ओळखीची होती. ही बाई सज्जन असून ती अकबराची दाई होती. तिचा राजवाड्यांत व राणीवशांत प्रवेश असून तिचें अकबरावर थोडेसें वजनहि होतें. राण्या देखील तिला सासूपणाचा मान देत असत. ती आतां बरीच वृद्ध झाली होती. तिलाहि भेटावें असा बेत मुबारिकनें मनाशीं केला. विश्वंभर शास्त्र्याला मुसलमान बनविण्याचा आग्रह खुद्द बादशहाचा होता कीं, काय? हीं शंका त्याला आली म्हणजे तिचें समाधानकारक उत्तर त्याला सांपडत नसे. तो पुष्कळ विचार करी आणि मग व्यग्र झालेलें आपलें मन आपल्या कामांत गुंतवून टाकीत असे.

मनुष्याचें मन व्यग्र झालें, त्याच्यावर अनेक आपत्तींची परंपरा कोसळूं लागली व त्याचें चित्त उद्विग्न होऊन त्याला चैन पडेनासें झालें, कीं मनाला स्वस्थ बसविण्या-करितां, त्याला कुठें तरी गुंतवून टाकण्याकरितां, त्याच्या व्यापारांना बंधन घालण्या-करितां मनुष्य उपाय शोधूं लागतो. अशाच वेळीं तो बहुधा व्यसनांच्या आधीन होत असतो. चांगलीं शिकलीं सवरलेलीं माणसें सुद्धां अशा वेळीं अमली पदार्थांच्या अटोक्यांत जात असतात. मग हलक्यामनोवृत्तीच्या अगर अशिक्षित माणसांनीं अस-ल्याच एखाद्या कारणास्तव दारूसारख्या जीवनभंजक व्यसनाचा आश्रय केल्यास तें अक्षम्य कसें मानावें? तथापि उच्च संस्कृतीच्या माणसांना विद्या आणि कला यांच्या व्यासंगा-सारखें मनाच्या चाळ्यांना आळा घालणारें दुसरें दिव्य औषध देवांना सुद्धां लाभणारें नाहीं. काव्य, ललितकला, लेखन, वाचन, अध्यात्मविवरण, अशाप्रकारच्या जालीम मात्रा मनाला योग्य प्रकारें गुंतवून ठेवावयाला समर्थ आहेत. लेखन आणि वाचन यांचा व्यग्रतेच्या प्रसंगीं इतका उत्तम उपयोग होतो कीं, त्या दोन कलांच्या दानाबद्दल मनुष्यप्राण्यानें परमेश्वराचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. विद्याव्यासंगाच्या योगानें संकटकाळीं हादरलेलें मन चांगलेंच तयार होतें आणि दुर्दैवाचे आघात सोसा-वयास कणखर बनतें. असा ह्या नम्र लेखणीचा स्वानुभव आहे, व अशाच संकटप्रसंगीं या लेखणीनें हा व्यवसाय लावून घेतला आहे. ज्या वेळेस जीविताचा भार दुःसह वाटूं लागतो, ज्या वेळीं जगत् उदासीन आणि निराशामय दिसूं लागतें, अगणित

अन्यायांच्या आणि दुष्ट प्रवृत्तींच्या कीटकांच्या बुजबुजाटानें जग भरलेलें दिसून तें भयंकर भासूं लागतें, ज्या वेळीं परमेश्वर अनीतिप्रवर्तकाला उत्तेजन देणारा अतएव निष्ठुर असावासा मनाचा कल झुकूं लागतो आणि म्हणूनच ज्या वेळीं मन प्रथम निराशावादाच्या भलतीकडे नेणाऱ्या वाटेवर पाऊल टाकून, निरीश्वरतेच्या वादाच्या जंगलांत भडकूं लागून नास्तिक्याच्या खोल दरीच्या कांठांवर भिरभिरूं लागतें, त्या वेळीं उत्कृष्ट वाङ्मयाचा अभ्यास, लेखन, वाचन, संगीत, चित्रकला या अमूर्त देवता त्या मनाचा तोल सांवरून धरूं लागतात. मुबारिकचें व्यग्र झालेलें मन अशाच विद्याव्यासंगांत स्थिर असल्यामुळें त्याला दिवस काढतां येत असत. त्यानें आरंभिलेलें काम पुरें करण्याच्या निश्चयानें रेटण्यास चंग बांधला. झालेलें तेवढें काम घेऊन त्यानें दिल्लीस ज्याण्याचा बेत मुक्रर केला.

अगदीं पहिल्या प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें बदाउनीनें अथर्ववेदाची पोथी पदरांत पडत नाहीं, तर निदान विश्वंभरशास्त्रीजींना मुसलमान करण्याचें श्रेय मिळवावें असा उद्योग आरंभिला. त्याचप्रमाणें आपल्या हेरांच्या नायकाबरोबर कारंजाजवळच्या खुर्चीवर बसून चांदण्यांत बोलतांना अकबराच्या मनांत आलेली ती कल्पना हीच होती. बदाउनीनें पंडितजींचें मन वळाविण्याचा प्रयत्न केला. बदाउनीकडे केव्हां केव्हां पंडितजी जात येत असत. पंडितजींना आपण मुसलमान करून बादशहाला चकित करावें असा त्याचा बेत होता. जुलूमजबरदस्तीचा मामला असता, तर या मुत्सद्द्यांनीं पंडितजीला कधींच मुसलमान केला असता. पण अकबर जुलूमजबरदस्ती करूं देणार नाहीं, हें सगळ्या मुत्सद्द्यांना खूप कळून चुकलें होतें. याचसाठीं या सर्व शहाण्या मुत्सद्द्यांना राजा नेभळा आणि धर्मभ्रष्ट वाटत असे. पण त्या सर्वांचा नाइलाज होता. जुलूम न होतां आपखुषीनें पंडितजी मुसलमान झाले असते तर अकबर बादशहला बरें वाटलें असतें, इतकें धोरण बदाउनी, शिराहिंदी वगैरे लोकांनीं ताडलेंच होतें. आणि मुसलमान झाल्याशिवाय तोडरमल्लाप्रमाणें तरवारीच्या जोराच्या शिपाईबाण्यावर दरबारांत प्रवेश मिळण्याचा आपल्याला या जन्मीं संभव नाहीं, ही गोष्ट पंडितजीला सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसत होती. पंडितजीला आपलें ध्येय या सर्व मुत्सद्दीमंडळींत मिसळल्याशिवाय साधतां येणें फार अवघड भासत होतें. आपलें हिंदुत्व डळमळीत आहे, असें या लोकांना भासावें असें त्यानें धोरणी वर्तन ठेवलें होतें; पण शिरहिंदीबरोबर झालेल्या मुलाखतींत इरेस पेटून त्याचें जें भाषण झालें त्यावरून त्याचें खरें अंतःकरण उघड झालें.

असल्या वागणुकीनें आपल्यावर कोणी विश्वास टाकणार नाहीं हें पंडितजीला ठाऊक होतें. त्याला दोन गोष्टी साधावयाच्या होत्या. त्यांपैकीं एक गोष्ट साधण्याचा प्रसंग जवळ जवळ येऊं लागला होता, पण दुसरीच्या साधनासाठीं धर्मत्याग करावा कीं काय, हा प्रश्न पंडितजींना एकदांचा सोडवून टाकावयाचा होता.

" ध्येय कितीहि उच्च असो, पण त्याकरितां मी धर्मत्याग करूं काय? "

हा प्रश्न पंडितजींना अद्याप सुटलेला नव्हता. धर्मत्याग करून संस्कृत ग्रंथांचा पुरवठा बादशहास व त्याच्या मुत्सद्दी मंडळास केल्यास आपल्या कोणत्याहि कृत्याचा अविश्वास कोणासहि वाटणार नाहीं, असच त्याला वाटलें. त्या वेळीं संस्कृत ग्रंथ मुसलमानांस मिळूं नयेत अशी संघटना हळूहळू हिंदूंत होऊं लागली होती. बादशहानें बक्षीसें, इनामें, मरातबी, जहागिरी, वतनें, सनदा देऊं केल्या तरी आपले अस्सल धर्म अगर नकला कोणी द्यावयास तयार होईना. तेव्हां बादशहाचा इलाज खुंटला. अशा वेळीं दक्षिणेंतून गुर्जर देशांकडून राजपुतान्याच्या वाटेनें आलेला विश्वंभरशास्त्री बादशहाच्या उपयोगीं पडूं लागला. त्याचे उपकार स्मरून बादशहानें त्याला नेमणूक सुरू केली. होतां होतां तो लोकांच्या अधिकाधिक विश्वासास पात्र होऊं लागला; पण तितका तितका तो स्वजनांस व स्वधर्मीयांस दूरदूरचा भासूं लागला. एक बाजू सांवरावयास जावें तर दुसरी आंगावर येऊं लागली.

अकबर बादशहानें तुरुंगाच्या शिक्षेच्या भीतीवर हिंदु धर्माचे प्रयत्न करून ते अयशस्वी ठरल्यावर वरील लालुचीचे प्रयत्न सुरू केले होते, पण त्यांनाहि यावें तसें यश यईना. तेव्हां तो निराश होऊं लागला होता. अशा वेळीं विश्वंभरशास्त्रयाचे त्याला किती तरी अभार वाटले. आपल्या धर्मसभेचा सभासद त्याला करावा असेंहि त्यानें ठरविलें. फाझलनें त्याला अनुमति दिली. पंडितजीसारखा माणूस मुसलमान होऊं नये असें कोणा मुसलमानाला वाटेल?

अकबराची इच्छा होती ती कावेबाजपणाची होती. अकबराला आतां हळूंच फैझीला पंडितजींकडून काढून घ्यावयाचा होता. पण फैझीच्या बाबतींतलें रहस्य मात्र त्याला कोणाकडेच बोलावयाचें नव्हतें. फैझीला त्याच्याकडून काढला तर त्याला वाईट वाटेल, कारण फैझीला आपण पंडितजींकडे कां ठेवला, किती मुदतीकरितां ठेवला वगैरे कांहींहि कळूं दिलें नव्हतें, व पुढेंहि कळूं देणार नव्हता. मात्र त्याला तो तिथून काढून घेणार होता. फैझीला तेथून काढतांनाच पंडितजींला धर्मसभेचा सभासद करून दिल्लीहून हालवून शिक्रीला पाठवावें असें त्यानें ठरविलें. पण याची जाणीव पंडितजीला होत होती. नवीन नवीन कळणाऱ्या बातम्यांला अनुसरून तो आपले पुढील बेत जुळवीत होता. मेवाडकडे त्याचे गुप्त दूत जात येत असत. पण आतां त्याच्याबद्दल प्रतापसिंहाचें मत कलुषित होणार होतें. शिवाय आपला बेत त्या सरळ मनाच्या योद्धयाला रुचणार नाहीं, याविषयींची त्याला पूर्ण खातरी होती.

आपल्या गुर्जर देशांतील घरांकडे कामानिमित्त माणसें पाठवीत असतों, या मिषाखालीं त्यानें दरबारच्या हालचाली प्रतापसिंहाला कळविण्याचा क्रम ठेवला होता. तरी देखील त्याचे निरोप योग्य वेळीं योग्य ठिकाणीं पोंचत असेंच केवळ नाहीं. पुष्कळ वेळां त्यांना प्रतापसिंहाचा योग्य वेळेपूर्वी पत्ताहि लागत नसे. कित्येक वेळां तीं प्रवासाच्या त्रासानें मृत्युमुखीं पडत अगर हिंस्र श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडत. कित्येक वेळां तीं शत्रूच्या हस्तगत होत व मारलीं जात. एखादे वेळीं त्याचा निरोप प्रतापसिंहास मिळे

व त्याला आगामी संकटाशीं झगडण्याची पूर्व तयारी करावयास मुदत मिळत असे. अशा वेळीं तो मोंगल सैन्यास भारी होई. त्याचींहि माणसें विश्वंभर शास्त्र्याच्या माणसांस भेटण्यास अर्ध्या अर्ध्या पल्ल्यावर पुढें येऊन राहात असत. पण याहिपेक्षां जास्त सहाय्य आपल्या धर्मवीरास कसें करतां येईल, हीच एक विवंचना पंडितजीला लागली होती.

मग काय त्यासाठीं धर्मत्याग करावयाचा? एकाच्या धर्मत्यागानें अनेकांच्या धर्मरक्षणाची सोय होत असेल, देशाचें स्वातंत्र्य टिकत असेल, देशभक्त धर्मवीर योद्ध्याला कांहीं सहाय्य करावयास सुलभ जात असेल, सतीसारख्या पतिव्रतांची अब्रू रक्षण करतां येत असेल, तर आपण एकट्यानें धर्मांतर करून असली कामगिरी करण्याचें कां टाळावें? आलीच पाळी तर धर्मांतर करण्यास कांहीं हरकत नाहीं. आपण मनानें हिंदूच राहूं. जरूर तर पुनः हिंदू होऊं. अथवा मनानें हिंदू आणि शरीरानें मुसलमान होऊं. पण 'आलीच पाळी तर असे' म्हणावयास नको होतें. कारण आतां पाळा आलेलीच होती. थोड्याशाच कालावधीचा आतां प्रश्न होता.

तर मग पंडितजीचें मन कां कचरत होतें? तें प्रतापसिंह आणि तोडरमल्ल यांच्या होणाऱ्या गैरसमाजासाठीं. त्यांची समजूत भलतीच होणार आणि हे दोघे आपणाशीं इतःपर फटकून वागणार, ही भीति त्याला होती. यासाठीं त्याचें मन पुनः पुनः कच खात होतें. त्यांतूनहि तोडरमल्ल दिल्लींत होता. तोडरमल्लाची समजूत त्याला करतां आली असती. पण प्रतापसिंहाला वस्तुस्थितीची खात्री कशी करून द्यावयाची? तेव्हां त्याचें मन मागेंपुढें पहात होतें. धर्मांतर करावें कीं न करावें हा प्रश्न मनाला सुटल्यासारखा वाटला तरी सुटत नव्हता. प्रश्न खरोखरच बिकट होता. तो पुनः पुनः उचल घेत होता. आणि हेलकावे घेणाऱ्या मनाच्या असल्याच आंदोलित स्थितींत त्याला सती—जलालुद्दीन प्रकरणाचा शेवट करावयाचा होता.

जलालुद्दिनाला नजरकैदेंत ठेवण्यांत आलें होतें. पण शरण येऊन पुन्हां असें न करण्याची शपथ घेऊन माफी मागितल्यावर त्याला मोकळें करण्यांत आल्याची दाट वदंता होती. खरी स्थिति काय होती हें कोणासच ठाऊक नव्हतें.

जलालुद्दीनाला मोकळें करण्यांत आल्यानंतर चार पांच दिवसांच्या अवकाशांत सतीला आपल्या मतानुसार वागण्यासाठीं मोकळें करण्यांत आलें. ती रात्रौ मठाकडे येत होती व जोरावरसिंग तिच्याबरोबर भाऊ म्हणून संरक्षक होता. तिला वाटेंत त्या पूर्वींच्या नातलगांनीं गांठलें व जोरावरसिंगाला त्यांनीं तिला निमूटपणें आपल्या स्वाधीन करावयास सांगितलें. पण जोरावरसिंग त्यांना ऐकेना. शेवटीं प्रकरण मारामारीवर बेतलें आणि जोरावरसिंगाला घायाळ करून ते चारपांच असामी सतीला पळवून घेऊन गेले. बिचारीच्या दुर्दैवाचा अंत अद्याप व्हावयाचा राहिला होता!

हा प्रकार पंडितजीला शिवशर्म्यानें आणि त्यानंतर घायाळ झालेल्या जोरावर-सिंगानें येऊन सांगितला. त्यावर पुढें काय करावयाचें याचा बेत पंडितजीनें आपल्या

मनाशीं ठरविला आणि तो जोरावरसिंगालाहि कळविला. पण एकदोन दिवस नाहीं तरी त्या दिवशीं तरी जोरावरसिंगाला पुन्हां कामगिरीवर पाठवितां येण्यासारखें नव्हतें. त्याला झालेली दुखापत बरी होण्यास थोडासा औषधोपचार आणि विश्रांति पाहिजे होती. पण जोरावरसिंग या गोष्टीस कबूल नव्हता. त्यानें त्याच रात्रीं आपला बेत तडीस नेण्याची उत्कंठा दर्शविली. जोरावरसिंगाचे तिघे सोबती आजपर्यंत मठांत जोरावरसिंगाबरोबर राहिले होते, ते याच कार्यासाठीं राहिले होते. मोकळे असतांना आळीपाळीनें उदेसिंहाकडे जाऊन येणें व पंडितजींच्या निकट सांनिध्यांत राहणें या पलीकडे दुसरी कामगिरी त्यांना करावी लागत नसे. ते जोरावरसिंगाचे नोकर त्याच्या जिवास-जीव देणारे होते. क्वचित् ते तोडरमल्लास व त्यांच्या लोकांस भेटत असत व विशेष विश्वासाचीं पंडितजींचीं कामें बजावीत असत. स्वतः जोरावरसिंग हा सतीचा दीर असून तो आपल्या बंधूच्या मृत्यूचा सूड जलालुद्दिनावर घेण्याकरितां हेराचा पेशा बाह्यात्कारीं पतकरून इतके दिवस दिल्लींत राहिला होता.

मेवाडांतून येतांना सतीला जलालुद्दीननें आणली आणि आपल्या वाड्यांत बरेच दिवस डांबून ठेवली. पण सती डोळे उघडून जर कोणत्या पदार्थावर नजर घालीत असेल तर फक्त त्या शेल्यावर. त्या एका शेल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि वस्तूवर ती नजर उघडून पहात नसे. दूध किंवा फळें मिळालीं तर तेवढीं खाऊन ती आपलें प्राणरक्षण व्हावें म्हणून दिवस काढीत होती. अशा प्रकारें बरेच दिवस झाले तरी सती आपणांस वश होत नाहीं, असें पाहून तिच्यावर जबरदस्ती करण्याचा त्याचा विचार होता. पण इतक्यांत बंगाल्यांत तोडरमल्लाच्या मदतीस सैन्याची कुमक अवश्य भासूं लागण्याचे समजतांच कुमकेकरितां सैन्य घेऊन जाण्याचा हुकूम बादशहाकडून आल्यामुळें जलालु-द्दीनला आपला बेत रहित करून बंगाल्याकडे जावें लागलें होतें. परंतु जातांना एक भुयाराची गुप्त वाट दाखवून त्यानें आपल्या पदरच्या एका विश्वासू जमेदाराच्या स्वाधीन तिला करून स्मशानांतल्या मोडक्या इमारतीखालील तळघरांत तिला दडवून ठेवावयास सांगितलें.

आपला धनी येईपर्यंत तिच्यावर नजर ठेवून तिला वश करून घेण्याची कामगिरी या जमेदाराला करावयाची होती. पण धन्याकरितां ही कामगिरी करीत असतां त्या तळघरांत गेल्यावर त्याला आपणच क्षणभर धनी व्हावेंसें वाटे व त्याप्रमाणें तो प्रयत्न करून पाही. परंतु तो अगदीं सलगी करावयाच्या बेतास आला कीं, तळघरांत मोठा दणदणाट होई व जमीन हादरूं लागे. आणि वरती येऊन पाहिल्यास बारीक खड्यांचा मारा त्याच्यावर होत असे.

त्याला आपल्याबरोबर आणखी मदतगार घ्यावेसे वाटत. पण आपली नीच प्रवृत्ति आपल्या धन्यास त्या लोकांकडून समजेल ही भीति त्याला होतीच. म्हणून ज्या दिवशीं धन्याबद्दलची वाखाणणी त्याला निर्भेळपणें करावयाची असे, त्या दिवशीं तो एक दोन माणसें बरोबर घेत असे. ज्या दिवशीं तीं माणसें अधिक येत असत, त्या

दिवशीं भुयारांत व पडक्या इमारतींच्या भिंताडांतून दणदणाटहि तितकाच अधिक जोराचा होत असे. त्यामुळें त्या सर्वांस भीति वाटून चोरवाटेनें ते निमूटपणें जीव मुठींत घेऊन पळून जात असत.

जलालुद्दीनच्या सैन्याची कुमक पोंचावयाच्या पूर्वींच तोडरमल्लची मोहीम यशस्वी होऊन तो मागें परतूं लागला आणि तेवढ्यांतच त्याला हें मदतीचें सैन्य मिळालें. तें गेलें तसें हात हालवीत परत आलें आणि जलालुद्दीनला तरी तेंच पाहिजे होतें. त्याला त्या मोडक्या इमारतीच्या तळघरांतल्या विषयाकडे लक्ष पुरवावयाचें होतें.

ही मोडकी इमारत लोदी घराण्याच्याहि पूर्वींची होती. तो वाडा ओस पडल्यावर त्यांत कोल्ह्यांकुत्र्यांची वस्ती झाली होती. जवळ स्मशानभूमिका व प्रेतें पुरण्याची जागा असल्यामुळें तिकडे कोणी जावयास धजत नसे. आणि आतां तर जमेदार स्वानुभवानें छातीवर हात ठेवून त्या बाजूस फार भयंकर भुताटकी असल्याचें सांगूं लागला. त्यामुळें तिकडची वाट सर्वांनीं वर्ज केली होती. कारण चुकूनमाकून त्या वाटेनें कोणी गेलाच, तर मध्यरात्रीच्या सुमारास दणदणाट, खडखडाट आणि किंकाळ्या कोणाच्याहि कानांत पडण्याइतक्या मोठ्यानें ऐकावयास येत असत. व त्यांचा अनुभव आल्यानंतर त्या ऐकणारा त्यांची रसभरीत व भीतिजनक हकीगत पाल्हाळपूर्वक आणखी पांचपंचवीस जणांस सांगून त्यांनाहि आपल्याचसारखा घाबरावयास लावीत असे. मग आपला सुखाचा जीव धोक्यांत घालावयास आणि विषारी परीक्षा करून पहाण्यास त्या बाजूस आपण होऊन कोण कशाला जातो?

तरी देखील त्या विषाची परीक्षा पहाण्याची बुद्धि एके दिवशीं शिवशर्म्यास झालीच. ती हकीगत मागें तिसऱ्या प्रकरणांत आलीच आहे. बरोबर जोरावरसिंग होता. जोरावरसिंगाला हा प्रसंग बिकट वाटला. खरा प्रकार काय आहे तो जोरावरसिंगाला ठाऊक होता. पंडितजीबरोबर क्वचित् तो त्या भुयारांत जात असे. पण बहुधा पंडितजी-बरोबर त्याचे नोकर जात असत आणि तो बाहेर पाळतीवर रहात असे. जलालुद्दीन आल्याशिवाय त्याच्या कामगिरीला सुरुवात व्हावयाची नव्हती.

शिवशर्मा आतां पुढें जाणार असें ताडतांच तो आपण होऊनच कांहीं माहीत नसल्याचें सोंग आणून पुढें गेला. आंतील भुताटकीच्या तो परिचयाचा होता. विशिष्ट प्रकारें खोंकल्याबरोबर बाहेर कोणी शत्रु नाहीं अशी खात्री होऊन आंतील भुताखेतांनीं त्यांना खड्यांचा मार चारला आणि शिवशर्मा व त्याच्याबरोबर जोरावर-सिंग पळत सुटले. तथापि जोरावरसिंगाला सगळा खरा प्रकार ठाऊक असूनही त्यानें अखेरपर्यंत फारच बेमालूम काम करून शिवशर्म्यास भिवविलें आणि चकविलें. सकाळीं जेव्हां ती बातमी इतरांस समजली तेव्हां दिवस मावळल्यानंतर चुकूनही त्या वाटेनें कोणी जावयास कबूल होईना.

हें काम उत्कृष्ट वठलें. बरेच दिवसपर्यंत सतीच्या वाटेस कोणी गेलें नाहीं. तिचे रक्षक तिच्या पाळतीवर होते व ते तिला गुप्त भेट देऊन दिवस काढावयास सांगत असत. तिला तेथून पळवून नेण्यास त्यांना संधि नव्हती असें नाहीं, पण त्यांना तसें करावयाचें नव्हतें. बादशहाची परवानगी सती जावयास पाहिजे ती मिळवावयाची होती. सतीला आणल्यानंतर मठांत तिला ठेवणें शक्य नव्हतें; आणि जलालुद्दीनला कंठस्नान घातल्याशिवाय पंडितजी आणि जोरावरसिंग या दोघांच्या प्रतिज्ञा पूर्ण होत नव्हत्या. इतक्या गोष्टी साधायला त्यांना अनुकूल संधीची वाट पहात बसणेंच क्रमप्राप्त होतें. तोंपर्यंत तिला खायलाप्यायला मठांतून पंडितजींमार्फत मिळत असे.

जलालुद्दीनच्या वाड्याकडून निघालेलें भुयार या पडक्या घराच्या जवळच्या एका प्रचंड वृक्षाच्या मुळाशीं उमटलें होतें. येथून पुढें त्यांना चालत जावें लागे व तें दार खोलून आंतील गुप्त मार्गानें त्यांना खालीं उतरावें लागत असे. वरती आल्यावर भरपूर हवा, प्रकाश वगैरे होताच; पण खालीं देखील हवा खेळती राहत असे. म्हणूनच जलालुद्दीन अगर त्याचे लोक आंत गेले कीं आंतून त्या मोडक्या घराच्या कड्या लावून घेत व बाहेर पडले कीं बाहेरूनही कड्याकोयंड्या लावीत असत. ह्या कड्याकोयंड्या कोण लावतो ह्याचें देखील एखाद्या चुकारू वाटसरास मोठें नवल वाटे. पण तिकडे कोणी लक्षच देत नसे.

याच्या उलट मठाकडून एक भुयार होतें. त्याची माहिती कोणासच नव्हती. तें भुयार पाहिलें आणि पंडितजींनीं दिल्लींत रहावयाची आपली जागा निश्चित केली. हें भुयार आंतून थेट त्या पडक्या घराच्या तळघरास जाऊन पोंचलें होतें व त्याची रचनाही फार गमतीची व चांगली व गूढ अशी होती. त्यामुळें पंडितजींना मठांत गुप्त होऊन तळघरांत उमटणें सोपें पडत असे. या सर्व गोष्टींपैकीं एकीचाही मागमूस शिवशर्म्यास नव्हता. पण शिक्रीला जाण्याचा बेत व्हावयाच्या पूर्वी पंडितजींना आपलें इच्छित साधलें पाहिजे होतें. त्याची वाट पहात ते बसले असतां खुषरोज आणि मीनाबाजार ह्या उत्सवांचा समय येऊन ठेपला व तो ऐकून पंडितजींस आनंद झाला. पण दरम्यान जलालुद्दीननें बंगालहून परत आल्यावर निराळीच कारवाई केली होती. त्या कारवाईचा परिणाम बिचाऱ्या सतीला भोगावा लागत होता. ती कारवाई म्हणजे सतीला कांहीं विशिष्ट द्रव्य देऊन तिचा बुद्धिभ्रंश करणें ही होय.

खाण्याच्या वस्तूंमधून तिला अशा प्रकारचीं द्रव्यें भरविण्यांत आलीं कीं तिला स्वतःची शुद्धिच नाहींशी व्हावी. असें करण्यांतला नीच हेतु वाचकांस उघड करून सांगण्याची मुळींच जरूर नाहीं. जलालुद्दीनला आपला नीच हेतु आतां शक्य तितका लवकर तडीस न्यावयाचा होता. पंडितजींच्या दृष्टीनें हेंही ठीकच झालें. पण जलालुद्दीनला सतीच्या वाटेस आपल्याशिवाय दुसरें कोणी तरी जाणारें आहे असें समजूं लागलें होतें. पण तें कोण आणि कोणत्या हेतूनें याचा तर्क त्याला बरोबर करतां आला नव्हता. याचसाठीं हा प्रयोग त्यानें केला होता. आणि त्यानें आपले बातमीदार टेहळेकरी आसपास ठेवले होते.

पण पंडितजींनीं सतीची सुटका योग्य वेळीं केली. पण तिची स्थिति पाहून त्यांची निराशा झाली. तथापि अकबर बादशहाच्या नजरेस जलालुद्दिनचें चरित्र पडावयाला याच्यासारखी दुसरी बिनतोड संधि मिळणें शक्यच नव्हतें. जोरावरसिंगाचें वेषांतर करून त्याला तिचा भाऊ बनविला आणि तिला मीनाबाजाराकडे सोडून दिली. तिची स्थिति त्या दिवशीं अगदीं बेताल झालेली होती.

जोरावरसिंग आणि सती मीनाबाजाराकडे चाललीं असतां पोंचावयाच्या सुमारासच अगदीं आयत्या वेळीं जलालुद्दिनच्या लोकांच्या तावडींत सांपडलीं. ते लोक तयारीनेंच आले होते. पण जोरावरसिंग ही एक केवढी तरी मोठी धोंड त्यांच्या वाटेवर आडवी होती. शिवाय आतां सतीच्या किंवा जोरावरसिंगाच्या जीवास अपाय करणेंही सुरक्षितपणाचें नव्हतें. तसें केल्यास त्यांना त्याच वेळीं आपल्या प्राणांस मुकावें लागलें असतें हें न समजण्याइतके ते खुळे नव्हते. म्हणून विषाचा प्रयोग करण्याचा सोपा उपाय त्यांनीं अमलांत आणला.

मेंदू बिघडविण्याचा प्रयोग एक दोन दिवसांपूर्वीं झालाच होता. कोण्या शत्रूनें संधि साधून सतीला सोडली, तेव्हां आपला शत्रु आपणाहून प्रबल आहे असें त्यांस वाटलें.

आतां आपलें सर्व बेंड बाहेर फुटलें तर धडगत नाहीं हें जाणून जलालुद्दिनाच्या सूचनांप्रमाणें त्याच्या लोकांनीं तिला विषप्रयोग केला. तो पाहून जोरावरसिंगाला अतोनात दुःख झालें. आपल्या प्राणांचा बळी देऊन त्यानें त्या दोघांतिघांनाही लोळवलें असतें; पण जी अडचण जलालुद्दिनाच्या लोकांना तीच त्यालाही आली. त्याला दैवाचे खेळ पहात स्वस्थ बसावें लागलें. म्हणूनच त्याच ठिकाणीं तो मांडी घालून स्वस्थ बसून राहिला.

सुदैवानें बैराग्याची फेरी अचानक होऊन एकंदर प्रकाराला .निराळेंच स्वरूप प्राप्त झालें ही परमेश्वरी घटना. पण ती विचित्र घटना पाहून जोरावरसिंगाला नवा जोम आला. त्यानें सर्व हकीगत पंडितजीला कळविली.

आतां त्या दोघांनाही तितकीशी काळजी वाटत नव्हती. सतीचें संरक्षण वाड्यांत चांगलें होईल व सर्व जुलमी प्रकार आपोआप बादशहाच्या कानावर जाईल आणि परस्पर जलालुद्दिनाचा कांटा जाऊन खरा प्रकार उघडकीस येईल, असें वाटून पंडितजीला समाधान झालें. मठाची हकीगत व आपल्याबद्दल कोणतीच गोष्ट सांगू नको असें सतीला पंडितजीनें पढवून ठेवलें होतें, पण तिच्याकडून तितकें अवधान राखलें जाईल कीं नाहीं ही त्याला जबरदस्त शंका होती. सतीही त्याच्याबद्दल कांहीं बोलली नाहीं, हें वाचकांस ठाऊक आहेच. पण आतां काय करावें हें मात्र पंडितजीला समजेना. सतीला मोकळी सोडली आणि जलालुद्दीनलाही साध्या कैदेच्या शिक्षेवरून सोडून दिला याचा अर्थ काय ? अकबरबादशहा अपराध्यांस दंड करावयास तयार नाहीं असें कसें ? या असल्या महान् पातकाचा उच्चार होतांच जलालुद्दीनला अकबर अत्यंत कडक शासन

करणार असा पंडितजींचा कयास होता. पण तो खोटा कसा ठरला ? पंडितजींनाही याचें नवल वाटलें. पण मागाहून त्यांना यांत कांहीं तरी गोम असली पाहिजे, असें वाटलें. पण जलालुद्दीन, त्याचे साथीदार व इतर मुसलमान यांना या गोष्टीचा अपरिमित आनंद झाला.

जलालुद्दिनानें आपल्या माणसांस सतीला पूर्वीच्याच तळघरांत कोंडून ठेवावयास सांगितलें. आज स्वारी अगदीं चैनींत होती. मध्यरात्रीनंतर त्यानें तळघरांत जावयाचें ठरविलें होतें.

दरम्यान सतीला औषधोपचार झाल्यामुळें तिची प्रकृति नीट झाली होती. आपला सतिधर्म आपल्याला आतां विश्वंभरशास्त्र्यांच्या मदतीनें यथासांग पार पाडावयास मिळणार, म्हणून तिला पराकाष्ठेचा हर्ष झाला होता. पण तिच्या आशेचे मनोरे एकाएकीं ढांसळले आणि ती पुन्हा शत्रूच्या तावडींत सांपडली. काय करणार बिचारी ? तिचा आनंद पार मावळला. आतां आपला निभाव लागणें कठीण, अशा विचारांत ती असहायपणें रुदन करूं लागली.

बादशहानें आपल्याला मुक्त केलें, त्या अर्थी आपली कैफियत बादशहास पटली असेंच जलालुद्दिनास वाटलें. शिवाय आपण एक लढवय्या असून लवकर काढावयाच्या काश्मीरवरच्या स्वारींत आपली रवानगी होणार अशी बोलवा त्याला समजली होती. अर्थात् आजच्या त्याच्या आनंदास पारावार नव्हता. त्यानें आज आपल्या वाड्यावर मेजवानीचा बेत केला होता. सतीला वाड्यावरच आणावयाचा त्याचा पहिला बेत होता. पण त्याच्या सल्लागारांस तो बेत पसंत पडला नाहीं. कारण पडक्या घराची जागा जशी असल्या कामकाजास निर्भयपणाची होती, तशी शहरांतल्या वाड्याची जागा निर्भयपणाची नव्हती. शेवटीं जलालुद्दिनाला आपला हेका बाजूस ठेवून त्यांच्या मतासच मान तुकवावी लागली.

पंडितजी मात्र बराच वेळ विचार करीत होते. सतीला आज जलालुद्दीन कुठें ठेवतो याचें अनुमान पंडितजींना करतां येईना. तसेंच ह्या दोघांनाही सोडून देऊन एक प्रकारचा अन्याय करण्यांत बादशहाचा कांहीं तरी इरादा आहे असें पंडितजींस वाटूं लागलें. तो इरादा काय असावा ? कदाचित् अकबर आज जलालुद्दिनाला मोकळा करून त्याच्या गैरसावधगिरीचा फायदा तर घेणार नसेलना ?

जलालुद्दीन मोकळा झाल्यापासून नाचरंग करीत होताच, पण आपल्या हातांतून सुटलेली शिकार पुन्हा आपल्या हातांत सांपडल्यामुळें त्याला अतिशयच हर्ष झाला होता. तसा होणेंही साहजिकच होतें.

पण अकबराचा इरादा काय होता ? कांहीं दिवसांपूर्वी जलालुद्दिनाला मोकळा सोडून देऊन आणि आज सतीला सोडून देऊन अकबराला काय पहावयाचें होतें ? सतीला आपला सती जाण्याचा सतिधर्म पाळावयास सोडून दिलें यांत झालें तें ठीकच झालें. पण जलालुद्दिनासारख्या पाजी अपराध्याला सोडून द्यायला, काय, त्याचा अप-

राध अकबराला कळलाच नव्हता ? राणीवाड्यांत सती इतके दिवस राहिली असतां आपल्या हालअपेष्टांची कर्मकहाणी तिनें अजून सांगितलीच नव्हती ? जर ती सांगितली असेल आणि अकबराला ती कळली असेल, तर जलालुद्दिनाला शिक्षा केल्याशिवाय सोडण्याचा पक्षपात जो अकबरानें दाखवला, तो काय मुसलमान म्हणून दाखवला ?

शक्य नाहीं. राजाला पक्षपात ठाऊक नसतो. अथवा हा सिद्धांत उलट मांडला पाहिजे. आपल्या प्रजेबद्दल ज्याच्या मनांत पक्षपात नसतो तोच खरा राजा. राजाला आपली प्रजा आपल्या लेकरांप्रमाणें. त्याला आपल्या सर्व प्रजेला सारख्याच प्रेमानें वागविलें पाहिजे. धर्म, जात, पंथ, या भेदांच्या मोहाला वश होऊन पक्षपातीपणा राजा दाखवावयाला लागला कीं समजावें कीं त्या राजाची राज्यश्री त्याच्यावर कोपली आहे. राजा पक्षपात दाखवूं लागला कीं राजाची नीतिमत्ता चळूं लागते. राजा हा एका जातीचा, एका धर्माचा, एका पंथाचा असा नसतो. ह्या असल्या निरनिराळ्या घटकांचे स्वामी निरनिराळे असतात. पण राजा हा सगळ्यांचाच स्वामी आहे. तो सगळ्यांनाच पितृस्थानीं आहे. आणि म्हणूनच त्यानें राज्यांतल्या यच्चावत् प्रजेस समतेच्या न्यायानें वागविलें, पाहिजे अशीच खरी राजनीति आहे. जे राजे ही राजनीति जुमानीनातसे होतात, ते धुळीस मिळतात; ते राजेपणाला मुकतात; ते कर्तव्यभ्रष्ट होतात. जगांत त्यांच्या विनाशानंतर त्यांची अपकीर्ति इतर राजांस नीति शिकवण्यास इतिहासांतील उदाहरणांच्या रूपानें अवशिष्ट राहात असते.

अकबराला ही राजनीति चांगली कळत होती. अकबर आपल्या प्रजेंत हिंदु आणि मुसलमान असा भेद अथवा पक्षपात करीत नव्हता. पण त्यानें आज जो डाव टाकला होता, तो मोठ्या मुत्सद्देगिरीचा होता. अकबर पक्षपाती नव्हता हीच गोष्ट त्याला पदोपदीं नडत होती. तो पक्षपाती नव्हता, म्हणूनच त्याचे जातभाई त्याच्यावर रुष्ट झाले होते. आजचा अपराधी मुसलमान होता. त्याच्या अपराधाचें पुरतें माप त्याच्या पदरांत व लोकांच्या डोळ्यासमोर शिक्षा केल्यास तो आपल्या लोकांत अप्रिय होणार होता. त्याला असल्या अनेक पेंचांतून धोरण ठेवून पार पडावें लागत असे.

हा अपराधी मुसलमान होता इतकेंच नव्हे, तर तो एक सरदार होता. चांगला लढवय्या होता. त्याचे अनुयायी कांहीं जण होते. त्यानें दौलतीची थोडीबहुत कामगिरीही बजाविली होती. अकबराची त्याच्या अपराधाबद्दल पुरी खात्री झाली होती. त्याच्या हेरानें त्याला इत्थंभूत हकीगत कळविली होती. पण स्वतःच्या खात्रीवरून राजे लोकांनीं एकादी गोष्ट केली आणि ती अगदीं सत्यनीतीस धरून असली तरी प्रजेच्या मनाचें समाधान करण्याचा खटाटोप त्याला करावाच लागतो. राजा म्हणजे राजा खरा, पण तो प्रजेचा बंदिवान् !

रामराज्य हें शब्दद्वय त्रिभुवनविख्यात आहे. श्री. रामचंद्रजींची राजनीति सर्वविश्रुत आहे. त्यांचा पराक्रम, त्यांची सत्यप्रीति, त्यांची गुरुभक्ति, त्यांचें एकपत्नीव्रत, त्यांचें एकवचनीव्रत, त्यांचें एकबाणी अमोघ शरसंधान ठाऊक नाहीं, असा एकही प्रजा-

जन नव्हता. जगाची खात्री पटविण्यासाठीं योग्य धोरण पारखून पुढचा अपवाद अगो-दरच टाळावा म्हणून त्यांनीं आधींच अग्निदिव्यांतून सीतामाईला तावूनसुलाखून शत्रु-गृहांतून स्वगृहीं अयोध्येस आणली. आणि तरी देखील शेवटीं परिणाम काय ? तर लोकनिंदा ! इतकें करून देखील जनापवादानें त्यांचा पिच्छा सोडला नाहीं ! इतकें दूरदर्शित्व दाखविलें असतांही प्रत्यक्ष राजाची निंदा एखादा यःकश्चित् रजक आपल्या घरांत बसून खुशाल करतो ! तो प्रजाजन कोणी परका नव्हता. आपल्या पोटच्या पोरा-प्रमाणें पाळलेला त्यांचाच तो प्रजाजन होता. आणि तो प्रजाजन श्रीरामचंद्रजींच्या साध्वी पतिव्रतेसारख्या प्रत्यक्ष मातुश्रीतुल्य सीतामाईवर आक्षेप घेतो; आणि आपल्या हेराच्या मुखांतून ती निंदा ऐकतांच—

**स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि**
**आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा ।**

असे कर्तव्यनिष्ठुरतेचे उद्गार काढून केवळ लोकाराधनेकरितां श्रीरामचंद्रजी सीता देवींचा अरण्यांत त्याग करण्यास प्रवृत्त होतात ! हा राजांचा आदर्श नव्हे काय ? भारतदेशांत राजे अशा नमुन्याचे झाले आहेत. भारतदेशांतील राजांना प्रजेकडून राजसंन्यास करून घेण्याची पाळी आली नव्हती. ते आपल्या प्रजेकडून कधींहि पदभ्रष्ट केले गेलेले नाहींत. पण तसा प्रसंग येतोच कशाला ? अगदीं साफ खोट्या निंदेचा आपल्या विष-यींचा उद्गार ऐकल्याबरोबर जे राजे स्वतःच्या धर्मपत्नीला निर्जन अरण्यांत सोडून देण्यास तयार. लोकमताची ज्यांना इतकी मातब्बरी वाटावी, लोकांच्या शब्दाला ज्या देशां-तल्या राजांनीं इतकी किंमत द्यावी, त्या देशांत जबाबदारीची राज्यशासनपद्धति, लोकमतानुवर्ति राज्यशासनपद्धति नव्हती म्हणून व्यर्थ आरोप करण्यांत काय फायदा ? प्रजेची तरफदारी करण्यास जेथें राजाच तयार असतो तेथें राजा आणि प्रजा यांची मुळीं भिन्नताच उत्पन्न होत नाहीं. भारतदेशांत राजशासनपद्धतीच्या विकासाचा कळस झाला आहे; आणि राजा आणि प्रजा या दोघांमधील अभेदाचें हें सौभाग्य भारत देशाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देशाच्या नशिबीं आलेलें नाहीं आणि यापुढें येण्याची तर बिलकुल आशाच नको.

अशा प्रकारें राजपद हें सुळावरची पोळी आहे. लोकाराधनाकरितां राजाला तळ-हातावर शिर घेऊन जपावें लागतें. अकबराला आपली राजपदाची जबाबदारी उत्त-प्रकारें कळत होती. आपल्याला स्वतःला गोष्ट कितीही पटली तरी लोकांचें समाधान व्हावयाचें नाहीं हें त्याला ठाऊक होतें. लोकांच्या निदर्शनास जलालुद्दिनाचा अपराध कसा आणावयाचा, हा विचार करण्यांत त्यानें इतके दिवस घालविले. त्यानें राणी जोधबाईशींच फक्त याबद्दल मसलत केली. मामानागाकडे त्यानें अप्रत्यक्षपणें वाटाघाट केली. मामानागा बदसल्लागार स्त्री नव्हती. शीलसंपन्न आणि विद्याप्रेम असणारी अशी ती बाणेदार स्त्री होती. आपल्या या मसलतींत पुरुषसल्लागारांत फक्त एका फाझलचा सल्ला त्यानें घेतला होता. फाझल तरुण होता पण तो अत्यंत सत्यनिष्ठ आणि नीति-

मान् होता. अर्धवट मनाच्या लोकांची खात्री पटविण्यासाठीं गुन्हेगाराचा गुन्हा शाबीत होणें जरूर आहे असेंच त्याचेंही मत पडलें.

याचसाठीं अकबरानें ही हिकमत लढविली होती. जलालुद्दीन ख्याली खुशालींत दंग झाला होता. बिचारी पतिपरायणा सती आपल्या दुर्दैवाचे खेळ पहात रडत बसली होती. पंडितजी अकबराच्या ह्या हिकमतीनें चकून गेले होते आणि आपण कोणत्या दिशेनें कसें पाऊल टाकावें अशा फिकिरींत होते. जोरावरसिंग व त्याचे साथीदार आपला बलि आपणास केव्हां मिळतो याची वाट पहात होते. तो तरुण मुसलमान जलालुद्दिनाबरोबर दिवस काढीत असतां आपल्या भक्ष्यावर झडप घालण्याची संधि पाहात होता आणि अकबरबादशहा गुन्हेगारास मुद्देमालासह पकडण्याच्या तयारींत होता.

---

# प्रकरण चौदावें.

## झोटिंगांचीं खलबतें !

" कोण तें ? "

" घुर्र्र्र्र्—"

" अरे जा—घुरकावतोस कशाला ? "

" घुर्‌ र्‌ र्‌ र्‌ र्‌—"

" नीटपणें बोलायचें आहे कीं लावूं सपाटा ? "

" घुर्‌ र्‌ र्‌ र्‌—घुर्‌ र्‌ र्‌ र्‌—घुर्‌ र्‌ र्‌ र्‌ र्‌—"

" घुर्र्र्र्र् ? " वेडावून त्या पहिल्यानें विचारलें, " आतां तुला देतोंच मोक्ष ! " असें म्हणून त्यानें कंबरेच्या तरवारीस हात घातला.

" घुर्‌ र्‌ र्‌ र्‌. "

" तरी तेंच ? नांव नाहींस बोलत ? "

" घुर्र्र र्‌ र्‌—भूत ! झोटिंग ! घुर्‌ र्‌ र्‌ र्‌ र्‌ ! "

" अस्सं ! तुला बोलायला येतं तर ? "

" घुर्‌ र्‌ र्‌ र्‌. "

" या पडक्या घराकडे कशाला चालला होतास ? आणि त्या दाराकडून आतां मागें कां परतलास ? "

" घुर्‌ र्‌ र्‌ र्‌ ! "

" आतां घुर्‌ र्‌ र्‌ र्‌ चें ढोंग नको. तुला वाचा फुटली ना आतां ? "

" पण तूं कोण ? "

" असा नटि बोल, घुर्‌र्‌र्‌ सोडून दे. प्रथम माझ्या प्रश्नाचें उत्तर दे आणि मग मला प्रश्न कर. मीही उत्तर देईन. "

" तूं कोण ? "

" ठीक ! मीही एक झोटिंगच आहें. "

" कशाला आलास ? "

" म्हणजे ! माझ्या प्रश्नाचें उत्तर तिथंच राहिलं वाटतं ? आणि उलटा प्रश्न मलाच करायला लागलास ? "

" मी झोटिंग, माझ्या भक्ष्याचा वास घ्यायला आलों आहें. "

" कुठें आहे तुझा भक्ष्य ? "

" या जागेंत माझ्यासमोर येईल तो माझा भक्ष्य ! "

" या जागेंत तुझ्यासमोर मी आहें ! "

" तूं इथें कशाला आलास ? "

" माझ्या भक्ष्याकरितां. पण तूंच तो आहेस कीं काय याचा मला वास घेऊन पहायचें आहे. "

" त्या गोष्टी सोडून दे. कंबरेचें तें तरवारीचें खेळणें फेंकून दे त्या मसणांत ! त्याचा उपयोग माणसांवर होतो. तूंही माणूसच असला पाहिजेस. कारण मुलांच्या कंबरेला तरवारी नसतात. आणि तूं माणूस झोटिंग या भूत झोटिंगाच्या वाटेला जाऊं नकोस. आतांच तुझी मान मुरगळली असती आणि मुरगाळीनही. पण उगीच तुझीं बायकापोरें रडतील. पण एक वचन दे. या भुताटकीच्या जागेंत एक झोटिंग भेटला असें लोकाला सांग, पण त्याला माणसासारखें बोलतां येतें असें सांगूं नकोस. इतकें कबूल करशील तर तुला जिवंत सोडतों ! "

" समजलें. तुला झोटिंगाला आतां मी चांगलाच ओळखला ! तुझ्या रक्ताचा अमंगळ स्पर्श माझ्या तरवारीला मी करूं देणार नाहीं. माझ्या तरवारीचा भक्ष्य तूं नव्हेस. तूं झोटिंग, पण तुझ्यावर एक खवीस आहे ना ? "

" होय ! खवीस आहे एक ! "

" त्या खवीसावर आणखी एक वेताळ आहे ना ? "

" आहे वेताळ आहे, आणि त्या वेताळाच्या पाठीस आतांशा एक आग्या वेताळ लागला आहे ! "

" शेवटचें बोलणें चूक आहे. तो आग्यावेताळ नव्हे, तो खरा मांत्रिक आहे ! "

" मांत्रिक आहे ? आग्यावेताळ नव्हे तर ? असें तूं कशावरून म्हणतोस ? "

" तुला आतां माझ्याशीं अधिक बोलावेंसें वाटूं लागतें आहे ! पण इथला भक्ष्य खरा कोणाचा ? "

" वेताळाचा. बड्या सैतानाचा. "

" बड्या सैतानाच्या भक्ष्यावर छोट्या सैतानाची नजर ! आणि छोट्या सैतानाला फसवायला तूं झोटिंग बघतो आहेस ? असें तर नसेल ? "

" पण तूं वहोत बडा सैतान कोण रे ? "

" बरोबर ओळखलेंस. कारण तुझा बडा सैतान तोच माझा भक्ष्य आहे. तेव्हां मी खरोखरीच बहोत बडा सैतान आहें. "

" बड्या सैतानाला तूं खाणार ! तर तुला आतांच लोळवतों. पण तूं— माझा खरा भक्ष्य मला देशील काय ? हा इथला माझा खरा भक्ष्य नव्हे. माझा खरा भक्ष्य तुझ्याचबरोबर राहतो ! "

" याचा अर्थ ? "

" आतां मीही तुला ओळखला. माझा भक्ष्य तुझ्याच बाजूस आहे. पण तिकडे फेरी मारायला मला अद्याप सवड झाली नाहीं. "

" हें पहा भूत, झोटिंगसाहेब ! आतां आपण दोघे दोस्ती करूं या. आपण जरी झोटिंग भक्ष्य शोधायला लागलों तरी, आतांशा दिल्लींत कांहीं झोटिंगपादशाही नाहीं. अकबरशाही आहे. तो असल्या सगळ्या झोटिंगांना पुरून उरणारा मांत्रिक आहे. तेव्हां या अकबरशाहींत अन्यायाशिवाय भक्ष्यावर झडप घालतां येणार नाहीं. माझ्या भक्ष्यानें माझा अन्याय केला आहे. म्हणून मला त्याला मुरगाळावयाचा आहे. मी त्याला सावध करून मुरगाळणार. त्याला आत्मरक्षण करावयास सवड देऊन मुरगाळणार. तुझ्या भक्ष्यानें तुझा अपराध केला आहे काय ? "

" मला असल्या गोष्टीच लक्ष्यांत घ्यावयाच्या नाहींत. माझ्या भक्ष्यानें माझा अपराध केला नसला, तरी त्याच्या बापानें केला असेल. पण मी त्याच्या बापाच्या-ऐवजीं त्याचाच भक्ष्य उचलणार. तूं मला या कामीं मदत करशील काय ? "

" आधीं तूं मला सांग. माझा भक्ष्य उचलावयास तूं मला संधि देशील ? "

" अलबत् देईन. तो कामसाधु, क्रूर, आणि पाजी आहे. त्याचा नोकर मी असलों तरी मला आतां दुसरीकडे बादशाही मिळणार आहे. तेव्हां मी त्याचा बांधलेला नाहीं. त्याला तूं उचललास तरी माझी हरकत नाहीं. पण—"

" समजलों, आपण बोलत इथें राहतां कामा नये. जरा बाजूला गेलें पाहिजे. कारण मांत्रिकाचे हेर देखील या बाजूला येण्याचा संभव आहे. "

असें म्हणून ते दोन्ही झोटिंग एकमेकांच्या हातांत हात घालून बरेचसे बाजूस गेले. आपणालाही देवदूत बनून त्यांचें खलबत ऐकायला हरकत नाहीं.

पण ज्या बाजूस ते सरकले, तिकडच्याबाजूनें एकादें झुडूप मूळासकट वर उचलून चालूं लागावें तशा प्रकारची छायाच चालूं लागत असल्याचा त्यांस भास झाला. दोघांच्याही मनांत एकदमच येऊन गेलें कीं, आपल्याचसारखा हा आणखी एक कोणी तिसराच झोटिंग आहे, कीं खरोखरीचा व त्याच क्षेत्रांत वावरणारा लोकसमजा-प्रमाणें तेथला रहिवासी झोटिंग आहे ! ते दोघेही चपापले ! बराच वेळपर्यंत त्यांनीं

कांहीं हालचाल केली नाहीं. तोंडांतून उच्चारही काढला नाहीं. कानोसा घेत राहणें त्यांना बरें वाटलें. शेवटीं पुन्हां कांहीं संशय येण्यासारखें आढळून न आल्यामुळें त्या दोघांनीं बोलावयास सुरुवात केली.

" त्या दिवशीं मठांत आलास तो तरुण मुसलमान तूंच काय ? "

" होय. त्यावेळीं तूं तिथें नव्हतास, पण तुला देखील मीं मठांतच पाहिलें आहे. विश्वंभरशास्त्रयाच्या मठांत तूं असतोस ना नेहमींचा ? "

" होय. तूं जलालुद्दीनचा नोकर ना ? "

" होय. मी इकडे त्या बाईला खाणें घेऊन आलों होतों, पण घाईंत किल्ल्या घ्यायला विसरलों. त्या फिरून आणण्यासाठीं जाणार आहें वाड्याकडे, इतक्यांत तुम्ही दिसलात. "

" तर मग, रोज येणारा जमादार कुठें ? "

" सरदारसाहेबांच्याच बरोबर आहे तो आज. "

" आज सरदारसाहेब इकडे येणार कीं नाहींत ? "

" आज येण्याचें ठरलें होतें; पण आतां पुनः बेत फिरवला. "

" कां तो ? "

" कां म्हणजे, त्याला पुष्कळ कारणें आहेत. तीं तुला सांगतां येण्यासारखीं नाहींत सगळीं. पण आज आनंदाच्या भरांत सरदारसाहेबांचा नशा फारच चढलेला आहे. त्यांच्यानें आडव्याचें उभें देखील राहवत नाहीं. या बाईलाच तिकडे न्यावयाची होती. पण मग नको म्हणून त्यांनींच सांगितलें. "

" असें कां सांगितलें त्यांनीं ? "

" वाड्यांत त्या बाईला नेणें धोक्याचें आहे. कोणीही सरदार मानकरी वेळीं अवेळीं भेटायला येतात. नाहींतर बादशहाकडेच निरोप येतात. उगीच बभ्रा होईल. शिवाय त्या बाईला बोंब मारायची भारी संवय आहे. उगीच बघल्याबरोबरच बोंब मारूं लागते. मी देखील त्या जमादाराप्रमाणेंच त्या बाईला एकदोनदां माझा हा रुबाब दाखवून पाहिला. पण अगदींच खराब ! बोंब मारते, नाहींतर शस्त्र घेऊन अंगावर धांवते ! "

" पण शस्त्र तिच्याकडे कुठलं ? "

" तेंच तर समजत नाहीं. ती म्हणते आपला देव आपल्याला शस्त्र देतो. आतां-पर्यंत असा चमत्कार दोन तीनदां झाला. एकदां शस्त्र काढून घेतलं कीं आठ दहा दिवस तिच्यापाशीं नसतं, पण पुन्हां आणखी एखादी कट्यार नाहींतर बिचवा, नाहींतर जंबिया तिच्याकडे कुठून तरी येतो ! "

" मोठें आश्चर्य आहे बुवा ! "

" तिला साथीदार तर कुणी नसेल ना ? "

" मला वाटतं हें जमादाराचं काम असावं. सरदारसाहेबांना देखील तसाच

संशय आला आहे. पण हल्लीं मात्र निराळाच शोध लागला. त्या बाईचा कोणी एक भाऊ आहे म्हणे. तो तिला एकांतांत केव्हां तरी भेटतो असें समजलें आहे. पण तो येतो कुठून आणि जातो कुठून हें समजत नाहीं. अरे पण--"

" कां असा दचकलास कां ? "

" तूंच नाहींस ना तो ? "

" हट ! कांहीं तरीच. मला त्या बाईचें तोंड एकवार बघायला मिळालें तर पाह्यचें होतें. मी इकडचाच–लाहोरकडचा. पंडितजींच्या मठांत राहिलों आहें शिकण्याकरितां. पण तुझ्या धन्यानें माझा मोठा तोटा केला आहे. म्हणून तुझ्याशीं मी दोस्ती केली आहे. "

" कांहीं हरकत नाहीं. मी आतां लवकरच जाणार दिल्ली सोडून. पण तो पोर तुझ्या ओळखीचा आहे ? "

" कोण तो ? "

" तो फैझी. "

" वः ! तो चांगलाच ओळखीचा आहे. "

" तो बाहेर येत नाहीं कधीं या बाजूला. "

" कां, त्यानें आपला कांहीं अपराध केला आहे काय ? "

" होय. त्याचाच सूड घ्यायचा आहे मला. त्याला नाहींसा केल्याशिवाय माझ्या मनाला समाधान होणार नाहीं. "

" पण तो तर गरीब, सालस, निरुपद्रवी प्राणी दिसतो. "

" तो–तसा दिसतो, पण तसा नाहीं. आणि खरोखर तसा असला तरी मला त्याला जगांत ठेवतां येणार नाहीं. "

" पण यांत तुम्हांला मी मदत कोणती करावयाची ? "

" त्याला इकडे पाठवून द्यायचा. "

" जरा बिकटच काम आहे हें. "

" बरं मीच मठांत आलों तर ? "

" तें उत्तम. "

" तसा मनसुबा मी केला आहे. पण केव्हां आणि कसा साधतो तें मात्र समजत नाहीं. "

" त्या दिवशीं आपण आलां होतां म्हणून समजलें मठांत. "

" होय. पण बोलाविल्याशिवाय येऊं नको असें मला पंडितजीनें सांगितलें आहे. "

" तर मग पंडितजींचें सांगण्याप्रमाणेंच तुम्हीं वागलें पाहिजे. पंडितजी मोठा भला माणूस आहे. "

" म्हणूनच तर मी वाट बघत राहिलों आहें इतके दिवस ! "

पण या बाईला आतां जलालुद्दीन काय करणार आहे ? "

" तो बादशहाला ही गोष्ट समजली आहे कीं, काय याचा विचार करीत आहे. यांतली बातमी बादशहाला समजलेली नाहीं, अशी आमच्या सर्व मंडळीची खात्री आहे. कारण ती बाई गेली तेव्हां वेडी होती. आणि वेडाच्या भरांत ती वाटेल तें बोलली तरी तिचें बोलणें बादशहाला खरें मानतां येणार नाहीं. शिवाय आमच्या जलालुद्दीन साहेबांसारख्या सरदारावर आरोप ठेवतांना सर्व लोकांची खात्री पटण्यासारखा पुरावा पुढें आणावा लागेल ना ? "

" पण बादशहाच्या लोकांनीं या ठिकाणीं येऊन या बाईला पकडली तर ? "

" पकडीनात, इथें इला कोणीं ठेवली कोणास ठाऊक ! "

" आणि तुमचे लोक इथें असतांना पकडलें तर ? "

" अशक्य गोष्ट ! या जागेची माहिती तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाच माहीत नाहीं. तुला तरी ती आजच माझ्याकडून समजली. "

" पण आतां इथें हिला ठेवणें सोईस्कर नाहीं. "

" तें आमच्या धनीसाहेबांच्याहि ध्यानांत आलें आहे. म्हणून ते आपल्या दुसऱ्या एका वाड्याच्या तळघरांत हिला ठेवण्याची तरतूद करणार आहेत. लौकरच तशी व्यवस्था ते करणार आहेत. "

" याच भुयारांतून जलालुद्दिनाच्या दोन्ही वाड्यांत जातां येतें काय ? "

" हो, मी तुला त्या दोन्ही वाटा आतांच दाखवितों चल. "

असें म्हणून ते दोघे एकमेकांच्या सोबतीनें त्या भुयारांत शिरले आणि अदृश्य झाले. त्या भुयारांतील सर्व मार्ग पाहून ते दोघेहि पुन्हां कांहीं वेळानें बाहेर आले. जोरावरसिंग आतां स्वस्थ चित्तानें सतीला न भेटतांच जाणार होता. पण तो तरुण मुसलमान आतां त्याचा दोस्त झाल्यामुळें त्याच्याबरोबर तिच्याकडे गेला. त्यानें सांकेतिक खुणांनीं तिला न घाबरतां धीर धरावयास सांगितलें. नंतर बाहेर आल्यावर दोघेहि आपापल्या वाटेनें चालते झाले. पण चालते व्हावयाच्या पूर्वीं आणखी तिसरा झोटिंग तेथें निर्माण झाला.

तो तरुण मुसलमान झाडाच्या मुळांतून भुयाराच्या वाटेनें निघून गेला. फैजीला काढायला मिळणार म्हणून त्याला आनंद झाला होता. तो त्या आनंदाच्या भरांत स्वतःशींच हांसत चालता चाला. तो गेल्यावर जोरावरसिंगाला त्यांच्याचसारखा तिसरा झोटिंग अकस्मात् भेटला. त्याला पाहून जोरावरसिंग दचकला.

" कोण ? "

" घुर्र्र्र्—"

" हें आहे तरी काय गौडबंगाल ? "

" झोटिंग ? "

" तूं देखील झोटिंगच आहेस ? "

" घुर्र्र्र्—हूं ! "

" इथें येण्याचें कारण ? "

" हेंच माझें घर ! "

" तूं होतास कुठें आतांपर्यंत ? "

" या पडक्या घरामागच्या मोडक्या पिंपळावर ! "

" मग तुंज्या आहेस काय ? "

" होय. माझ्या ह्या घरांत तुम्ही नाचणारे कोण ? "

" मी तर एकटाच आहें ! "

" खरें बोलतोस हें ? "

" तूं कोणांपासून इथें आहेस ? "

" माझ्या ह्या स्थळांत मी नेहमींच असतों. "

" सब झूट ! तूं आत्तांच कोठून तरी आलास. "

" तुम्ही दोघांनीं इथें पाऊल टाकल्याबरोबर तुम्हांला इथें माझा त्रास नाहीं झाला ? "

" एक झाड उपटून पळाल्यासारखें कांहींसें वाटलें खरें ! "

" दुसरा झोटिंग भुयारांत गेला ना ? "

" म्हणजे ? "

" तो–तुझा आतां मित्र झाला ना ? "

" तुला पिंपळावरच्या झोटिंगाला या जमिनीखालच्या भुयारांतल्या गोष्टीशीं काय करावयाचें ? "

" असा संतापू नकोस. "

" तर तूं कोण तें आधीं सांग. "

" नाहीं तर–"

" नाहीं तर दोन खांडकीं करून टाकीन. "

" तुझी मानच मुरगाळली तर ? "

" टाक तर पुढें पाऊल ! "

" जोरावरसिंग ! "

ह्या ओळखीचा शब्द ऐकतांच जोरावरसिंग आश्चर्यमूढ होऊन गेला. माणसाला आपला आवाज पालटून इतकें संभाषण करीत राहणें शक्य असेल अशी त्याची कल्पनाच नव्हती.

" कोण वीरसिंह ! " जोरावरसिंग म्हणाला. धन्य आहे तुझी. आमचें सगळें बोलणें तूं ऐकलेंस ना ? "

" चूप. मोठ्यानें बोलूं नकोस. मला तुझ्याशीं जास्त वेळ बोलत उभें राहतां येणार नाहीं इथें. "

" कां ? आणि या कबरस्थानांत असले आणखी कितीसे बाबा झोटिंग आहेत ? "

" बरेच आहेत ! पण या वेळीं इथें आणखी एक झोटिंग आहे. तो दूर माझी वाट पहात आहे. तो इकडे यायला भितो. मला त्यानें इकडे पाठवून दिलें. पण

आतांशा त्याचा आणि बादशहाचा माझ्यावर विश्वास बसला आहे हें भाग्य समज. मधूनमधून त्यांना माझा संशय येतच असतो. पण मी ही तुमची एक बाब वर्ज करून त्यांच्या कामांत मुळींच कसूर करीत नसतों. तरी देखील माझ्यावर नजर ठेवायला तो आलाच आहे."

"कोण आला आहे?"

"अबदुल्लाखान."

"रतनसिंह कोठें आहे?"

"तो दुसऱ्या बाजूला गेला आहे. त्याला मी ठेवून घेतल्यापासून माझा त्यांना फार संशय यायला लागला आहे. रतनसिंह तुला केव्हां केव्हां भेटतो याचा त्यांना संशय आला असावा. आतां मी बोलत नाहीं. पुन्हा रतनसिंहाला किंवा मला या इकडच्याच बाजूस भेटलास तर कांहीं तुला नवी हकीगत सांगेन."

"फार महत्त्वाची आहे काय?"

"होय. जरा काळजी करण्यासारखीच आहे. पण आजच्यासारखा गैरसावध वागूं नकोस."

"कां आणखी कोणी येतें कीं काय इकडे?"

"जलालुद्दीनचीं माणसें, तुमचीं माणसें व आम्हां दोघांपैकीं कोणी तरी एक. याशिवाय कोणाची छातीच नाहीं इकडे फिरकण्याची. कुरुक्षेत्राच्या आसपास फिरणाऱ्या भुतांचा पायरस इकडे असतो, अशी सर्व मुसलमानांची समजूत आहे."

"तें एकपरी बरेंच आहे."

"मी आतां जातों."

"दे त्याला एखादी बात ठोकून; मीही जातोंच आतां. पहाटेची वेळ होत आली. सगळी रात्र या झोटिंगाबरोबर खलबतें करण्यांत गेली."

शेवटचें वाक्य आपल्याशींच बोलत तो चालता झाला.

---

# प्रकरण पंधरावें.

## काशीक्षेत्रांतील दोन घोषणा!

"तें कांहीं नाहीं. असल्या पातकाला देहान्त प्रायश्चित्तच देणें रास्त आहे."

"पण तें द्यायचें कोणी हाच कायतो प्रश्न आहे."

"आमचे पवित्र धर्मग्रंथ परकीयांच्या स्वाधीन करणारे ब्राह्मणकुलांगार जगांतून नाहींसे करून टाकण्याचा हक्क तुम्हां आम्हां सर्वांना आहे."

"आणि असले संस्कृत ग्रंथ प्राकृतांतून वाचणाऱ्यांना?"

"त्यांना देखील योग्य शासन केलेंच पाहिजे."

" मग त्याचा आतांच निकाल लागला पाहिजे. त्या दक्षिणी ब्राह्मणाला धरून आम्हीं पकडून ठेवला आहे. स्वामींच्यासमोर आणावा काय ? "

" बेलाशक आणा. "

स्वामीजींचा हुकूम सुटतांच पांचदहा शिष्य गेले आणि त्यांनीं एका गरीब, धर्मनिष्ठ, कर्मनिष्ठ अशा ब्राह्मणास धरून आणून आपल्या स्वामींसमोर उभें केलें. तो ब्राह्मण अगदीं भेदरून गेला होता.

काशीक्षेत्रांत हे स्वामी फार प्रख्यात असून यांच्या मठांत यांच्या दीक्षेखालीं अनेक ब्रह्मचारी व ब्रह्मकर्मजिज्ञासु शिष्य होते. या स्वामींचा शब्द म्हणजे वेदवाक्य अशी त्यावेळची परिस्थिति होती. वरील प्रश्नोत्तरांचा व संभाषणाचा सर्व व्यवहार संस्कृतांतूनच चाललेला होता. त्यावेळीं संस्कृताचा चांगलाच प्रचार होता व मराठींत बोलणें अगर लिहिणें हा शास्त्रीपंडितांच्या दृष्टीनें अक्षम्य गुन्हा समजला जाई. स्वामीजींच्यासमोर आज एकदोन चमत्कारिक खटले आले होते. पहिल्यानें वर सांगितलेल्या दक्षिणी ब्राह्मणाच्या कामाची सुनावणी होऊं लागली.

" कायरे ए ? काय तुझें नांव ? "

" मोरभट दीक्षित. "

" तूं इकडे कधीं आलास ? "

" आठ दहा दिवसांपूर्वी. "

" कशासाठीं ? "

" तीर्थयात्रेसांठीं व काशीक्षेत्र पाहण्याकरितां. "

" तुझा गांव कोण ? "

" पठण. "

" तूं महान् अपराधी आहेस. "

" काय अपराध मी केला ? "

स्वामींनीं शिष्याकडे नजर फेंकली. त्याबरोबर एक शिष्य पुढें आला.

" स्वामिन् ! हा दक्षिणी ब्राह्मण मणिकर्णिकेजवळ आसन घालून मोठ्या तपस्व्याप्रमाणें ऐटींत बसला होता; आणि प्राकृतांत कांहींसें वाचीत होता. आमच्या नजरेस हा प्रकार येतांच आम्ही जवळ गेलों आणि त्याला काय वाचतोस म्हणून विचारलें. त्याच्या सांगण्यावरून तो भागवत ग्रंथ वाचीत होता असें आम्हांला समजलें ! नाहीं कां ? " शेवटचे दोन शब्द आपल्या सोबत्यांस उद्देशून म्हणाला. सर्वांनीं अगदीं एका सुरांत—

" एवमेव स्वामिन् ! " असें उत्तर दिलें.

" ततस्ततः ? " स्वामीजींनीं प्रश्न केला.

" आम्ही त्याला हा प्राकृत ग्रंथ कोणीं केला म्हणून विचारलें. त्यानें नांव सांगितलें. ती त्याची पोथी आम्हीं घेऊन ठेवली आहे. 'आपणांस ही हकीगत कळविल्यावर आपण त्यास पकडून आणण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणें पकडून याला आपल्या-

समोर उभा केला आहे. संस्कृताशिवाय इतर भाषेंत बोलणाऱ्या ब्राह्मणाला शिक्षा करावी अशी गुरुजींची अनुज्ञा असल्यामुळें आम्हीं याला पकडून आणला. ''

" काय ब्राह्मणा ! ही सर्व हकीगत खरी आहे ना ? "

" होय स्वामिन् ! "

" ब्राह्मणानें संस्कृत वाणीशिवाय इतर शब्द उच्चारावयाचे नाहींत, हें प्रतिष्ठान क्षेत्रवासी ब्राह्मणांना माहीत नाहीं काय ? "

" आहे माहीत. "

" मग भागवत ग्रंथाचें मराठींत भाषांतर कोणीं केलें ? "

" एकनाथ महाराजांनीं ! "

" एकनाथ आणि महाराज ? "

" होय स्वामिन् ! "

" कोण आहे हा बाटगा एकनाथ महाराज ? "

" ते एक महान् भगवद्भक्त वैष्णव आहेत. "

" संस्कृताचें मराठींत भाषांतर करण्याचा हा अधर्म प्रतिष्ठानच्या वैदिक ब्राह्मणांनीं कसा सहन केला ? "

" त्यांनीं बहिष्कार टाकलाच होता एकनाथ महाराजांवर. "

" खबरदार ! " स्वामीजी गर्जून म्हणाले; " आमच्यासमोर त्याला महाराज असें बिलकुल उच्चारावयाचें नाहीं. जिव्हा छेदन करण्यांत येईल. "

" स्वामिन् ! "

" मग ? "

" एकनाथांचे सहायकर्ते श्रीकृष्णपरमात्मा आहेत. ते वेळोवेळीं आपल्या अद्‌भुत शक्तींचे चमत्कार शास्त्रीमंडळींस दाखवून एकनाथांच्या योग्यतेचा प्रत्यय आणून देत असतात. "

" सगळा भागवत ग्रंथ मराठींत आणला काय त्या एकनाथानें ? "

" नाहीं अजून. हे दोनच अध्याय मी इकडे येईपर्यंत लिहून झाले होते. "

" आणि पुढें त्याचें काम सुरूच होतें ना ? "

" होय स्वामिन् ! "

" शिष्य हो, तर मग आतां आपल्याला फार त्वरा करावी लागेल. त्या एकनाथानें इतक्यांत आणखी एकदोन अध्याय तरी लिहिले असतीलच. हे अध्याय आपण मठांत ठेवून घेऊं. तुम्ही या मोरभटाला घेऊन प्रतिष्ठानाला जा आणि आमचें आज्ञापत्र बजावून त्याला पकडून घेऊन या. येतांना त्याचे तयार झालेले अध्याय देखील आणावयास विसरूं नका. आम्हीं आज दोन आज्ञापत्रें देत आहोंत. एक हें एकनाथाला आणि दुसरें प्रतिष्ठानवासी ब्रह्मवृंदाला. शिष्य हो ! प्रतिष्ठानवासी ब्रह्मवृंद तुम्हांला या कामीं लागेल ती मदत देतील. एकनाथाला पकडून आणावयास तुम्हांला ते सर्व प्रकारचें साह्य करतील. कांहीं काळजी करूं नका. "

" यथाज्ञापितं भगवता " दक्षिणेंत जावयास तयार झालेले शिष्य एकदम म्हणाले.

" त्याचप्रमाणें तूं या आमच्या शिष्याला वाट दाखवावी आणि त्या धर्मभ्रष्ट एकनाथाचें घर दाखवून द्यावें. तसेंच त्याला आमची आज्ञा समजावून देऊन इकडे पाठवून द्यावें. "

" बरें आहे स्वामिन्! मी सर्व एकनाथांना समजावून सांगतों. " पण हें बोलतांना त्या मोरभट दीक्षितांचा शब्द बाहेर निघेना. त्याच्या डोळ्यांत आंसवें आलीं. कंठ सद्गदित झाला. त्याला एकदम रडूं कोसळलें.

" उद्यां सकाळींच तुम्हीं सर्व जावयास निघा. " स्वामीजी अधिकारानें दीक्षितांच्या शोकाकडे दुर्लक्ष करून म्हणाले.

" पण माझी एक विनंति आहे महाराज ! "

" काय आहे विनंति ? "

" एक दोन दिवसांपूर्वीं कोणी एक फिरस्ता ब्राह्मण आला आणि त्यानें माझ्या स्वाधीन एका मुलाला केला. त्यांनीं येथील एका महंताकडे त्याला पोंचवावयास सांगितलें होतें. "

" बरें आहे. त्या मुलाला आमच्या स्वाधीन करा. त्याला आम्हीं जरूर तर ठेवून घेऊं, नाहींतर येथील एका प्रसिद्ध महंताच्या घरीं पाठवून देऊं. तो ब्राह्मणच असेल. "

" होय स्वामिन्! त्याच्या पालकानें तो ब्राह्मणच असल्याचें मला खात्रीपूर्वक सांगितलें. "

" ठीक आहे तर. आम्हीं त्याला त्या महंताकडेच पाठवून देऊं. "

मोरभट दीक्षिताला व त्याच्या बरोबरच्या आपल्या शिष्यांना जावयास सांगून स्वामीजी दुसऱ्या विषयाकडे वळले.

" ब्रह्मवृंदहो व शिष्यहो ! संस्कृत भाषेवर आतांशा चोंहींकडून अनेक संकटें कोसळत आहेत. दक्षिणेकडे ह्या एकनाथासारखे पाखांडी लोक संस्कृताला मराठींत ओढीत आहेत, तर इकडे उत्तरेंत हे यवन राज्यकर्ते संस्कृताला फारशींत ओढीत आहेत. अशा प्रकारच्या दुहेरी ओढणींत संस्कृत भाषेचे अत्यंत हाल होत आहेत. याशिवाय ताम्रमुखी पाश्चात्य लोक आमच्या संस्कृताला आपल्या तिसऱ्याच एका भाषेंत ओढीत आहेत. याचा प्रतिकार आपण केला पाहिजे, नाहींतर आपण कर्तव्यभ्रष्ट ठरूं. संस्कृत ही वेदवाणी आहे. ती देववाणी आहे. तिची अशी पायमल्ली आपण करूं देतां कामा नये. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं आपल्याच आर्य संस्कृतीचे स्वतःला ब्राह्मण म्हणविणारे श्वपच लोक आपले ग्रंथ अविंधांस विकून आपल्या पोटाची खळगी भरण्याइतके निर्लज्ज झालेले आहेत. हें ऐकून मात्र अंतःकरणाला परम विषाद वाटतो. अशा अधमांना शासन करणें हें प्रत्येक सनातनधर्मीय ब्राह्मणाचें उच्चतम कर्तव्य आहे. खरं कीं नाहीं ?"

" अगदीं बरोबर ! " सभास्थानांतून ध्वनि झाला.

" खुद्द दिल्ली शहरांत विश्वंभरपंडित नांवाचा कोणी एक असलाच ढोंगी ब्राह्मण निर्माण झाला असून, त्याचा हस्तक शिवशर्मा नांवाचा मथुरेकडचा एक ब्राह्मण आहे. यांची मंडळी बरीच वाढली आहे व हे लोक आपल्या ग्रंथांच्या नकला करून त्या परधर्मीयांस विकीत असतात. बादशहानें बक्षिसांचीं व मानमरातबांचीं आमिषें दाखवून ग्रंथ मिळत नाहींत असें पाहून आमच्यांतल्या लोभी ब्राह्मणांस वश करून घेतलें आहे. आजची सभा यासाठींच आहे. या संस्कृत भाषेवरच्या संकटावर कोणता उपाय योजावा, हें ठरविण्याचा काळ आतां येऊन ठेपला आहे. यापुढें अवहेलना करून चालणार नाहीं. "

सभास्थानांत जिकडे तिकडे सामसूम होतें. प्रत्येक सभासदाला स्वामीजींचे हे कळवळ्याचे बोल पटत होते; परंतु उपाय मात्र कोणासच कांहीं सुचत नव्हता. सारेजण एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले.

" शिवशर्मा एखादे वेळीं वेषांतरानें काशीस येऊन जातो असें मीं ऐकलें आहे. " एकजण म्हणाला.

" असेल. अशी बातमी आम्हांला देखील कळली आहे. " स्वामीजी म्हणाले.

" त्यावेळीं त्याला पकडून आणावा. "

" आपली सूचना योग्य आहे. मात्र ती अमलांत आली पाहिजे. " दुसरा एक सभासद म्हणाला.

सभेंत जिकडे तिकडे हंशा पिकला !

" विश्वंभरशास्त्र्याला नाहींसा करून टाकण्याचाच एखादा उपाय करणें गैर-वाजवी होणार नाहीं. "

" नाहींच होणार. " काहीं सभासद म्हणाले.

" कारण हा मोठाच अपराध आहे. "

" पण उपाय ? "

" त्याच्यावर मारेकरी पाठवावे. "

" बेत छान ! पण कामागिरी कोण पत्करतो ? "

" डोंगरांतले रानटी लोक ! "

" हा उपाय एक निर्वाणीचा आहे खरा. "

" मग तो अमलांत ताबडतोब आणायला कोणती हरकत ? "

" हा उपाय अमलांत आणण्यास हरकत नाहीं. " बरेचसे सभासद म्हणाले. सर्वजण स्वामीजींकडे उत्सुकतेनें पाहूं लागले.

" कामगिरी बरीच अवघड आहे. दिसतांना वाईट दिसते. पण ती तितकी वाईट नाहीं. आपल्या भाषेचें पावित्र्य कायम ठेवण्याकरितां हा उपाय करावयाचा आहे. त्या अर्थी त्यामुळें आपण पापी ठरणार नाहीं. असल्या अपराध्याला असलाच यमदंड भोगायला लावला पाहिजे. पण पल्ला पडला फार दूरचा. म्हणून हें काम

आंगावर घेऊन पार पाडावयास रानटी लोक तयार होतात कीं काय हें पाहिलें पाहिजे. ”

“ द्रव्य दिल्याशिवाय हें काम होणार नाहीं. ” एक सभासद म्हणाला.

“ पण द्रव्य घेऊन तरी हें काम कोण पत्करील ? ”

“ आपण प्रयत्न करून पाहिला पाहिजे. हें काम करायला कोणी ना कोणी आपल्याला खात्रीनें मिळेल असें मला वाटतें. ” उपाय सुचविणारा सभासद म्हणाला.

“ त्याचप्रमाणें आजपासून कोणाहीं अनोळखी मनुष्याला आपल्या जवळचा ग्रंथ डोळ्यांनीं दुरून देखील पहायला द्यायचा नाहीं अशी आमची आज्ञा सर्व काशी-क्षेत्रांत फिरवायला लावली पाहिजे. ” स्वामीजी म्हणाले.

“ बरोबर आहे. ” सर्व सभासद म्हणाले.

“ दक्षिणेकडचे ब्राह्मण फारच दुष्ट आहेत असें म्हणावें लागतें. एकनाथाचें उदाहरण आपल्यासमोर आहे. हा विश्वंभरशास्त्री देखील मूळचा दक्षिणेकडचाच. या एकट्या विश्वंभरशास्त्र्यानें अवघ्या हिंदुधर्मावर केवढी तरी आपत्ति आणली आहे. यासाठीं कोणीही आपल्याकडची पोथी कोणत्याही कारणास्तव परकी माणसाकडे द्यावयाची नाहीं अशी शपथ सर्व सभासदांनीं आज घेतली पाहिजे. काशीविश्वेश्वराची शपथ आज काशीविश्वेश्वराच्या पायांसमोर सर्वांनीं जाऊन आमच्यादेखत घेतली पाहिजे.”

“ कबूल, आम्ही सर्व कबूल आहों शपथ करायला. ” सभासद म्हणाले.

“ चला तर आतां काशीविश्वेश्वराच्या देवालयाकडे. ” स्वामीजी असें म्हणून उठून उभे राहिले.

“ जय काशीविश्वेश्वरकी जय ! ” असा एकच प्रचंड ध्वनि त्या सभास्थानांत दुमदुमून गेला. ते सर्व सभाजन आपल्या मठाधिपतीसह काशीविश्वेश्वरच्या देवालया-कडे लगेच जावयास निघाले.

तो दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं या मठाधिपति स्वामींची आज्ञा सर्व काशी क्षेत्रांत फिरवावयाची होती. याकरितां त्यांचे कांहीं शिष्य त्या तयारीस लागले. आणि कांहीं शिष्य त्या मोरभट दीक्षिताजवळच्या मुलास घेऊन एका महान् तपस्वी महंताच्या घरीं गेले.

दुसऱ्या दिवशीं काशीक्षेत्रांत दोन प्रकारच्या आज्ञा गल्लोगल्लीं पुकारल्या जात होत्या. त्या दोन्हीहीं, ऐकणाऱ्या लोकांच्या मनांत कुतुहल उत्पन्न करीत होत्या. पण त्या दोहोंपैकीं एक घोषणा तर भारीच आश्चर्यकारक होती. त्या घोषणेमुळें साऱ्या काशी क्षेत्रांत खळबळ उडून गेली होती. त्या दोन घोषणांपैकीं एक घोषणा आपल्याला आतां समजून चुकली आहे. मठाधिपती स्वामींनीं संस्कृत ग्रंथ परकीयांच्या हातीं लागूं न देण्याबद्दलची ती घोषणा होती, पण दुसरी ती चमत्कारिक घोषणा कोणती ?

ती चमत्कारिक घोषणा ऐकून सर्वांच्या मनांत अनेक प्रकारच्या शंका, आश्चर्य भीति, संकोच वगैरे अनेक मनोविकारांचें काहूर उठून राहिलें. आज हा काय अन्याय पृथ्वीवर झाला असें वाटूं लागलें. कोणी म्हणाले कीं अकबराला हिंदुस्थान अविंधमय करावयाचें आहे. आजवर बादशहानें हिंदूंचे ग्रंथच बळकावले पण आतां हिंदूंचीं मुलेंही तो घेऊन त्यांना मुसलमान करणार ! काय हें संकट ! केवढा हा अन्याय !

पण अशी ती घोषणा तरी कोणती होती ? ती घोषणा अशी होती.

“ बाळंत व्हावयास आलेल्या गरोदर हिंदु स्त्रिया बादशहाच्या हिंदू राण्यांच्या देखरेखीखालीं बाळगावयाच्या आहेत. स्त्रियांना त्यांच्या आप्तेष्टांना भेटतां, पाहतां येईल. आईच्या अंगावरून सुटण्यासारखीं मुलें होतांच स्त्रियांना आपल्या घरीं जातां येईल; फक्त मुलांना सात आठ वर्षें तेथेंच रहावें लागेल व नंतर घरीं पाठविण्यांत येईल. यांत धर्मांतराचा अगर अन्य कोणताही वाईट हेतु बादशहाचा नाहीं. याबद्दल मुलाच्या पालकांस इच्छेनुरूप द्रव्य वगैरे मागितलेला मोबदला देण्यांत येईल. ”

अशा आशयाची ही घोषणा होती. ही घोषणा ऐकून माणसांस नवल वाटल्याशिवाय कसें राहील ? नवल वाटलें नाहीं तरच मोठें नवल ! पण नंतर कांहीं दिवसांनीं असें समजलें कीं ही घोषणा हिंदुस्थानांत बादशाही मुलखांत जिकडेतिकडे शहरोशहरीं करण्यांत आली आहे. इतकेंच नव्हे, तर हिंदु, मुसलमान, यहुदी, पारशी, ख्रिश्चन हे मुख्य धर्म व त्यांचे पोटभेद यांच्यांतही करण्यांत आली आहे. आणखी कांहीं दिवसांनीं असें समजलें कीं बादशहाला प्रत्येक भाषेच्या गरोदर स्त्रीला बाळगावयाची आहे. जितक्या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या स्त्रिया असतील त्यांना बाळंत व्हावयासाठीं बादशहा कांहीं विशिष्ट सद्धेतूनें बाळगीत आहे. पण या गोष्टीवर कोणाचाच विश्वास बसेना आणि प्रांतोप्रांतीं अकबराच्या हेतूविषयीं गैरसमज मात्र फैलावला.

दिल्लींत एक मोठें प्रचंड सूतिकागृह यासाठीं उभारण्यांत आलें होतें; या प्रसूतिगृहांत मोठमोठे वैद्य, डॉक्टर, हकीम वगैरे ठेवण्यांत यावयाचे होते आणि सर्व प्रकारच्या उत्कृष्ट साधनांनीं संपन्न असलेल्या अशा या प्रसूतिगृहांत या बायकांना आणून ठेवावयाचें होतें. हा अकबरशहाचा हुकूम प्रांतोप्रांतींच्या सुभेदारांना सुटला होता आणि ती घोषणा ऐकून प्रांतोप्रांतींचे लोक तोंडांत बोट घालून आश्चर्य व्यक्त करीत होते !

ज्या दिवशीं काशी क्षेत्रांत ही घोषणा फिरली, त्याच दिवशीं दुसरे कांहीं शिष्य त्या मुलाला घेऊन त्या सुप्रसिद्ध महंताच्या घरीं गेले. ते शिष्य त्या मुलाला घेऊन जात असतां वाटेंतच त्यांना ते महंत भेटले. शिष्यांनीं आपल्या मठाधिपतींचा निरोप त्या महंतांस कळविला. महंत ती सर्व हकीगत ऐकून घेत आपल्या आश्रमास चालले होते. त्यांचा आश्रम तेथून फारसा दूर नव्हता. कांहीं वेळानें महंत, ते शिष्य आणि ते मुलगा आश्रमास जाऊन पोंचले.

“ स्वामिन्! या ब्राह्मणपुत्राला आपल्या स्वाधीन करावयास आम्हांला आमच्या गुरुजींनीं सांगितलें आहे. ”

त्या मुलानें तत्क्षणींच महंतांस नमस्कार केला. महंतांनीं त्याला आशीर्वाद दिला आणि बसावयास सांगितलें.

“ मुला, तुझी काय इच्छा आहे ? ”

“ आपली सेवा करून विद्या शिकण्याची माझी इच्छा आहे महाराज. ” हात जोडून मोठ्या विनयानें तो मुलगा म्हणाला.

त्याची विनयशीलता, त्याचें भाषणमाधुर्य, त्याची भव्य व सुंदर मुद्रा आणि त्याची ज्ञानार्जनलालसा पासून महंत सुप्रसन्न झाले. महंतांनीं त्याला आणखी कांहीं प्रश्न केले आणि मग त्याला ठेवून घेतलें. थोड्या वेळानें त्यांची परवानगी घेऊन मठाधिपतीचे शिष्य आपल्या गुरूकडे निघून गेले.

ते गेल्यावर महंतांनीं आपल्याबरोबर कसें रहावयाचें, काय काय नित्यनैमित्तिक करावयाचें याची माहिती दिली. ते सांगतील त्याप्रमाणें वागण्यास तो ब्राह्मणबटु कबूल झाला. पण त्या बटूची मुद्रा विवर्ण झाली होती. त्याच्या सद्सद्विवेकबुद्धीवर कसलें तरी भयंकर दडपण पडलें होतें! त्या दडपणाखालीं तो विचारा दडपून गेला होता. तथापि प्राप्त घटका तो घालवीत होता.

“ काशी ! ” त्या महंतांनीं प्रेमगर्भार शब्दांत हांक मारली. ती हांक ऐकून बारा तेरा वर्षांची एक सौंदर्यसंपन्न बालिका बाहेर आली.

“ बेटा, तूं एकटीच विद्याध्ययन करीत असतेस ना ? आज हा एक कुमार आपल्याकडे विद्याध्ययनासाठीं आलेला आहे. हा फक्त अध्यायनापुरताच आपल्याकडे राहणार व भिक्षान्नावर क्षुधा भागविणार असें म्हणतो. तर आतां तुला अध्ययन करायला मोठी मौज वाटेल. हा तुला अध्ययनांत सोबती होईल. मी प्रथम याला कुमार म्हणूनच हांक मारली. आणि हा आपल्याला कुमार याच नांवानें हांक मारावयास सांगत आहे. तेव्हां आपण याला कुमार असेंच म्हणूं. याला याची बसावयाची जागा दाखव आणि यानें काय करावयाचें आणि तूं काय करावयाचें तें दोघे मिळून ठरवून टाका. ”

आपल्या वडिलांचे हे शब्द ऐकून काशीला आनंद झाला. तिनें त्या कुमाराकडे पाहिलें. कुमारानेंहि त्या कुमारीकडे पाहिलें. परस्परांना पाहून दोघांनाहि मोठा आनंद झाला. पण त्या परकी कुमाराबरोबर आपण कसें बोलावें, याची त्या बालिकेला शंका येऊन ती थोडीशी लज्जित झाली. कुमारालाहि तसेंच वाटलें. त्याची छाती तर सारखी धडधडत होती.

बालिकेनें खुणेनेंच त्याला आपल्या मागून बोलाविलें. तोहि तिच्यामागून गेला. त्याला आपल्या दैवाचे खेळ पहात आलेला दिवस घालवावयाचा होता. हें नवीन ठिकाण आपल्याला कितपत मानवतें याची त्याला शंका होती. हे तपोनिधि ब्राह्मण

फार कोपिष्ट आणि थोड्याशा अपराधानेंही रागावणारे असतात असें त्यानें ऐकलेलें होतें. आपण करीत आहों ही गोष्ट फार अनुचित आहे, असें त्याचें मन त्यास सांगत होतें. पण घडणाऱ्या गोष्टीला त्याचा कांहीं इलाज नव्हता.

बिल्वपत्रें मोजावयाचें काम बालिकेनें कुमाराकडे दिलें. कुमार बिल्वपत्रें मोजूं लागला. थोड्या वेळानें काशीक्षेत्रांतली पहिली आज्ञा मठाधिपतीनें केलेली एक माणूस येऊन सांगून गेला. त्या दोघांहि मुलांनीं ती ऐकिली होती.

" हिंदुधर्मग्रंथ लोक नेतात म्हणतात. मग ते कशासाठीं नेतात हो कुमार? " त्या बालिकेनें विचारलें.

" वाचण्यासाठीं. " त्या कुमारानें उत्तर दिलें.

" तर मग हे लोक तसें करायला प्रतिबंध कां करितात? " तिनें पुन्हा दुसरा प्रश्न विचारला.

कुमाराच्यानें उत्तर देववलें नाहीं.

इतक्यांत थोड्या वेळानें दुसरी ती चमत्कारिक घोषणा झाली.

" अकबर बादशहानें कशासाठीं बायकांना बोलाविलें असेल बरें? "

" बाळंत होण्याकरितां " कुमार म्हणाला.

" पण त्याचा हेतू काय? "

" मला नाहीं ठाऊक. "

" तुम्हीं बादशहाला पाहिलें आहे कांहो कुमार? "

कुमार उभा राहिला. त्याची छाती फारच जोरानें उडूं लागली!

---

# प्रकरण सोळावें.

## माझा भक्ष्य कुठें आहे?

जी घोषणा आपण काशी क्षेत्रांत ऐकली तीच घोषणा दिल्ली शहरांत, आग्रा शहरांत व इतर मोठमोठ्या शहरांत झालेली होती. सर्वच लोकांस या विचित्र घोषणेचें गूढ उकलत नव्हतें.

दिल्ली शहरांत सूतिकागृहाची उभारणी व व्यवस्था अगदीं नेटानें चालू होती. बाळबाळंतिणीकरितां करण्यांत यावयाचे सर्व उपचार बादशाही थाटानेंच करण्यांत यावयाचे होते. पण या सूतिकागृहांत ज्या परिचारिका नेमावयाच्या त्यांना कांहीं सूचना गुप्त रीतीनें देण्यांत यावयाच्या होत्या. ह्या बातमीमुळें तर लोकांस

अधिकच संशय येऊं लागून ठिकठिकाणीं चर्चा होऊं लागली. बादशहाचा हेतु तरी काय आहे हें कोणासच अजमावतां येईना.

अकबराला आपल्या राज्यांत शिक्षणाचा प्रसार सर्वत्र व्हावा ही मोठी इच्छा होती. यासाठीं जिकडे तिकडे पाठशाळा स्थापन करण्याचा उद्योग त्यानें आरंभिलाच होता. ज्या गांवांत संस्कृत पाठशाळा चालण्याइतकी हिंदु वस्ती नसे, त्या गांवांतील मक्तबमध्येंच मुसलमानांच्या मुलांबरोबर हिंदु मुलें मोठ्या आवडीनें शिक्षण घेत असत. हरप्रयत्नें करून हिंदु आणि मुसलमान या दोघांमध्यें बंधुभावना उत्पन्न करण्याचें ध्येय अकबर बादशहाचें असून त्यांत त्याला अबुल फाझल, तोडरमल्ल वगैरे सूज्ञ पुढारी पाठिंबा देत असत. परंतु याच्या उलट, बदाउनी, शिरहिंदी प्रभृति लोक त्याच्या धोरणाला विरुद्ध होते.

बदाउनीच्या घरीं आतांशा एक पाहुणा आला होता. बदाउनीचें मोठें नांव ऐकून आपलें कल्याण होईल अशा आशेनें तो त्याच्या घरीं उतरला होता. बदाउनीनें त्याला एखादी नोकरी बादशहाकडे देण्याचें कबूलही केलें होतें. जलालुद्दीनचें जाणें-येणेंहि बदाउनीकडे असेच. बदाउनीनें शिवशर्म्याच्या मार्फत एक दोन उपनिषद् ग्रंथही पैदा करून ते बादशहास नजर केले होते. बादशहाला आपल्या वाचनालयांत उत्तम उत्तम ग्रंथ असावे अशी जबर इच्छा होती. लिहिण्यावाचण्याची आवड व विद्येची जोपासना करण्याची इच्छा बाबरपासून तों अकबर–शहाजहानपर्यंत सर्वत्र बादशहांत थोड्या फार प्रमाणांत होती. हुमायून बादशहा तर आपल्या वाचनालयांत बसला असतां तेथून खालीं पडून निधन पावला होता. बदाउनीकडे आज आलेला पाहुणा फिरस्ता म्हणून केवळ पोटासाठीं आला, पण त्याचा आणि हिंदुस्थानचा बराच ऋणानुबंध होता असें म्हणावें लागतें. शिवाय याच पाहुण्याच्या जोरावर अकबरच्या धोरणाच्याविरुद्ध असलेल्या मुल्लयांत प्रतिपक्षाशीं दोन हात करण्याचा जोर आला.

आज दिल्ली शहरांत मोठी गमतीची गोष्ट घडली होती. दिल्ली शहरांतील मशिदीच्या पाठशाळेमधील मुलांना शिक्षक गणिताचें शिक्षण देत होते. मक्तबच्या भागांत गणिताचा पाठ चालला होता आणि मद्रासांत ज्योतिःशास्त्राचा पाठ सुरू होता. मामानागासाहेब आज आपल्या पाठशाळेंत सहज पाहणी करण्याकरितां म्हणून आल्या होत्या. अकबरकालीन शिक्षणपद्धति कमी प्रतीची होती असें उपलब्ध माहिती-वरून म्हणतां यावयाचें नाहीं. सेलीम–अकबर बादशहाचा मुलगा–हा आपल्या आजीबरोबर आज पाठशाळेंत आला होता. सेलिमाला थोडथोडें शिक्षण द्यावयास बादशहानें सुरुवात केली होती. मधूनमधून त्यानें पाठशाळेंत थोडा वेळ जाऊन बसावें अशी बादशहाची आज्ञा होती. पण सेलीम नियमितपणें पाठशाळेंत जात नव्हता. त्याचें आतां शिक्षणाचें वय झालें होतें. त्या वेळीं मक्तबांत प्राथमिक शिक्षण दिलें जात असे आणि मद्रासांत उच्चप्रतीच्या शिक्षणाची सोय केलेली होती. या दोन्ही विद्यालयांचा शिक्षणक्रम पुरा करणारास, नीतिशिक्षण, गणित, शेतकी,

क्षेत्रमापन, भूमिति, ज्योतिःशास्त्र, शारीरशास्त्र, प्रपंचशास्त्र, शासनशास्त्र, तर्कशास्त्र, वैद्यकीय ज्ञान, इतके विषय शिकावे लागत असत व शिवाय ताबी, रियाझी आणि इलाही हीं तीन शास्त्रेंही तयार करावीं लागत असत. यांपैकीं ताबी म्हणजे पदार्थविज्ञानसारखीं शास्त्रें, रियाझी म्हणजे गायनकला, यंत्रकला, गणित, व खगोलशास्त्र यांचा अंतर्भाव करणारीं शास्त्रें; आणि इलाही म्हणजे धर्मशास्त्र व ईश्वरविषयक विचार करणारीं शास्त्रें. त्यावेळच्या साधारण विद्वानांस देखील इतके विषय शिकावे लागत. पण ते शिकण्यांत विद्यार्थ्यांस वयाचीं बरींच वर्षें खर्च करावीं लागतात, व तीं पुस्तकांच्या अभावीं पाठांतराच्या घोकंपट्टींत फुकट जातात, हें पाहून अकबराला फार वाईट वाटत असे; याला उपाय कांहीं तरी सुचविण्याविषयीं त्यानें आपल्या विद्वत्सभेस हुमणें लावलें होतें.

मक्तबांतल्या वर्गांतून फिरत असतां मामानागा आणि सेलीम यांना बिगर इयत्तेंत बसलेली एक अत्यंत सुंदर मुलगी आढळली. मुलगी सुमारें पांच वर्षांची असावी. तिला पाहून म्हातारीला मोठें नवल वाटलें. "कोणाची ही मुलगी ?" असा तिनें मुख्याध्यापकास प्रश्न केला. त्यावर "ती बदाउनीच्या घरीं राहते" एवढेंच उत्तर मुख्याध्यापकांनीं दिलें. सेलीम मात्र त्या मुलीला पाहिल्यावर जागच्या जागींच खिळून गेला ! त्याला तिच्याकडे पहात रहावेसेंच वाटूं लागलें. आजीनें हाताला धरून ओढल्यावर मात्र त्याचा नाइलाज झाला. आजपासून घरच्या शिक्षकाकडेच बसून न राहतां थोडा वेळ तरी याच पाठशाळेंत यावयाचा त्यानें निश्चय केला. आपल्याला खेळावयास ही सोबतीण मिळेल तर किती बरें होईल असेंहि त्याला वाटलें.

म्हातारीनें बदाउनीच्या घरीं कोण पाहुणा आला याची चौकशी करावी असें मनांत आणलें होतें. पण तिला तितके देखील श्रम घ्यावे लागले नाहींत. कारण त्याच दिवशीं संध्याकाळीं बादशहाची गांठ पडली. त्या दिवशीं घडलेल्या एका नव्या गोष्टीची माहिती खुद्द बादशहानें ती मामानागाला दिली. इराणांतून ग्यासुद्दीन बेग नांवाचा कोणी एक चांगला कुलवान् गृहस्थ आला असून नोकरी मिळण्याबद्दल त्याचा अर्ज होता व त्याला प्रथम खासगींत नोकराला ठेवून मग त्याला खासगी कारभारी करावयाचें ठरविले असल्याचें अकबरानें मामानागाला सांगितलें. अशा प्रकारें या आठवड्यांत दिल्लीच्या पाठशाळेंत एक नवी विद्यार्थिनी आली होती.

पण दिल्लीच्या दुसऱ्या एका शाळेंतून गेल्या आठवड्यांत एक विद्यार्थी नाहींसा झाला होता. त्याचा शोध कर कर केला. पण पत्ता नाहीं. विश्वंभरशास्त्र्यांच्या पाठशाळेंतून एक विद्यार्थी एकाएकीं बेपत्ता झाला होता. त्याचा शोध कोणालाहि लावतां येत नव्हता. पण याबद्दल घडलेल्या गोष्टी रहस्यमय आणि चमत्कारिक होत्या.

हा मुलगा नाहींसा झाल्याबद्दल गवगवा झाला खरा. पण खुद्द जबाबदार असणाऱ्या सर्व व्यक्ति निश्चिंत राहिल्या होत्या हें मोठेंच आश्चर्य नव्हे काय ? आणि

जबाबदार व्यक्ति तेवढ्या जर साऱ्या मूग गिळून स्वस्थ बसतात, तर मग इतरे जनांनीं हवी तितकी बोंबाबोंब केली म्हणून तिचा फायदा काय ?

यावर आमच्या कित्येक वाचकांस वाटेल, त्यावेळीं देखील मुलें नाहींशी होत असत काय ? मुलें पळवून नेण्याची पद्धत त्यावेळीं देखील आतांच्याच सारखी होती कीं काय ? नाहीं. या मुलाला कोणी तरी कुठें तरी नेला होता. पण तो पळवून मात्र खास नव्हे ? पळवून नेला असता तर सारीं जबाबदार माणसें स्वस्थ कशीं राहिलीं असतीं ? पण हा बेपत्ता झालेला मुलगा कोण बरें ?

विश्वंभरशास्त्री यांच्या मठांतून हा मुलगा बेपत्ता झाला व त्याबद्दल विश्वंभर-शास्त्री यांची आरंभीं छाती धडधडल्याशिवाय राहिली नाहीं. पण ते गप्प राहिले. याला कारण दुसरें होतें. मठांतल्या दोन व्यक्ति एकदम बेपत्ता झाल्या होत्या. त्यांतली दुसरी व्यक्ति म्हणजे शिवशर्मा. शिवशर्मा आतांशा आपल्याला न कळतां कांहीं कारस्थानें रचीत आहे अशी शंका यापूर्वीच पंडितजींना आलेली होती; पण प्रत्यक्ष बादशहानें ज्याला आपल्या स्वाधीन केला, त्या फैझीलाच उठवून तो चालता होईल, अशी कल्पना पंडितजींना स्वप्नांतसुद्धां शिवली नाहीं. पंडितजींना आपला मृत्यु-काळ आतां अगदीं समीप येऊन ठेपल्यासारखें वाटलें. थोड्याच दिवसांपूर्वी बादशहाच्या बोलण्यावरून आलेले शेख मुबारिक आपल्या मुलाची खुशाली घेऊन गेले होते. त्यांना जर आपला मुलगा बेपत्ता झाल्याचें समजलें, तर ते आपली गतः काय करतील, आणि त्यांची स्वतःची अवस्था तरी काय होईल ? त्यांनीं विचारलेल्या प्रश्नास उत्तर तरी काय द्यावयाचें ?

पण याच्याहून भयंकर भीति होती ती बादशहाची. बादशहांनीं फैझीला आपल्या स्वाधीन केला. फैझी नाहींसा झाला, याच्याबद्दल जाब आपणाला बादश-हांनीं विचारला तर त्याला उत्तर काय देणार ? अशा अनेक प्रकारच्या विवंचनांत पंडितजी मग्न झाले होते. तितक्यांत त्यांना पूर्वोक्त विचित्र घोषणेची बातमी सम-जली. तेव्हां त्यांना बादशहाचा व त्याच्या सल्लागारांचा मोठा राग आला. लहान मुलांचें बादशहाला काय करावयाचें आहे, याचा पंडितजींनें मारे डोकें खाजवून विचार करकरून पाहिलें, पण कांहींच प्रकाश पडेना !

एक दिवस गेला. दोन गेले. चार दिवस झाले. तरी बादशहानें आपणास बोलावणें कसें पाठविलें नाहीं ? फैझी नाहींसा झाला हें समजतांच आपणास बाद-शहाचें धरणें कसें आलें नाहीं ? कीं जसा फैझीला अचानक आणून बादशहानें आपल्या हवालीं केला, तसा त्यानेंच त्याला आपल्याकडून अचानक उठविला असेल ? पण हें असें कशाकरितां केलें ? आपल्यावर तोहमत आणण्यासाठीं तर नसेल ना ? तसें असेल तर आतां आपली धडगत नाहीं. अशा विचारांत सात आठ दिवस गेले. फैझी नाहींसा झाल्याबद्दल मुसलमान लोकांना विश्वंभरशास्त्र्याचा मोठा संशय येऊं लागला आणि पंडितजींच्या मठाभोंवतीं सर्व मुसलमानांनीं गिल्ला करावयास सुरवात

केली. पण फैझी नाहींसा झाला असून अबुल फाझल, बादशहा, अथवा शेख मुबारिक या तिघांपैकीं तिघेहि आपापल्या जागीं स्वस्थ ! हें असें कसें ?

आग्र्याला मुबारिककडे कित्येक लोक जाऊन आले. पण मुबारिक तर सर्वांना तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगून उलट चूप बसवूं लागला. त्याचा चेहराही फारसा दुःखी दिसत नव्हता. मधल्यामध्यें लुडबुडणाऱ्या लोकांचा आतां अगदींच नाइलाज झाला. जबाबदार माणसें स्वस्थ बसल्यामुळें मधल्या लुडबुडयांचें कांहीं चालेनासें झालें. तथापि विश्वंभरशास्त्र्याविषयीं भलभलते गैरसमज पिकविण्यास मात्र त्यांना ही उत्तम संधि सांपडली. या संधीचा फायदा घेऊन बदाउनी, शिरहिंदी पक्षाच्या मंडळानें पंडितजीवर कटाक्ष धरला आणि त्याला पेंचांत पकडला.

इतक्याच सुमारास विद्वत्सभा फत्तेपूर शिक्रीस हालवावयाचा बेत ठरूं लागला. फत्तेपूर शिक्रीला बांधावयाच्या इमारती आतां सर्व तयार झालेल्या होत्या, व तें शहर सर्व प्रकारच्या सोयींनीं संपन्न करण्यांत आलें होतें. पंडितजी विवंचनेंत पडले होते. त्यांनीं जोरावरसिंगाला बोलावून आणून शिवशर्म्याची बातमी काढावयास सांगितली. ते खिन्न दिसूं लागले. फैझी नाहींसा झाला तो त्या तरुण मुसल्मानाच्या कारस्थानामुळें तर नसेल ? हीच शंका त्यांच्या मनांत आतां अधिकाधिक बळावत चालली. त्यांनीं जोरावरसिंगाला त्या तरुण मुसलमानाबद्दल माहिती विचारली. जोरावरसिंगाला विशेष कांहीं सांगतां येईना.

पण खरा प्रकार काय होता ? त्या तरुण मुसलमानानें फैझीला लांबविला होता काय ? त्याच्याविषयीं शंका येणें साहजिक आहे. कारण त्याचें उद्दिष्ट तेंच होतें. तो तरुण मुसलमान होता तरी कोण ? तो कोण होता हें वाचकांनीं ताडलेंच असेल. त्याचें नांव जरी सांगितलें नसलें, तरी त्याच्या साऱ्या कानगोष्टी आपल्याला समजलेल्या आहेत, त्यावरून फैझीचा अगर फाझलचा खून करूं इच्छिणारा तो हुसेनच होता हें कांहीं आतां कोणास सांगावयास नको. त्यानेंच त्याला लांबविला असावा असें पंडितजींना वाटलें. जोरावरसिंगाची कल्पनाही तशीच होती. जोरावरसिंगाला जवळ घेऊन पंडितजी म्हणाले—

" जोरावरसिंग, आपली दोघांची प्रतिज्ञा अद्याप पुरी झाली नाहीं, हें तुम्हाला ठाऊक आहेच. "

" होय. "

" तुम्ही तरी माझ्याशीं प्रामाणिकपणें वागतां काय ? "

" अशी शंका आपल्याला कां यावी ? "

" मी विचारतों, कां येऊं नये ? "

" मी नाहीं समजलों—"

" सांगतों. माझा सर्व विश्वास तुमच्यावर. तुमच्या खालोखालचा शिवशर्म्यावर. पण शिवशर्मा माझ्याशीं दगलबाजी करितो. "

" समजलं. "

" फैझीला, कोणीं कुठें लांबविला हें तुम्हांला ठाऊक आहे काय ? "

" शपथपूर्वक नाहीं. "

" त्या तरुण मुसलमानाला आमच्या पाटशाळेंत शिकायला यायचें होतें, असें तो म्हणाला, पण तो मारेकरी असावा, असा माझा तर्क आहे. "

" तो तर्क खरा आहे. "

" कशावरून ? "

जोरावरसिंगानें त्या रात्रीं घडलेलें झोटिंगांचें खलबत पंडितजीस हलक्या स्वरांत सांगितलें. मुख्य भाग सतीच्या पुरता त्यानें पूर्वींच सांगितला; पण फैझिच्या बद्दलचा त्यानें सांगितला नव्हता. तोहि इत्थंभूत इतिहास त्यानें विश्वंभरशास्त्र्यांस कळविला. तो ऐकून पंडितजींचा संशय दुणावत चालला. आतां त्यांना मुळींच चैन पडेना. पण नाहीं. शिवशर्मा कुठें गेला ?

पंडितजींनीं विचार करून पाहिलें. एकाएकीं निघून जाण्याची शिवशर्म्याची ही कांहीं पहिलीच खेप नव्हती. तेव्हां तोहि विचार राहिला.

" तर मग फैझीला त्या पाजी हुसेननेंच मारला नाहीं ना ? "

" तसें असतें, तर बादशहा स्वस्थ बसले नसते. "

" खरेंच. इतकेंहि माझ्या लक्ष्यांत येऊं नये ? बघा ! माझें मस्तक अगदीं भोंळल्यासारखें झालें आहे. खात्रीपूर्वक ही सर्व कारवाई बादशाचीच असली पाहिजे. तुम्हांला कसें वाटतें ? "

" तसेंच वाटतें. "

" पण यांत त्याचा हेतु तरी काय ? "

" आपण मात्र आतां जरा घाई केली पाहिजे. "

" कशी म्हणतां ? "

" फैझी आतां इथें नाहीं, तर हुसेन देखील आपल्यावर बिथरेल. "

" होय असें आहे खरें. "

" या साठीं हुसेनकडून आपलें काम कसें करून घ्यावयाचें याची कांहीं तरी युक्ति काढली पाहिजे. "

" हुसेनची इच्छा फार दुष्ट होती. त्याच्या तावडींतून फैझी सुटला हें एक बरेंच झालें असें मी समजतों. "

" पण तो आपल्या हातून सुटतां कामा नये. "

" त्यालाच काय करावें हें सुचत नाहीं. "

" त्याला आणखी उपाय आहे एक. "

" कोणता तो ? "

" जसा त्याचा फैझीवर दांत होता, तसाच फाझलवरही आहे. पण फाझलच्या फन्ना उडविणें जोखमीचें म्हणून तो इथें शिरकायला बघीत होता. "

" म्हणजे फाझलवर मारेकरी घालायला आपण मदत करावी म्हणतां ? "

" मुळींच नाहीं. फैझीला तरी कुठें मी मारूं दिला असतां ? त्या गरीब सालस मुलाला या दुष्टाकरवीं मी कधींच मरूं दिला नसता;- पण आपला कार्यभाग साधण्यापुरतें असल्या नीच मनुष्याशीं हांहूं करून वेळ मारून नेणें भागच पडतें. "

" या बाबतींत तुमचा विचार कसा आहे ? "

" फाझलला गारद करायला तुला मी मदत करण्याचा प्रयत्न करीन, असें त्यांस नुसतें सांगावयास कांहीं हरकत नाहीं. "

" आणि मग फाझलला आपण सावध करून ठेवावें, अथवा यालाच जाळ्यांत अडकवून कैद करवावें. "

" अस्संच थेट नाहीं. पण या दिशेनें मी आतां डोकें चालवितों. यांतून कांहीं तरी मार्ग दिसेल खरा. पण याला देखील आपल्याला दरबारी मंडळींत प्रवेश झालाच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतर नाहीं. "

" होय. पण त्याला धर्मांतर केलेंच पाहिजे म्हणतां ? "

" धर्मांतर केल्याशिवाय तोडरमल्ल आहेत. पण तोडरमल्लावर कोणाचाच विश्वास बसत नाहीं. कां ? तर केवळ हिंदुत्व. तुम्हीं पाहिलेंत ना ? सरकारींदरबारीं लिहिण्या-बोलण्याची भाषा निव्वळ फारशी असली पाहिजे, असा कडक कायदा या आपल्या तोडरमल्लनें केला. तो कायदा खुद्द बादशहास आणि सर्व अमीरउमरावांस पसंत पडला. त्या कायद्यामुळें सर्व हिंदूंना अप्रत्यक्षपणें फारशी शिकणें अपरिहार्य होऊन गेलें आहे. त्यामुळें आपल्या हिंदुधर्मीयांचा रोष आणि गैरसमज तोडरमल्लानें आपल्या मस्तकावर सोसला आहे. आणि तरी सुद्धां त्याला त्याच्या इमानपणाच्या नोकरीचें बक्षीस काय ? "

" अविश्वास. "

" अविश्वास ! आणि तो कां समजलांत काय ? मुसलमान नव्हे म्हणून. उलटपक्षीं हिंदूंच्या बाजूचें जर कांहीं कार्य करावयाचें असेल, तर तें मुसलमान होऊ-नच करतां येईल, अशी माझी पक्की खात्री झाली आहे. जोरावरसिंग ! मी जर मुसल-मान झालों तर माझ्याबद्दल राणाजींची गैरसमजूत होऊं न देण्याची आपण हमी घ्याल काय ? "

" पण जलालुद्दीनचें काय ? "

" अहो जलालुद्दीनचा अंत करावयाचा. सतीला सतीधर्म पाळूं द्यावयाचा आणि प्रतापसिंह महाराजांना अंतस्थ बातम्या पोंचत्या करावयाच्या आणि शक्य तेवढी खटपट करून राज्यव्यवस्था मुसलमानांप्रमाणेंच हिंदूंनाहीं सुखकर होईल अशी तजवीज करावयाची. पण हें सर्व नीटपणें साधावयाला मला मुसलमानच व्हावें लागेल. बादशहाचा माझ्यावर विश्वास नाहीं. फैझीला बादशहानेंच कुठें तरी फरारी करावयाला लावलें असलें पाहिजे असें माझी मनोदेवता मला आतां सांगूं लागली

आहे. माझ्याविषयीं कोणत्या मजकुराचें पत्र तोडरमल्लनें तिकडे उदेपुरास पाठविलें तें तुम्हाला समजलें ना ? ”

“ त्या जासुदाकडचें तेंच ना ? ”

“ तें पत्र आपण त्या कैद्याकडून रतनसिंहामार्फत घेतलें. वास्तविक बादशहाला तें मिळालें असतें, तरी बादशहाचा तोडरमल्लावर फारसा कोप झाला नसता. तथापि तो विश्वासांतून खास उतरला असता. तोडरमल्लाचा प्रतापसिंहाशीं मित्रत्वाचा पत्रव्यवहार आहे, या गोष्टीचा सुगावा दरबारला खात्रीपूर्वक लागला असला पाहिजे. पण न्यायी आणि निःपक्षपाती वर्तनामुळें त्याच्याविरुद्ध बादशहाचें मन कलुषित करण्यांत कटवाल्या मुसलमानांस यश येत नाहीं. माझ्याविरुद्ध तोडरमल्लाचाही गैरसमज, बादशहाचाही संशय आणि प्रतापसिंहाचाही रोष. शिवाय भरतखंडांतल्या एकूण एक ब्रह्मवृंदांचे शाप आतांशा माझ्या माथीं वर्षत आहेत. जोरावर ! माझ्या या मठाभोंवतीं देखील काशी क्षेत्राच्या ब्राह्मणांनीं मारेकरी पाठविण्याचें ठरविलें आहे, अशी गुणगुण मला आतांच कळली आहे. एकूण परस्परविरोधी पक्षांतला देखील मी सारखाच दुष्मन झालों म्हणावयाचा ! हाय हाय ! काय हें माझें दुर्दैव ! ”

“ पंडितजी, आपण इतके मुत्सद्दी, खंबीर कार्यकर्ते आणि आज हें आपण काय आरंभलें आहे ? खरोखर आपण असा शोक करूं नका. आपण म्हणतां तें मला अक्षरशः पटत आहे. आपल्या स्थितीची जाणीव मला एकट्याला तरी आहे. आपलें ध्येय, आपले विचार, आपली विद्वत्ता, आपल्या प्रतिज्ञा, आपली परिस्थिति आणि आपली मनःस्थिति या सर्वांची जाणीव पुरेपूर असलेला असा एक तरी प्राणी, हा जोरावरसिंग जर जिवंत मेवाडास पोंचला, तर राणाजींस, आणि साऱ्या दुनियेस आपलें खरें अंतरंग कळवील. आपलें मनोगत, आपलें अंतरंग, आपलें ब्रीद, आपला एकूण एक रक्तबिंदु हिंदु आहे. बाह्यात्कारीं आपल्या इष्टसिद्धीसाठीं आपण मुसलमानी धर्माचा बुरखा पांघुरलांत तरी मी आपला तिरस्कार करणार नाहीं. हा बुरखा तरी हिंदुधर्माच्या रक्षणासाठींच आहे, ही माझी खात्री आहे. तोडरमल्लांची तर इथल्या इथेंच आणि राणाजींची इथून गेल्यानंतर मी खातरजमा करीन असें वचन पाहिजे तर मी आपणास देतों. आपण मुळींच धीर सोडूं नये. आपण दोघेही आतां एकदिलानें कार्यास लागूं या. ”

“ ठीक ! तुमचें इतकें आश्वासन मला पुरें आहे. आपणाला शिवशर्म्यालाहि हातचा सोडतां कामा नये. इतकेंच नव्हे, तर आपण दोघांनीं त्याला चांगला पढवून तयार केला पाहिजे. तो मनुष्य वाईट नाहीं. फक्त अतिलोभी आहे. मी मुसलमान झाल्यावर त्याला या मठाचा मठपति करावा असा माझा उद्देश आहे. ”

“ त्यांत कांहींच वावगें नाहीं. हें निश्चितपणें कळल्यावर तोहि तसा घालघसर करणार नाहीं. तो आतां आल्यावर आपण त्याला सांगून सर्व गोष्टी मुक्रर करून टाकूं. ”

" तोडरमल्लचें तें पत्र व माझें पत्र प्रतापसिंहांना पोंचल्याचें उत्तर आलें कां ? तोडरमल्लजींच्या त्या पत्राची नक्कल मी मुद्दाम ठेवली आहे. त्या पत्रांत त्यांनीं जो आरोप केला आहे, तो यथार्थ नाहीं. हे बदाउनी वगैरे लोक अथर्ववेदांतून कांहीं भलताच अर्थ काढीत आहेत. कोणी कोणी त्यांत नवा मजकूर घुसडून द्यायला पाहात आहेत; व तें काम मला करायला सांगत आहेत. मी ग्रंथ त्यांना दिले असले तरी घुसडाघुसडी करण्याचा प्रकार मला बिलकुल मान्य नाहीं. जुन्या पुराण ग्रंथांत प्रक्षिप्त भाग बनवणें हें फार वाईट आहे. पण मला या लोकांचा फारच आग्रह आहे, कीं अल्लाच्या स्तुतिपरसूक्त रचून तें अथर्ववेदांत घुसडून द्यावें. हें जें नवें संकट माझ्यावर येऊं पहात आहे, तें टाळण्याला देखील मला मुसलमान झाल्याशिवाय गत्यंतर उरलेलें दिसत नाहीं. अगदीं खात्रीनें नाहीं. " विचार करीतकरीत पंडितजी म्हणाले.

" तें गत्यंतर कसें नाहीं, तें मात्र मला नाहीं समजलें. "

" तें आहे तसेंच उलटें गाडें, आलें नाहीं तुमच्या लक्ष्यांत ? "

" नाहीं माझ्या लक्ष्यांत आलें ! जोरावरसिंग म्हणाला.

" अथर्ववेदांत अल्लाची प्रशस्ति घुसडून द्यायला हे मला कां सांगताहेत बरें ? "

" आपण वेदविद्या जाणणारे विद्वान् पंडित आहांत म्हणून. "

" तेवढेंच नाहीं करण; खरें कारण निराळें आहे. "

" कोणतें ? "

" अहो, मी हिंदू पंडित आहे म्हणून. "

" आतां आलें लक्षांत सगळें. "

" तोच मी उद्यां मुसलमान झालों, कीं मग त्याला नाहीं महत्त्व राहिलें. मग तें एका मुसलमानानेंच केल्यासारखें होईल; आणि मुसलमानानेंच केलेल्या घुसडाघुसडीला मागाहून होणारे हिंदु संशोधक किंमत देणार नाहींत. मुसलमान झाल्यानंतर स्वतः मीच जरी ही घुसडाघुसडी केली, तरी ती कःपदार्थ ठरेल. हिंदुधर्म जगाच्या अस्तित्वापर्यंत प्रभावशालित्वानें टिकणारा आहे. तो असली घुसडल्यानें हिणकस ठरणार नाहीं. तथापि हें संकट टाळण्याला आतां मला मुसलमान होणेंच कसें भाग आहे, हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. "

" हो, हो. मघाशींच आलें तें माझ्या लक्षांत. "

" आतां माझी अडचण आपणाला पटली असेलच. "

" तें मी आतांच सांगितलें ना ? "

" पण पुढील पिढ्यांचे हिंदू माझ्या या कृत्याबद्दल काय म्हणतील ? "

" आपल्याला शेवटीं परत हिंदु होतां येणार नाहीं काय ? "

" शेवटीं कधीं ? "

" अंतकाळच्या वेळीं. "

" वास्तविक व्हावयाला कोणतीच हरकत नाहीं. पण तसे सर्व योगायोग जुळून येणें कोणाच्या स्वाधीनचें नाहीं."

" तसें जमेल तर बरें होईल."

" पण मी एका सत्कार्याकरितां हें धर्मांतर करीत आहे, एवढें तरी समाधान माझ्या अंतरात्म्यास राहील ना ? मग काय हरकत आहे ? "

" आणि कायावाचामनानें अंतर्बाह्य हिंदु असतांना तुम्हाला बाह्य वेषानें मुसलमान म्हटलें म्हणून तरी काय हरकत आहे ? "

" शिवाय जोरावरसिंग हें पहा ! धर्मांतर केल्यानंतर मला मुसलमानाला देखील अधिकारयुक्त शब्दांनीं खऱ्या मुसलमानी धर्माचीं तत्त्वें बिंबवतां येतील. मुसलमानी धर्माचें शुद्ध स्वरूप मी विशद करूं लागलों कीं त्यांतले दोष देखील मला दाखवावे लागतात; पण त्यांचा इष्ट परिणाम न होतां उलट अनिष्ट परिणाम मात्र होतो. कारण मी हिंदु. मी हिंदुधर्माचा कैवार घेऊन मुसलमानी धर्माविरुद्ध आक्षेप घेतों असा ह्या चांगल्या चांगल्या समजूतदार म्हणविणाऱ्या अशा विद्वानांचा ग्रह होतो आणि आपल्या समजुतींची छाया हे लोक बादशहाच्या मनावर पाडून माझ्या-विरुद्ध त्याचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न करीत असतात. ऐकावें जनांचें आणि करावें मनाचें या नीतीनें बादशहा वागणारा आहे म्हणून माझा आजवर पल्ला लागला. पण यापुढें बादशहाचें मन माझ्याविषयीं शुद्ध राहील असें कांहीं म्हणवत नाहीं. असले बिघडलेल्या दृष्टीचे पक्षपाति विद्वान् धर्मतत्त्वाचें काय शोधन करणार तें दिसतेंच आहे. या सगळ्या दरबारांत अबुलफाझल हा मात्र एक खरा साधुपुरुष आहे. मुसलमानी धर्माचें तो भूषण आहे. खरा धर्मनिष्ठ तो एकटा आहे. अकबर बादशहाची पुण्याई सबळ म्हणून असला सल्लागार त्याला पैदा करतां आला."

" फैझी देखील तसाच होईल."

" अलबत् ! फैझी तर फाझलच्याहि वर होईल ! पण बिचारा—" इतकें म्हणून ते पुन्हा सचिंत झाले. त्यांनीं एक दीर्घ श्वास सोडला.

" खरोखर फैझी जर जगला वांचला तर तो हिंदुमुसलमानांत बंधुत्वाचें नातें दृढ करील. हिंदु आणि मुसलमान हे दोघे भाई हातांत हात घालून वागतील, तर जगद्विजयी होतील. त्यांची संघटित शक्ति जगाला भारी होईल. त्यांचें प्रेम उभयतांना सुखावह होईल. पण आजवर मुसलमानांनीं धर्माचें खरें तत्त्व समजून न घेतां निष्का-रण हिंदूंशीं वैर केलें. त्यांचीं देवळें जमीनदोस्त केलीं. त्यांना जबरीनें बाटविलें. त्यांच्या धर्मभावना दुखविल्या आणि अनेक अत्याचार केले. इतकें करायला हिंदूंनीं मुसलमानांचा कोणता अपराध केला होता ? त्याची निष्कृति करावयाची तर आतां तरी मुसलमानांनीं हिंदूंशीं सलोख्यानें आणि प्रेमानें वागलें पाहिजे. अकबरशहाचें हें धोरण अगदीं मुत्सद्दीगिरीचें आहे."

" आणि त्याला सहाय्य करण्याचें मुसलमानी सत्तेचा उत्कर्ष व्हावा असें इच्छिणाऱ्याचें कर्तव्य आहे."

" जोरावरसिंग इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानचें हित व्हावें, असें इच्छिणारांनीं सुद्धां उभयतांचें ऐक्य होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. "

" पंडितजी! आज अकबरशहासारखा शहाणा बादशहा तहनानशील आहे, तोंपर्यंत ठीक आहे. पण मग जर एकच पक्ष चढेल झाला, तर मात्र पंचाईतच आहे. हेंच पहाना. बिचारे प्रतापसिंह कांहीं दिल्ली बळकावयाला येत नाहींत. तर त्यांचें राज्य यांनीं घेतलें. राज्य घेतलें तर घेतलें. पराक्रमी पुरुषाचा तो धर्मच आहे. पण आतां राणाजींनीं स्वतंत्र उदेपूर शहर वसाविलें. आतां त्यांच्यामागें यांचा त्रास कां म्हणून असावा? "

मग शत्रूचा पिच्छा पुरवावयाचा हा पराक्रमी राजाचा धर्मच आहे. त्याला आळा घालण्याचें काम कोणाचें? "

" आम्हां रजपुतांचें? "

" मग तुम्ही तसें वागतां होय? "

" आमचें आपसांत ऐक्य असतें, तर दिल्लीपतीशीं आम्ही सर्व समतेनें राहिलों असतों. त्यांच्या पदरीं नोकऱ्या आणि सरदाऱ्या घेण्यासाठीं अहमहमिका करण्यांत भूषण वाटलें नसतें. "

" बरोबर ओळखलेंत. समबल पुरुषांमध्यें खरा स्नेह जडतो. उच्चकनिष्ठांचा स्नेह तो स्नेहच नव्हे. त्यांत समानतेची भावना नसते; म्हणून तो जमत नाहीं आणि जमला तरी टिकत नाहीं. "

अशा प्रकारें त्यांचा संवाद चालू असतां त्यांना घोड्याच्या टापा ऐकूं आल्या. बादशहाचा स्वार पंडितजींना निमंत्रण घेऊन आला होता. पंडितजींनीं जोरावरसिंग-कडे पाहिलें; आणि त्यांनीं निघण्याची तयारी केली. त्यांनीं जोरावरसिंगाला मठा-कडेच ठेवून निराळ्या एक दोन माणसांना आपल्याबरोबर नेलें.

पंडितजी निघून गेले खरे, पण त्यांनीं हुसेनला निरोप पाठविला होता, तो त्यांच्या लक्षांत नव्हता. पंडितजी गेले आणि थोड्या वेळानें हुसेन तेथें येऊन ठेपला. पंडितजी त्याला दिसेनात; पण जोरावरसिंग तेथें होता. जोरावरसिंग त्याला घेऊन एका बाजूस गेला.

" पंडितजी कुठें दिसत नाहींत तें? " हुसेननें विचारलें.

" पंडितजींना बादशहांनीं बोलाविल्यावरून ते आतांच तिकडे गेले. "

" मग कांहीं आतां लवकर येत नाहींत ? "

" येतील लवकरच. "

" पण मला अधिक वेळ रहावयास सवडच नाहीं. "

" कां इतकी घाई कसली? "

" आमच्या सुभेदार साहेबांना स्वारीवर जावें लागणार अशी बातमी समजल्या-मुळें स्वारी जरा घाईत आहे. "

" स्वारी? आपण तर हें एक नवलच ऐकतों. "

" बातमी खरी कीं काय हें आतां समजून घेण्याकरितां बाहेर जाणार आहेत. त्यांना देखील ती खरी वाटत नाहीं. अझून बादशाही हुकूम आलेला नाहीं. "

" तेव्हां घाई कसली? "

" सतीला भ्रष्ट करावयाची. "

" अझून इतके दिवस कसे घालविले? "

" आतांपुरती तावडींत आहे म्हणून. आतां त्यांची विषयवासना राहिलेली नाहीं. पण ईर्ष्या राहिलेली आहे. "

" अस्थिपंजराच्या काष्ठावर आतां विषयी वासना कसली राहणार आहे? हुसेन, मला तूं कधीं संधि देणार? "

" बादशहा उद्यांक शिकारीला जाणार, तेव्हां आमचे सुभेदारसाहेब आपली प्रतिज्ञापूर्ति करणार आहेत. तेव्हां आपल्याला चांगलीच संधि मिळेल. "

" शाबास मित्रा! " असें म्हणून जोरावरनें हुसेनची पाठ थोपटली.

" पण जोरावर! " असें म्हणून हुसेन जोरावरच्या डोळ्यांकडे तिरव्या नजरेनें पाहूं लागला.

जोरावरसिंग मनमोकळेपणानें फक्त हांसला.

" यार! माझा भक्ष्य कुठें आहे? "

" अगदीं निखालस शाबूत आहे. "

" असल्या थापाथापीवर आतां माझा विश्वास नाहीं बसणार. "

" पण थापाथापी कसली झाली? "

" तो पोर आहे कुठें? " मला तुम्ही सांगितलेंत, आहे दृष्टिआड झालेला म्हणून. मला सवड मिळाली नाहीं त्यानंतर. माझा संशय न येईल अशा रीतीनें मला इकडे यावें लागतें. आपल्या बोलण्यावरून आपणच त्याला माझ्यासाठीं कुठें तरी लंबे केला असेलसें वाटलें. माझा तर्क खरा आहे ना? "

जोरावरसिंगाला काय उत्तर द्यावें हें सुचेना. तो म्हणाला—

" तुमचे भक्ष्य दोन आहेत ना? "

" होय. "

" मग दोन्ही कांहीं दृष्टिआड झालेले नाहींत. "

" ही चुकवाचुकवी नको. "

" मोठा भक्ष्य मिळाला तर काय वाईट झालें? "

" म्हणजे फाझल म्हणतां? "

" होय. "

" तो मिळणें अगदीं अशक्य! "

" कां ? "

" आतां तो बादशाही कुंपणांत शीरसलामत आहे. "

" पण मी तोडरमल्लाकडे आपला प्रवेश करून देतों. "

" पण हा पोर कुठें आहे ? "

" तो नाहींसा झाला तेव्हां मला वाटलें कीं, तुम्हींच त्याचा शिरच्छेद केला, आणि करायचें तें करून सवरून उलट मला विचारतां आहांत. म्हणून त्या वेळीं मी तुम्हांला तसें उडवाउडवीचें उत्तर दिलें. पण नंतर तुम्ही पुनः एकदोनदां विचारलें तेव्हां मला मोठा विचार पडला. आणि आतां तर भीतीहि वाटूं लागली. पंडितजी आणि मी तुमचीच वाट पहात होतों. आमची समजूत खरोखरच अशी होती कीं, तुम्ही त्याला ठार केला. मला त्याचें सुखदुःख कांहींच नाहीं. पण पंडितजीवर हा मोठाच प्रसंग आलेला आहे. कारण पंडितजींच्या स्वाधीन त्याला खुद्द बादशहानें केलेला होता. आणि आतां पंडितजींना जें बादशाही बोलावणें आलें त्याचें कारण जर हेंच असेल—आणि बहुधा हेंच तें कारण असणार—तर मात्र आमची व मठाची आतां धडगत नाहीं. काय होतें आणि काय होणार कोणास ठाऊक ! "

" जोरावरसिंग! तुम्ही म्हणतां तरी काय हें? फैझी येथून खरोखरीच निसटला? तर मग याउपर तुमची माझी दोस्ती टिकणें शक्यच नाहीं. तुम्ही हिंदू असेच लबाड आहांतसें दिसतें. तुम्हांला वचनाची किंमत नाहीं. माझें हितगुज तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाएकास ठाऊक नाहीं. आईबापास देखील मी कधीं सांगितलें नाहीं. केवळ या जन्मांत मला एवढेंच एक कार्य करावयाचें आहे. शेख मुबारिक मरावयाच्या अगोदर त्याच्या पोराचें प्रेत मी त्याच्या नजरेस घालणार. मला जिवंत करून उपकार केल्याचें ढोंग मिरवित बसला आहे थेरडा ! शाळेंत असेपर्यंत माझी हेटाळणी करण्यापलीकडे एक दिवसाहि घालविला नाहीं म्हातारड्यानें. माझा भक्ष्य माझ्या दाढेखालून आज तरी सुटला खरा. पण त्याला तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणी सावध केला नाहीं. माझी पक्की खात्री आहे. "

जोरावरसिंग संतापला होता. पण नाइलाजास्तव तो आपला कोप आवरून धरीत होता.

" कां? आतां बोलत कां नाहींस? "

" आतां बोलण्याचें कारणच नाहीं उरलें. " जोरावरनें संतापून उत्तर दिलें.

" कशाला उरणार? " हुसेन त्याला खिजवूं लागला.

" तें राहूं द्या; पण हुसेन, मी तुला आतां याच घटकेला एकदांच बजावून ठेवतों कीं, तूं मला जेव्हां कांहीं बोलशील तेव्हां मला एकट्याला बोल. त्याचें निराकरण मी करीन. नाहीं तर काय करावयाचें तें करीन. पण मला बोलतांना हिंदू जातीला अथवा कुळवंशाला उच्चारून बोललास तर याद राख. मी मागें पुढें पाहणारा नव्हे. एक घाव नी दोन तुकडे ! "

बोलतां बोलतां जोरावरच्या मुठी वळूं लागल्या आणि त्याचे डोळे लाल झाले. तो हुसेनकडे तुच्छतेनें पाहूं लागला.

आपण काय चुकी केली ती हुसेन आतां उमगला. त्यानें नमतें घ्यावयास सुरवात केली. आपण जोरावरला चिडवला तर कोणताच कार्यभाग न साधतां उलटा तोटाच होणार, इतकेंच नव्हे तर तंगड्या स्वतःच्याच गळ्यांत येणार, हें समजून त्यानें जोरावरच्या खांद्यावर हात टाकला.

" हट् ! " जोरावरनें त्याचा हात झिडकारला.

" हें पहा ! दिल्यार ! मी चूक केली. पण माझा भक्ष्य कसा मिळेल हें आतां मला तूंच सांग. "

" आतां कसें ? "

" वाहवा ! हें पहा, मला या अफाट दुनियेंत तुझ्याशिवाय दिलाचा दोस्त कोणीच नाहीं "

जोरावरसिंगाला हुसेनचा दोस्त म्हणवून घेण्याइतकें लांछन दुसरें कोणतेंच वाटलें नसतें. पण करतो काय, अडला ना ?

" मग आतां आपण पुढला विचार ठरवूं या ना ? "

" पण ते कोणरे दोघे आले मठांत ? चल अगोदर बघूं कोण तें ? "

हुसेननें, जोरावरसिंगनें जिकडे बोट दाखविलें तिकडे पाहिलें, तों मठांत हुश्श हुश्श करीत एक ब्राह्मण व एक त्याचा दांडगट गडी असे दोघे येऊन बसले.

" कोण हो पाहिजे आपल्याला ? "

" पंडितजी विश्वंभरशास्त्र्यांचाच हा मठ काय ? "

" होय होय. कोण आपण ? "

" आम्ही यात्रेकरू. "

" आलांत कुठून "

" द्वारकेहून. "

' आतां आपण द्वारकेहून आलांत म्हणतां ? "

" द्वारकेहून आम्ही मथुरा, काशी, गया इत्यादि क्षेत्रें करून पुन्हा द्वारकेला जाणार आहोंत ? "

" मग, इकडे कुठें वाट चुकलांत ? "

" दिल्ली आग्रा म्हटलें पहावींत. "

" हं. हं. आपल्याला क्षेत्रांशिवाय शहरें देखील पहावींशीं वाटतात तर ? "

" शहरें पहावीं आणि विश्वंभरशास्त्रीबोवांचा मठही पाहून जावेंसें वाटलें म्हणून आलों इकडे. "

" मठ हा असा आहे. "

" ठीक आहे. छान आहे. पण पंडितजी कुठें आहेत ? "

" जरा बाहेर गेले आहेत. येतील इतक्यांत. "

" आपण कोण ? "

" मी एक मठाचा सेवक. "

" राजपुतान्यांतले दिसतां ? "

" होय तिकडचाच आहें मी. "

" आणखी कोण शिष्यमंडळी आहे ? "

" आहेत बरेच लोक. "

" सारे ब्राह्मणच असतील, होय ना ? "

" असेंच कांहीं नाहीं. "

" मग खरें तर; आम्हीं असेंच ऐकलें होतें. शिष्यवर्गांत मुसलमान देखील आहेत म्हणे. "

" आहेत. ते कांहीं शिष्य नव्हेत. कोणी तरी मठ पहायला येणारे असतात. "

" थोडें प्यायला पाणी पाहिजे. "

" हो हो मिळेल. " असें म्हणून त्यानें ब्राह्मणाकडून त्यांना पाणी द्यायला लावलें. ते दोघेहि हातपाय धुवून व पाणी पिऊन आसनावर बसले. त्यांना प्रवासाचा फार त्रास झाला असावासें दिसलें. ते दोघेहि जोरावरसिंगकडे व इतर माणसांकडे चिकित्सक दृष्टीनें पहात होते असें कोणाहि पहाणारास वाटलें असतें. "

---

# प्रकरण सतरावें.

## मारेकऱ्यांच्या स्वाधीन !

बादशाही स्वारी **शिक्रीला** चालल्यामुळें जिकडेतिकडे मोठी गर्दी उडून गेली होती. बरोबरचे मातबर लोकही जाणार होते. **शिक्रीला** मोठमोठे विद्वान लोकही जमणार होते; कारण त्या ठिकाणीं या आठवड्यांत विद्वत्सभेची खास बैठक भरावयाची होती; आणि त्या सभेंत महत्त्वाच्या प्रश्नांचा खल व्हावयाचा होता. शिवाय हल्लीं जी **मोंगली** राज्यांत विचित्र घोषणा करण्यांत आली, तिचाही उलगडा याच बैठकींत लोकांना समजून येणार होता.

अशा अनेक कारणांमुळें **शिक्रीला** लोकसमुदाय सारखा लोटत होता. केवळ **दिल्ली**-तलेच नव्हे, तर ठिकठिकाणचे लोक या आठवड्यांत शिक्रीला जमणार होते. कित्येक तर असें म्हणत होते कीं **फैझी** जरी बेपत्ता झाला तरी तो शिक्रीलाच आहे व **शिक्रीला** सर्वांना दिसणार होता. शिक्रीला व्हावयाच्या दरबारची द्वाही अशा प्रकारें चोहोंकडे पसरल्यामुळें शिक्रीकडे सर्वांचा डोळा लागला होता; आणि साम्राज्याच्या सर्व भागांतून **शिक्रीला** लोक धांव घेऊं लागले होते.

पण **जलालुद्दीन** आजारीपणाचें ढोंग करून **दिल्लींत** राहिला. खुद्द बादशहा, दरबारचे उमराव, मानकरी सरदार, सगळे जण शिक्रीला गेले, पण **जलालुद्दीनच्यानें दिल्ली** सोडवेना. बिमारीचें ढोंग करून त्यानें बादशहाचा खास परवाना मिळविला. परवान्याला बादशहाकडून विलंब न लागतां मंजुरी मिळाली. **जलालुद्दीनला** आनंद झाला.

आज आणखी एक गोष्ट फार महत्त्वाची झाली होती. **विश्वंभरशास्त्री** ऊर्फ पंडितजी यांची सुंता होऊन ते **शिक्री** मुक्कामीं मुसलमानी धर्माची दीक्षा याच संधीस घेणार आहेत, अशीही बातमी पसरली होती. मग काय विचारतां ? मुसलमानांना या बातमीनें फार आनंद झाला होता.

तथापि **शिक्रीकडे** जावयाच्या आधल्या दिवशीं रात्रीं मठांत घडलेल्या एका प्रकाराची गोष्ट थोडक्यांत सांगून मग **शिक्रीकडची** व **दिल्लीकडची** हकीगत वाचकांस कळवावयाची आहे.

ते दोघे प्रवासी मठांत येऊन त्यांचीं **जोरावरसिंगाबरोबर** झालेलीं बोलणीं मागील प्रकरणांत सांगितलींच आहेत. रात्रा पंडितजींची स्वारी मठांत आल्याबरोबर **जोरावरसिंगनें** त्यांना एकीकडे नेऊन आलेल्या पाहुण्यांची ओळख करून दिली. पंडितजी आल्यानंतर थोड्या वेळानें **शिवशर्मा** देखील येऊन दाखल झाला.

**शिवशर्म्याच्या**बरोबर एक पाहुणा आला होता.

**शिवशर्मा** आलेला पाहून पंडितजींना आनंद झाला.

पंडितजी आल्यावर या नव्या पाहुण्यांनीं आणलेलीं फळें व मिठाई पंडितजींच्या समोर ठेवून त्यांना मोठ्या आदरानें नमस्कार केला. **शिवशर्म्याच्या**बरोबर जो पाहुणा आला होता, त्याला ब्राह्मण म्हणण्याची कुणाची प्राज्ञा नव्हती. तो आपण एक फिरस्ता व्यापारी असल्याचें सांगत होता. ठिकठिकाणीं कोणकोणता माल पैदा होतो, याची माहिती घेऊन आपल्या मालाला गिन्हाईक कोठें, कसें मिळेल तें पहाण्याचा आपला हेतु या प्रवासाच्या मुळाशीं आहे असें त्यानें सांगितलें होतें. त्याचा धंदा चाकू, सुऱ्या, कातऱ्या, वस्तरे वगैरे बनविण्याचा होता. त्यानें एक दोन नमुनेही आपल्याकडचे दाखविले.

ते नमुने पाहून आणखी माल आहे कीं काय, असें जोरावरसिंगास विचारावयास पंडितजींनीं सांगितलें.

“ आणखी माल इथें माझ्यापाशीं नाहीं. ” तो व्यापारी पाहुणा म्हणाला.

“ मग गिऱ्हाइकाला पुरवठा कुठून करणार ? ”

“ गांवीं जाऊन पाठवून देणार. मागणी फक्त नोंदून घ्यावयाची. ”

“ आम्हांला माल पुरवाल काय ? ”

“ तुम्हांला मठांतल्या लोकांना असलीं हत्यारें—शस्त्रें कशाला पाहिजेत ? ” संशयानें व्यापाऱ्यानें विचारलें.

“ बरें तुमच्यापाशीं असलेले एवढे नग तरी आम्हास विकत देतां काय ? ”

“ वः मग दुसऱ्या ठिकाणच्या लोकांस मी नमुने कुठले दाखवायचे ? ”

“ म्हणजे तुम्ही आम्हाला तुमच्याजवळचे नग देत नाहीं, गांवांहून माल पुरवायलाही कबूल नाहीं. यावरून तुम्हाला आम्ही व्यापारी कसें समजावयाचें ? ”

व्यापारी ओशाळला. जरासा गोंधळलाही. आपण फसल्याचें आढळून आल्यावर क्षणभर त्याच्या मनाची चलबिचल झाली. लगेच बाजू सावरून तो म्हणाला.

“ मी तुम्हाला मालाचा पुरवठा करीत नाहीं, असें मुळींच म्हणालों नाहीं, तुम्हाला कशाला असेंच फक्त विचारलें ? ”

“ पण व्यापाऱ्याची दृष्टि आपला माल खपविण्याकडे असते, तो गिऱ्हाईक कशा प्रकारचा आहे, कां घेतो हें नाहीं व्यापारी विचारीत बसणार ! आम्हाला तुमची अंदेशा येते. ”

व्यापारी आतां तर अगदींच गोंधळला.

“ संशय येण्यासारखें कांहींच नाहीं. तुम्ही माल घ्या अगर न घ्या. आम्ही आजची रात्र येथें मुक्काम करून उद्यां इथल्या इतर लोकांना भेटून आम्हाला परत स्वदेशीं जावयाचें आहे. ”

“ तुमचा गांव कोणता ? ”

“ **सिरोही.** ”

“ **सिरोही ? सिरोहीचे माणकचंद** तुमच्या ओळखीचे असतीलच ? ”

“ हो—हो—नाहीं. ”

“ नाहीं ? ”

“ दुसरे कोण आहेत तर ओळखीचे ? ”

“ आपण **सिरोहीचेच** कीं काय ? ”

“ होय. म्हणूनच आमच्या गांवची कांहीं माहिती काढावी म्हणून आपणाला विचारलें. ”

“ तर मग तुम्हांला आमच्याकडची हत्यारें नाहींत लागायची. ” टाळाटाळ करण्यासाठीं तो व्यापारी म्हणाला. “ शिवाय आम्ही सिरोहीला हल्लींच आलों, तत्पूर्वी आम्ही खालीं विजापूरला राहत होतों. ”

“ अस्सें. तुम्हाला आजची रात्र येथें रहायचें आहे तर ? ”

" हो. फक्त एकच रात्र राहणार ? "

" बरें आहे. रहा. "

इतकें बोलणें झाल्यावर आणखीहि हवापाण्याच्या वगैरे इतर गोष्टी झाल्या व देवापुढें आरती करण्यांत आली आणि पाहुण्यांनीं आणलेले जिन्नस देवास नैवेद्य म्हणून दाखवून प्रसाद म्हणून वाटण्यांत आला. सर्वांनीं आपापला प्रसाद घेऊन ठेवला; तसाच पाहुण्यांनीं घेऊन ठेवला. मठांतल्या सर्व मंडळीस प्रसाद निराळा नेहमींप्रमाणें देण्यांत आला होता. पण पाहुण्यांच्या मिठाईचें मिश्रण त्यांत नव्हतें. पाहुण्यांचाच प्रसाद पाहुण्यांना देण्याची खबरदारी घेण्यांत आली होती. जेवणखाण झाल्यावर मंडळी जागोजागीं झोंपावयास गेली.

मठाच्या पूर्वेकडच्या बाजूच्या उघड्या जागेंत पाहुणे निजले होते. पण **शिवशर्म्याबरोबर** आलेला पाहुणा दुसऱ्या बाजूस निजला होता. पश्चिमेकडच्या बाजूस बाहेरच पंडितजी आणि **शिवशर्मा** असे दोघेजण निजले. पण बरीचशी रात्र झाल्यावर ते दोघे उठून आंत बोलावयास गेले. ते दोघे निघून गेल्यावर, मथुरेच्या पाहुण्यांस **जोरावरसिंगनें** उठवून पंडितजी व **शिवशर्मा** यांचे जागीं निजविलें. त्या खोलींत जागा बरी आहे असें पाहून ते दोघेहि तिथें मोठ्या आनंदानें झोंपले. आपण आणलेली मिठाई आपल्या अपेक्षेप्रमाणें सत्कारणीं लागली, याबद्दल त्यांना मोठा आनंद झाला होता. पहांटेच्या पूर्वीच कोणास न कळवितां उठून जाण्याचा त्यांचा इरादा होता. तथापि त्या दोघांना श्रमामुळें चांगलीच झोंप लागली. **जोरावरसिंग** आपल्या जागेवर जागृतपणें निजल्याचें सोंग घेऊन घोरत पडला होता.

मध्य रात्रीनंतर त्याला पावलें वाजलेलीं ऐकूं आलीं. तो **शिवशर्म्याबरोबर** आलेला पाहुणा आपल्या जागेवर आहे कीं काय, हें पाहूं लागला. पण आपल्या जागेवरून न उठणें त्याला अधिक योग्य वाटलें. त्याला पुन्हा पावलड ऐकूं आली. म्हणून त्यानें डोकें वर करून कानोसा घेतला, तों त्याला कुठेंतरी कांहीं तरी धडपड होत असल्यासारखें वाटलें. त्याचें मन अस्वस्थ झालें. त्यानें आणखी कानोसा घेतला तों आंत पंडितजी आणि **शिवशर्मा** बोलत असल्याचें त्याला ऐकूं आलें. पण तो आवाज चिरपरिचयामुळें **जोरावरला** म्हणूनच ऐकूं आला. परक्याला ओळखतां आला नसता. आणि तें देखील एकसारखें बोलणें ऐकूं येत नव्हतें. मधूनमधून एखादा शब्द उच्चारल्याचा ध्वनि उमटत होता. **शिवशर्म्याची** कानउघाडणी आणि समजूत सकाळीं **शिकीस** जाण्यापूर्वी पंडितजी घालीत आहेत, हें त्यानेंही ओळखिलें.

थोड्या वेळानें **शिवशर्म्याबरोबर** आलेला पाहुणा आपल्या आंथरुणावर लाथा आपटीत हातपाय झाडीत पडला असून तहानेनें व्याकूळ झाल्यामुळें क्षीण स्वरांत पाणी मागत आहे, असें त्याला वाटलें. **जोरावरसिंग** जवळ जाऊन पहातो तों सारा प्रकार खरा. दिवा लावून **जोरावरनें** त्याला पाणी देण्यासाठीं ओंठापाशीं नेलें तों तो व्यापारी गतप्राण झालेला आढळला.

“ विश्वासघाताचें फळ इतक्या लवकर मिळालें तुला ? नशिबवान् आहेस बेट्या ! ” **जोरावरसिंगनें** सारा प्रकार कधींच ताडला होता. म्हणूनच या बाजूस आज रात्रौ आपल्या खुणेच्या स्वराशिवाय कोणीहि फिरकायचें नाहीं, असें त्यानें मठांतल्या साऱ्या जणांस पंडितजींकडून सांगावयास लावलें होतें.

जोरावरसिंग तिथून उठून दुसऱ्या पाहुण्यांचा समाचार घ्यावयास गेला, तों तो दचकून चार पावलें मागेंच सरकला ! इतका तो देखावा भयानक होता. एका मोठ्या लांबलचक सुऱ्यानें त्यानें दोघांही जणांस मारून टाकलें होतें व तीं प्रेतें रक्तबंबाळ होऊन अस्ताव्यस्त पडलीं होतीं !

गेल्या आठवड्यांत मिळणी आणि वजाबाकी सारखीच झाली होती. एक विद्यार्थी बेपत्ता झाला आणि एक विद्यार्थिनी नवीन आली. पण आज तीन प्राणी यमसदनास चालते झाले आणि ते **सुंदोपसुंदाप्रमाणें** एकमेकांच्या कपटकारस्थानास बळी पडले होते.

**मथुरेच्या** पाहुण्यांची मिठाई शस्त्रेविक्या पाहुण्यास झोंबली. त्यानें ती बिनदिक्कत खाल्ली होती आणि व्यापारी पाहुण्यांचीं शस्त्रें बर्फीवाल्या पाहुण्यांच्या गळ्यास भिडलीं. पण हे तिघेहिजण **पंडितजी** व **शिवशर्मा** आणि साधल्यास **जोरावरसिंग** यास मारण्यास आलेले होते व ही गोष्ट त्या धूर्त **जोरावरनें** व **पंडितजींनें** पहिल्याच फटकाऱ्यास ओळखली होती. शेवटीं त्यांचा अंदाज खरा ठरला आणि परस्पर कांट्यानें कांटा निघाला. निरनिराळ्या ठिकाणच्या ब्राह्मणांनीं पैसे चारून पाठविलेले मारेकरी मरून पडले आणि पंडितजींनीं **शिक्रीस** जाण्याचा आपला बेत नक्की केला. रात्रीं केलेल्या व्याख्यानानें **शिवशर्मा पंडितजींच्या** पूर्णपणें मुठींत आला होता. आतां फक्त आजच्या रात्रीचाच बेत त्यांना अशाच शिताफीनें पार पाडावयाचा होता.

**शिक्रीस** पोंचल्यावर सर्व थोर थोर लोक संध्याकाळच्या वेळीं बादशहाला भेटावयास आले. आज जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला होता. **इबादतखाना** उघडण्याचा समारंभ व्हावयाचा होता. **पंडितजींचें** धर्मांतरही आजच होऊन त्यांचें नवें नांव **शेखभावन** असें ठेवण्यांत आलें होतें. आतां ते पंडितजी राहिले नव्हते. ते आतां पंडितजींचे शेख बनले होते, आणि **विश्वंभरशास्त्री** हें त्यांचें जुनें नांव जाऊन त्याचे ऐवजीं **भावन** ऊर्फ **जिहोन** असें नवें नामाभिधान त्यांस प्राप्त झालें होतें. आपल्या आयुष्यांत आज एक भयंकर क्रांति झाली असें त्यांस वाटत होतें. पण ते शांत आणि गंभीर होते. त्यांची मुद्रा निर्विकार होती. काय करावयाचें तें बरेच दिवस ठरवून पूर्ण विचार करूनच त्यांनीं केलें होतें. बरेचसे सरदार व मानकरी त्यांचें अभिनंदन करीत होते व त्यांनाही सर्वांशीं बोलण्यांत पुरे जीव होऊन जात होता. बादशहाला सलाम करून ते आलेच होते. धर्मसभेचे सभासद त्यांना करण्यांत आलें होतें, हीही एक विशेष अभिमानास्पद अशी गोष्ट झाली होती.

बादशहानें सर्वांस निरोप दिले. पण **बदाउनी, शिरहिंदी** या दोघांना आणि दोघां नोकरांना त्यानें रात्रीं बाहेर फिरावयास जाण्याकरितां तयार रहावयास सांगितलें; व घोडे तयार ठेवावयास फर्माविलें. ते दोघे कांकूं करीत होते पण बादशहाची आज्ञा अमान्य करणें अशक्य होतें. **बदाउनीला** तर हा विशेष मानाचा प्रसंग वाटला. **शिरहिंदी** असेपर्यंत त्यानें त्याच्यासारखाच नकार दिला होता, पण तो गेल्यावर आपण येणारच असेंहि त्यानें सांगितलें. **शिरहिंदीनें** मात्र नाइलाजास्तव येण्याचें कबूल केलें होतें.

रात्र पडल्यावर चार पांच घोडेस्वार **शिक्रीहून दिल्लीस** जावयास निघाले. ठिकठिकाणीं बादशहा उंच मान करून दूरच्या अंतरावर पहात असे. त्याची ही चळवळ बराच वेळपर्यंत त्याच्या बरोबरच्या दोघांच्या लक्ष्यांत आली नव्हती. आज बादशहा आपणास रात्रींच्या वेळीं पुन्हा **दिल्लीसच** नेत आहे कीं काय आणि नेत असल्यास तो कशासाठीं नेत असावा, याबद्दलचेच विचार त्यांच्या मनांत घोळत होते. कोणाचेंच एकमेकाशीं बोलणें होत नव्हतें. आजचा दिवसच सारा चमत्कारिक प्रकारांनीं उगवला होता आणि तो तसाच चमत्कारिक प्रकारांनीं संपणार होता असें त्यांना वाटलें. त्यांचे घोडे जोरानें दौडत होते, ते सावकाश चालत नव्हते. आपल्याला आज कांहीं तरी अद्भुत प्रकार पहावयास मिळणार असा त्यांचा तर्क होता. बऱ्याचशा वेळानें ते एका ओळखीच्या जागीं आले. ती ओळखीची जागा आपल्यांही पूर्ण परिचयाची आहे. **हा विश्वंभरस्वामींचा** मठ. आज हा **विश्वंभरस्वामींचा** असें मात्र आपल्याला म्हणतां येणार नाहीं. या मठाचे अधिपति आतां **शिवशर्मा.**

मठांत येतांच बादशहा खालीं उतरले. त्यांस सर्वांनीं खडी ताजीम दिली. बादशहांच्या मागोमाग **बदाउनी** आणि **शिरहिंदी** हे दोघेही पटापट उड्या टाकून खालीं उतरले. या मठांत आतां **विश्वंभरशास्त्री** नव्हते.

या मठाला आतांपर्यंत आपण मठ म्हणत आलों खरें; पण तें म्हणणें मात्र गैर आहे. कारण **विश्वंभरशास्त्र्यांनीं** या ठिकाणीं एक देवालय स्थापन केलें आणि प्रवचन, पूजा, पारायण, असले प्रकार सुरू केले. संस्कृत विद्या शिकण्यासाठीं त्यांच्याकडे लोक येऊं लागले म्हणून त्यांच्या या संस्थेस पाठशाळेचें स्वरूप येऊन चवथा 'प'कार प्राप्त झाला. तथापि हें स्थळ कांहीं मठ या संज्ञेस योग्य नव्हतें. तथापि त्या काळीं क्षेत्रांक्षेत्रांच्या ठिकाणीं हीं कामें मठांत होत असत; म्हणून याहि स्थानास मठ म्हणण्यांत येऊं लागलें व तें नांव कुणीहि आक्षेप न घेतल्यामुळें तसेंच अव्याहत चालू राहिलें. एवंगुणविशिष्ट अशा या नांवाच्या मठांत आज मठपति असे कोणी नव्हतेच. तसें मानलें तर **शिवशर्मा** आज **विश्वंभर**शास्त्र्यांच्या जागीं होते; पण ते या वेळीं पुढें आले नव्हते. त्यांच्या ऐवजीं **जोरावरसिंगच** बादशहांच्या स्वागतासाठीं पुढें आले होते. मठांतली कांहीं मंडळी **विश्वंभर**शास्त्र्यांबरोबर **शिक्रीला** गेली होती, तर कांहीं शहरांत कामकाजानिमित्त होती.

बादशहा उतरले व ते **जोरावरसिंगा**च्या बरोबर मठांतील एका खोलीकडे गेले. तेथें **जोरावरसिंग** आणि **बादशहा** यांचें कांहीं बोलणें झालें. त्या खोलींत त्यांच्या हेरांचा नाईक **अबदुल्लाखान** पूर्वींच येऊन त्यांची वाट पहात राहिला होतासें दिसलें. त्या तिघांचें फार हलक्या आवाजांत कांहीं खलबत झालें. **जोरावरसिंगानें** स्वतः निराळा पोषाख केला व तसलेच कपडे बादशहाला दिले. बादशहांनीं तो पोषाख चढविला. **अबदुल्लाखानानें**हि चढविला; आणि तो **शिरहिंदी** व **बदाउनी** यांस बोलवावयास गेला. **अबदुल्लाच्या** मागून ते दोघे त्या खोलींत आले व त्या ठिकाणीं बादशहाचें वेषांतर पाहून ते दोघे थक्क होऊन गेले. त्यांना देण्यांत आलेला वेष बादशहाच्या खुणेवरून त्यानेंहि निमूटपणें चढविला. त्याबरोबर ते सारे अगडबंब अक्राळविक्राळ मारेकरी दिसूं लागले! **बदाउनी** आणि **शिरहिंदी** हे विस्मयातिशयानें जागच्या जागीं खिळल्यासारखे झाले होते. बादशहा आज आपल्याला कोणत्या तरी रहस्यांत नेत आहे, असें त्यांना वाटत होतें. ते त्याच्या खुणेप्रमाणें यंत्रासारखे वागत होते. त्या ठिकाणींच सर्वांचे घोडे ठेवण्यांत आले होते. बादशहानें आंत उतरतांना बाहेर ऐकूं येण्यासारख्या आवाजांत **जोरावर** व **अबदुल्ला** यांना एकच प्रश्न विचारला होता.

" येथें कोणी परकें माणूस नाहीं ना? "

" नाहीं. काल झालेल्या तीन खुनांमुळें या स्थानाविषयीं भीतिकारक बातमी पसरावयास आम्हांला आयतीच संधि मिळाली. त्या पडत्या फळाची आज्ञा घेऊन सगळे लोक निघून गेले आहेत—म्हणजे त्यांना घालवून दिले आहेत. फक्त शिवशर्मा त्या दुसऱ्या बाजूस एका खोलींत आहेत. "

एवढेंच प्रश्नोत्तर त्या दोघां मुत्सद्यांस ऐकूं गेलें होतें. एवढ्यावरून त्यांना बोध तो कसला होणार? ते दोघे **बादशहाच्या** मागून व **बादशहा जोरावर-अबदुल्लाच्या** मागून अशी ती मंडळी रात्रीच्या काळोखांतून चालूं झाली. आणि आड वाटेनें अनेक वळणें घेत जाऊं लागली.

पडक्या घराकडे आल्यावर त्या दोघां वाटाड्यांला आणखी एक माणूस भेटला. त्याची इशारत मिळतांच ते सगळेजण भुयारांत उतरले. या भुयारांत उतरल्यावर तर त्या दोघां मुत्सद्यांस आणखीहि थोडी भीति वाटली. तथापि ते हूं कीं चूं केल्याशिवाय चालले होते. **बादशहानें** त्यांना आपल्या इशारतीप्रमाणें वागावयास सांगितलें होतें. कांहीं वेळानें त्यांना एक दरवाजा लागला. तेथून वरती जावयास जिना होता. जिन्याच्या तळास एक लहानसा दिवा मिणमिणत होता. वरती चाललेली गडबड या ठिकाणाहून चांगलीच ऐकूं येत होती. इतक्यांत " हुसेन " म्हणून मारलेली हांक त्यांना ऐकूं आली; **जोरावर**ला इषारा मिळाला. **जोरावर**च्या मागून ते चौघे असामी वरती चढूं लागले.

त्यांना एक भयंकर किंकाळी ऐकूं आली. सर्वांचें काळीज थरारलें. कारण ती

किंकाळी तशीच हृदयभेदक होती! जिन्याच्या टोंकास चढून जातांच पुढील शब्द त्यांच्या कानावर आले.

" चल आज तुझा शेवटचा दिवस. आज तुझी मुदत भरली. आज माझ्या म्हणण्याप्रमाणें मी करणार. राजवाड्यांत तूं राण्यांना कांहीं तरी सांगून माझी बेअब्रू केली असशील. पण आज येथें तुझ्या किंकाळीला धांवून यावयाला कोणीएक नाहीं. मेल्यासारखी पडून रहा. धडपड करशील, तर कोल्ह्याकुत्र्यांकडून खावबीन. "

असें बोलून मदिरापानानें मत्त झालेला **जलालुद्दीन** अगदीं खंगून क्षीण झालेल्या सतीवर झडप घालावयास गेला. वरती चढून आलेले लोक इशाऱ्याप्रमाणें आड बाजूस राहिलेले होते. **हुसेन** व त्याच्या हाताखालचे एकदोन नोकर आजूबाजूस होते.

" **हुसेन**! त्या लोकांना बोलाविलें आहेस ना? "

" लोक खालीं आले आहेत. "

" त्यांना तयार रहायला सांग. माझी प्रतिज्ञा मी पुरी केल्याशिवाय राहणार नाहीं. जा तूं जरा बाजूस रहा. दार लोटून घे. मी हांक मारतांच ये. "

त्याप्रमाणें **हुसेन** बाजूस गेला. त्यानें दार लावून घेतलें. वर चढून आलेले लोक हा सारा प्रकार पाहून चकित झाले. **हुसेन** बाहेर जातांच **जलालुद्दीननें** सतीवर झडप घालून तिचा हात पकडला, आणि तिला जमिनीवर लोटली!

त्याबरोबर तिनें प्राणांताची एक किंकाळी मारली.

" दूर हो मेल्या चांडाळा! मेल्यावर देखील माझ्या हड्डीला तुझा स्पर्श होऊं देणार नाहीं, तो जिवंतपणीं कुठला? "

असें म्हणून तिनें लपवून ठेविलेल्या सुऱ्यानें त्याच्या दंडावर एक जोराचा वार केला. त्याबरोबर घायाळ होऊन कोकलतच तो बाजूला पडला. त्यानें **हुसेनला** एक हांक मारली. हुसेन घाईनें धांवतच आंत गेला.

" **हुसेन!** त्या मारेकऱ्यांकडून ह्या चांडाळणीचा शिरच्छेद करायला सांग. तूं त्यांच्याबरोबर जा. चांडाळणीनें मला जखम केली. जा. आणि एक माणूस आतांच हकीमसाहेबाकडे पाठव. त्यांना आतांच बोलावून आणव. ते मागतील तें बक्षीस त्यांना दे. बातमी गुप्त ठेवायला सांग. **बादशहा** नसला, तरी त्या **अबदुल्ल्याचा** नेम नाहीं. तो एक चांडाळ मुसलमानांच्या नांवाला काळोखी फांसायला जन्मला आहे, त्या **बादशहा**सारखाच.

" पण हुजूर! ते मारेकरी आपल्या गळ्यांतली मोत्यांची माळ मागतात बक्षिशी-कारितां. " **हुसेन** म्हणाला.

" ही नेऊन दे त्यांना, पण सांगितलेलें सगळें झटपट आटोप आणि दोन माणसांना इकडे वरती पाठवून दे. "

सती मूर्च्छित पडली होती. **जोरावरसिंग** व त्याच्या साथीदारांना भराभर

उतरावें लागलें. **हुसेननें** आपल्या एका माणसाला **जोरावर**च्याबरोबर जावयास सांगितलें.

"हुसेन, पण त्या मारेकऱ्यांना मला एकवार बघूं दे. इकडे आण माझ्या-समोर त्यांना."

**हुसेननें** मारेकऱ्यांना **जलालुद्दिना**च्या समोर नेलें. त्यानें त्यांच्याकडे एकवार पाहिलें, आणि म्हणाला—

"तुमचें बक्षीस तुम्हांला दिलें आहे. त्या चांडाळणीला नेऊन पुरून, गाडून टाका आणि आपलें बक्षीस या हुसेनजवळून घेऊन जा. मात्र या गोष्टीचा उच्चार कोठेंहि करूं नका. जा."

त्यांनीं मानेनेंच होकार दर्शविला आणि ते निघून गेले. सतीला खालीं नेलेलीच होती. भुयाराच्याच मार्गानें ती मंडळी आल्या वाटेन चालूं लागली. त्या मारेकऱ्यां-पैकीं एक मात्र **जलालुद्दीना**च्या समोर आला नव्हता. तो सतीच्याबरोबर पुढें चालला होता. दोन माणसें येऊन जलालुद्दिनाची परिचर्या करूं लागलीं होतीं. जखम बांधीत असतां त्याला वेदना होत होत्या. रक्तस्राव फार झाल्यानें व मोठ्यानें बोलण्याच्या श्रमानें त्याला ग्लानि आली व तो मूर्च्छित होऊन पडला.

सतीला **विश्वंभरशास्त्री** यांच्या मठांत नेऊन ठेवण्यांत आल्यावर तिला सावध करण्यांत आलें. त्या सर्व मंडळींनीं आपला पोषाख पुन्हां बदलला. **जोरावर-सिंगनें शिवशर्म्याला** बोलावून आणलें. त्यांच्या **बादशहाशीं** कांहीं कानगोष्टी झाल्या. **जोरावरसिंग** आणि **शिवशर्मा** हें **पंडितजींचे** कट्टे अनुयायी आहेत हें **बादशहाला** ठाऊक होतें. **बदाउनी** आणि **शिरहिंदी** यांना हा प्रकार स्वप्नवत् वाटत होता; त्यांचें मस्तक पाहिलेल्या प्रकारानें फिरून जाण्याची वेळ आली होती. फिरून त्यांनीं आपापला पूर्वींचा पोषाख चढविल्यावर ते आपापल्या घोड्यांवर बसून चालते झाले. विचारा **जलालुद्दीन** मात्र आपल्या बिछान्यांत कण्हत पडला होता. तथापि दुसऱ्या दिवशींची सकाळ कोणत्या प्रकारची येणार याची त्याला काय माहिती?

सती सावध झाल्यावर तिनें डोळे उघडून पाहिलें. आपल्याशेजारीं आपला दीर **जोरावरसिंग** बसलेला तिला दिसला. त्यानें तिला कांहींहि न बोलण्याविषयीं खूण केली. फार दिवसांची तिची इच्छा उद्यांच पुरी होईल, अशी त्यानें तिला खात्री दिली. तिच्या सती जाण्याची सर्व तयारी सिद्ध करण्यांत आल्याची आनंद-दायक हकीगत तिला कळतांच तशाहि स्थितींत तिला अत्यंत आनंद झाला.

मठांतून बाहेर पडल्यावर **बादशहानें** आपल्या बरोबरच्या सर्वांस कुराणावर हात ठेवून पाहिलेला प्रकार कोठेंहि न बोलण्याची शपथ करविली व ती सर्वांनीं केल्या-वर ते **शिक्रीला** चालते झाले. पाहिलेला प्रकार याचा अर्थ एवढाच कीं, **बादशहा** आपल्याबरोबर अमुक अशा प्रकारें अमुक ठिकाणीं गेले हा आणि न बोलणें म्हणजे बादशहाच्या हयातीपर्यंत न बोलणें एवढाच घ्यावयाचा होता. त्या सर्वांनीं ती अट शपथविधि केल्याप्रमाणें अक्षरशः पाळली. आतां त्यांना पहांटेपूर्वीं सरासरी २०।२२ मैलांची दौड पुन्हां करावयाची होती.

---

# प्रकरण अठरावें.

## दरबार बरखास्त !

इबादतखाना उघडण्याचा समारंभ होऊन **अकबर** बादशहाची **शिक्रींतील** पहिली धर्मपरिषद् भरली. सर्व धर्मांत प्राचीन धर्म कोणता याविषयीं चर्चा सुरू झाली. त्या चर्चेंत आर्यधर्म सर्व धर्मांत प्राचीनतम असल्याचें ठरलें.

त्यानंतर आणखी दोन तीन प्रश्न निर्णयाकरितां पुढें आलेले होते. त्यांतील एक प्रश्न असा कीं—

( १ ) पृथ्वी मनुष्यवस्तीस योग्य झाल्यानंतर पहिल्यानें मनुष्यवस्ती पृथ्वीच्या कोणत्या भागावर झाली व ती कोणत्या लोकांची ? आणि दुसरा असा कीं—

( २ ) मनुष्यप्राण्यानें पहिले शब्द जे उच्चारले असतील ते कोणत्या भाषेंतील असावेत ?

या दोन महत्त्वाच्या मुद्यांसंबंधीं चर्चा होत असतां तिसरा एक प्रश्न उपस्थित झाला तो असा कीं,

( ३ ) प्रत्येक मनुष्यप्राणी जन्माला आल्याबरोबर त्याचा कोणत्या तरी एका धर्माकडे जन्मतःच कल असतोच, ही भावना खरी आहे कीं काय ?

हे प्रश्न चर्चेला निघाले आणि त्यांच्यावर तुंबळ वाग्युद्ध माजलें. हिंदु पंडित म्हणत होते कीं, पहिली मनुष्यवस्ती आर्यावर्तांत झाली; आणि संस्कृत भाषा ही सर्व भाषांची आद्य जननी आहे. या आपल्या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ त्यांनीं दिलेलीं प्रमाणें कोणालाहि खोडून काढतां आलीं नाहींत. त्यांत त्यांनीं साधार मुद्दे मांडले होते. निरनिराळ्या धर्मांचा व धर्मप्रवर्तकांचा कालनिर्णय केला. भूगर्भाचा भूस्तरशास्त्रांच्या नियमांचा विचार करून सिद्ध केले कीं, **हिमालयपर्वताजवळची** जागाच समुद्रपृष्ठाच्यावर प्रथम आली असली पाहिजे. कारण तितका उंच भाग पृथ्वीवर दुसरीकडे कोठेंहि नाहीं. एवंच, सर्व बाजूंनीं सांगोपांग विचार करून त्यांनीं आपली बाजू मांडली. **ख्रिस्तानुयायांनीं जेरुसलेमचें** महत्त्व गाइलें. **मुसलमान** पंडितांनीं **आरबी** भाषा सर्वांच्या पूर्वीची व श्रेष्ठ असा विवाद केला. **यहुदी** लोकांनीं **हिब्रू** भाषा सर्वांच्या पूर्वीची असें सिद्ध करण्यासाठीं लांबलचक भाषणें केलीं. तथापि या सगळ्या वाटाघाटींत वेदांचें प्राचीनत्व मात्र कोणासही खोडून काढतां आलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर आज आपण जें वैभव व ज्या सुधारणा पहात

आहोत, तसल्याच किंबहुना त्याहूनही जास्त सुधारणा वेदकालीं आर्यलोकांस माहीत होत्या असा हिंदु पंडितांचा मुद्दा देखील कोणास खोडून काढतां येणें शक्य नव्हतें. कारण वेदांच्या ऋचांत नौकानयनशास्त्र, शिल्पशास्त्र, प्राणिशास्त्र वगैरे शास्त्रांच्या मूलभूत तत्त्वांचा उल्लेखच होता व त्यांतल्या ऋचा स्पष्टपणें अर्थासहित बादशहापुढें मांडण्यांत आल्या होत्या. आजच्या वादविवादांत **शेखभावन** हिंदुपक्षालाच होते, ही गोष्ट सर्वांनाच आश्चर्य वाटण्यासारखी होती. त्यांनीं हिंदुधर्माची बाजू मांडण्यांत बराच पुढाकार घेतला होता.

या सर्व विवादामुळें हिंदूंचे वेद हस्तगत करून घेण्याची अकबराची जिज्ञासा शतपटीनें वृद्धिंगत झाली. त्याच बैठकीस त्यानें मनाचा निश्चय करून टाकिला कीं, ज्या वेदग्रंथांत या सर्व भौतिक सुधारणांचा उल्लेख आहे, ते वेदग्रंथ हरप्रयत्नानें मिळविल्याशिवाय रहावयाचेंच नाहीं. त्याकरितां त्यानें प्रयत्न कसा आरंभिला होता. हें पूर्वीं कळलेंच आहे.

आद्य भाषा कोणती या मुद्द्यावर झालेलें रणकंदन येथें समग्र लिहितां येणें अशक्य आहे. **झेंद, ग्रीक, लॅटिन्, फारशी, आरबी, हिब्रू** आणि **संस्कृत** या भाषांचें भांडण त्या ठिकाणीं जुंपलें होतें. शिवाय **हिंब्र, सिथियन, तुराणी** व **सामुद्रिक**, याही भाषांचा झगडा त्या ठिकाणीं चालला होता व तो ऐकायला बादशहाला मोठी मौज वाटत होती.

हा वाद वाढतां वाढतां शेवटीं असा निष्कर्ष निघाला व तोही हिंदु पंडितांनींच काढला कीं, समाजाच्या बाल्यावस्थेंत जे नित्य व्यवहाराचे शब्द सर्वत्र प्रचारांत असण्याचा जास्त संभव आहे, ते शब्द पर्यायरूपानें अथवा अप्रत्यक्षरूपानें ज्या निरनिराळ्या भाषांत आढळून येतील त्या भाषांस समान शाखा अथवा कन्या म्हणजे परस्परांच्या बहिणी मानावयास हरकत नसावी; आणि अशा शब्दांचें मूळरूप, म्हणजे खरें, शुद्धस्वरूप ज्या भाषेंत आढळेल, इतकेंच नव्हे, तर त्या भाषेशिवाय उपरोक्त शब्दांची मीमांसा अगर व्युत्पत्ति जर अन्य कोणत्याहि भाषेंत करावयास अवकाशच रहात नसेल तर, ती भाषा मूळभाषा, बीजभाषा अथवा मायभाषा मानण्यास हरकत असूं नये. तीच भाषा सर्व भाषांची आद्य जननी मानावयाची. हा मुद्दा अगदीं बिनतोड होता.

समाजाची बाल्यावस्था आणि व्यक्तीची बाल्यावस्था यांत फारसा फरक नसतो. आई, बाप हे दोन शब्द प्रत्येक बालक प्रथम उच्चारावयास लागतें. उदाहरणाकरितां हे दोनच शब्द जरी घेतले तरी ते दोन्ही शब्द सर्व भाषांत एका संस्कृत भाषेंतील तद्वाचक शब्दांचींच रूपें असल्याचें आढळून येतें.

| **मराठी,** | **संस्कृत,** | **हिंदी,** | **झेंद,** | **ग्रीक,** | **लॅटिन,** | **द्राविडी,** |
|---|---|---|---|---|---|---|
| **आई,** | **मातर** | **मा** | **मातर** | **मीटीर,** | **मेटर** | **अम्मा, अंबा.** |
| **बाप** | **पितर** | **बाप** | **पतर** | **पटीर** | **पेटर** | **अप्पा** |
| **आई** | **तिबेटी, हिब्रू** | | | | | |
| | **बोत्म** | **एम्** | **हम्म** | | | |
| **बाप** | **बोत्प** | **एफ्.** | | | | |

वर दर्शविल्याप्रमाणें शब्दव्युत्पत्ति बहुतेक शब्दांची सांगून जवळच्या नात्यांचे निदर्शक शब्द, कांहीं धातु व अनेक मुख्य महत्त्वाचे शब्द यांचें शुद्धस्वरूप **संस्कृतांतच** कसें सांपडतें हें पाहिल्यावर अकबरबादशहाची **संस्कृत** भाषाच मूळभाषा असल्याची खात्री झाली. तथापि त्यानें इतरांस आपापली बाजू निःसंकोचपणें पुढें मांडण्यास परवानगी दिली.

एक उठून म्हणतो—" परमेश्वर हा आदामजवळ **स्वीडिश** भाषेंत बोलला असून **आदामनें** त्याला **डॅनिश** भाषेंत प्रत्युत्तर दिलें; परंतु **सर्पानें** मात्र **ईव्हबरोबर फ्रेंच** भाषेंतच भाषण केलें ! "

दुसरे एक मुल्ला उठून म्हणाले—

" ईश्वराच्या नंदनवनांत **गॅब्राएल तुर्की** भाषेंत प्रथम बोलला. **आदाम** आणि **ईव्ह** फारशी भाषेंत बोललीं; व **सर्प आरबी** भाषेंत बोलत होता ! "

तिसरा एक म्हणाला—

" **आदम** हा **बास्क** भाषेंत बोलत होता. "

इतक्यांत काळाकुट्ट झगा पेहरलेला एक **पाद्री** उठला व तो म्हणाला—

" आमच्या **येशू खिस्ताच्या बायबलांत** पृथ्वीवरील सर्व मानवी प्राण्यांची एकच भाषा आरंभीं असल्यांबद्दल म्हटलें आहे. ही भाषा **ग्रीक** असावी असें मला वाटतें. **ग्रीक** नसेल तर दुसरी कोणती हें येथील विद्वानांनीं ठरवावें. पण तिघांच्या तीन भाषा होत्या हें मला साफ नाकबूल आहे व व्यावहारिकदृष्ट्याही तें हास्यास्पद व अशक्यप्राय दिसतें. एके ठिकाणीं जमून बोलणारीं तीन माणसें तीन भाषांत भाषण करतील हें म्हणणेंच मुळीं पोरकट आहे ! "

या बोलण्यावर बऱ्याच पंडितांस चीड आली. बादशहा मात्र ही गंमत पाहून गालांतल्या गालांत हांसत होता. बरेच वक्ते त्या पाद्र्यावर तुटून पडणार तोंच आणखी एक वक्ता उठला व म्हणाला—

" **आफ्रिकाखंडांत उत्तर आफ्रिकेंत हबशी** भाषा चालू आहे व **दक्षिण आफ्रिकेंत काफीरी** भाषा बोलतात. ही काफीर भाषाच मानवी प्राण्यांची आदिभाषा असल्याबद्दल माझें ठाम मत आहे. "

हें या शिष्टाचें " ठाम मत " ऐकून सर्वच सभासद गारीगार झाले ! त्यांनीं त्याला वेड्यांतच काढलें. इतक्यांत आणखी एकजण उठले. ह्यांनीं बोलतांना अगदीं निःपक्षपातित्वाचा आव आणला होता व मधूनमधून हे शेखभावन व हिंदुपंडित यांचेकडे डोळे मिचकावून पहात होते.

" सभासद हो ! मला वाटतें कीं आद्य जननी **संस्कृत** भाषाच आहे हें निःसंशय. पण **संस्कृत**भाषा मूळची ह्या हिंदुस्थानांतली मात्र नव्हे. ती मूळची मिसर देशांतली असून तिचा भरतखंडांत प्रवेश **ऑसिरिस्** यानें केला असा मला

दाखला मिळालेला आहे. ग्रीक भाषा ही या संस्कृतपासून उत्पन्न झालेलीच एक लहानशी शाखा होय, हेंहि सांगावयास मला संकोच वाटत नाहीं. "

हे पंडित खालीं बसतांच पाद्रीसाहेब त्यांच्याकडे रातांब्यासारखे डोळे करून पाहूं लागले !

हिंदु पंडितांनीं भारतीय लोकच प्राचीनकालीं आपली संस्कृति घेऊन मिसर देशांत गेले असल्याचें साधार सिद्ध करून दाखविलें. त्याबरोबर पुन्हां जिकडेतिकडे शांतता झाली. तथापि लोकांच्या मनाची तळमळ शांत झाली नव्हती. **संस्कृत** भाषा सर्व भाषांची आद्य जननी हें कबूल करण्यास सर्वच सभासद तयार नव्हते.

त्यांचा अशा प्रकारचा तत्त्ववाद चालला आहे तोंच बाहेर अनेक भाषांचे व धर्मांचे लोक जमा होऊं लागले व त्यांच्या येरझारा दरबारच्या आजूबाजूस सुरूं झाल्या. सभासदांना तें पाहून नवल वाटलें. कारण तत्त्वविवरणाच्या सभांना इतर लोकांना हजर रहाण्याची सक्त मनाई होती. आज हे अनेक लोक धर्मविवेचन सभेंत कशाला जमा झाले आहेत, हें त्यांना समजेना. राज्यांतील लोकांच्या तक्रारी ऐकून घेण्याचा बादशहाचा रोजचा दरबार असे. अर्थात् तक्रार करणारे अगर न्याय मागणारे लोक या वेळीं या ठिकाणीं जमा होणें शक्य नव्हतें. पण बादशहानें या लोकांना या ठिकाणीं या वेळीं मुद्दामच बोलाविलें होतें.

आतां वादविवाद बहुतेक बंद झालाच होता. खुद्द बादशहा सर्व वादाचा समारोप कसा काय करतात, इकडे सर्व सभासदांचें लक्ष लागलेलें होतें. दरम्यान बाहेर लोक जमलेले होते व त्यांची थोडथोडी गडबड सुरूं होत होती. बादशहांनीं बाहेर जमलेल्या लोकांस आंत येऊन उभें राहण्यास सांगावयास आज्ञा केली.

आज्ञेप्रमाणें लोक आंत आले, तेव्हां आंतील व बाहेरील लोकांस आज कांहींतरी नवीन प्रकार घडावयाचा आहे असें साहजिकच अनुमान करावें लागलें. वास्तविक प्रकार तसाच होता.

सर्व शांत झाल्यावर **बादशहा** बोलूं लागले—

" आतांपर्यंतचा सारा वादविवाद आम्ही ऐकून घेतला. अशा प्रकारचा विषय यापूर्वी एकवार सभेंत घेण्यांत आला होता. पण त्या वेळीं निर्णय असा कांहींच करतां आला नव्हता. आतांही कांहीं निर्णय झालेला नाहींच. तरीही **संस्कृत** भाषाच सर्वांत जुनी व प्राचीनतम असावी असें पुढें आलेल्या पुराव्यावरून मानावेंसें वाटतें. "

हे शब्द ऐकून पुष्कळांच्या कपाळांस आंठ्या पडूं लागल्या व थकल्या दमल्या लोकांच्या सुस्काऱ्यांसारखे सुस्कारे सुटत असल्याचा ध्वनि सभागृहांत निघूं लागला. बादशहांचें भाषण पुढें सुरूं झालें.

" तथापि या गोष्टीचा कायमचा निर्णय करण्याचा एक उपाय आमच्या मनांत आज बरेच दिवस घोळत आहे व त्या विचारानुरूप प्रयोग करून पहाण्याचें आम्ही ठरविलेंही आहे. आम्ही कांहीं दिवसापूर्वी राज्यांत जी घोषणा करविली, ती बऱ्याच लोकांस विचित्र वाटली व कांहीं लोक तर उगीच्या उगीच भीतीनें गांगरून गेले असल्याचें समजतें. आमच्या घोषणेचा अर्थ भलताच करून कांहीं अधिकाऱ्यांनीं लोकांस गरोदर व तरुण स्त्रियांस जुलमानें पकडून आणल्याचेंही निदर्शनास आलें आहे. आज आतां बाहेर जमलेली मंडळी अशाच अर्जदार लोकांपैकीं आहेत व कांहीं लोक आमच्या घोषणेचा उद्देश जाणून घेण्याकरितां जमा झालेले आहेत. आमच्या त्या घोषणेचें कोडें आमच्या विद्वन्मंडळास देखील कदाचित् समजलें नसेल, कारण आम्ही तो हेतु कोणासच कळूं दिला नव्हता, तथापि आज आम्ही तो आतां या सभेंत जाहीर करीत आहोंत. "

असें म्हणून बादशहा किंचित्काळ थांबले व त्यांनीं सभोंवार नजर फेंकली. सारे लोक त्यांचे शब्द ऐकावयास एकाग्र चित्तानें ध्यान लावून निस्तब्ध बसले होते.

" आम्ही थोडक्याच अवधींत बाळंत होण्यासारख्या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या व निरनिराळ्या धर्मांच्या गरोदर स्त्रिया सन्मानपूर्वक बोलाविल्या आहेत. जबरदस्तीनें अगर जुलुमानें नव्हेत. त्यांच्या रिवाजाच्याविरुद्ध कोणतीही गोष्ट आचरणांत यावयाची नाहीं. त्यांची बाळंतपणाची व्यवस्था आम्ही नवीन तयार केलेल्या सूतिकागृहांत करण्यांत यावयाची आहे व ती आमच्या मातृतुल्या मामानागासाहेब यांच्या खास देखरेखीखालीं करण्यांत येईल. त्यांच्या धर्मास अगर जीवितास अगर त्यांच्या बालकांस कोणत्याहि प्रकारचा अपाय करण्यांत यावयाचा नाहीं. याबद्दल सर्वांनीं निर्धास्त रहावें. "

हे शब्द ऐकून लोकांचे भीतिग्रस्त चेहरे समाधानयुक्त दिसूं लागले; पण ते अद्याप सोत्सुक होते, कारण या सर्व लांब्या कारभाराशीं सम्राटांचा संबंध काय व त्यांत यांचा हेतु काय, तो अद्याप बादशहांच्या भाषणांत आलेला नव्हता व लोकांस आधीं निर्भय करून मागाहून तो कळवावयाचा बादशहांचा इरादा असल्यामुळें त्यांनीं तो मुद्दामच मागें ठेविलेला होता. लोकांच्या चेहऱ्यांवरून त्यांचें अंतरंग ओळखण्यांत बादशहा कांहीं नवखे नव्हते. ते म्हणाले—

" या बाळंतिणी बाळंत झाल्यावर त्यांच्या मुलांशीं त्यांच्या आयांनीं अगर दायांनीं अगर परिचारिकांनीं कोणत्याहि भाषेंतलें एकही अवाक्षर उच्चारतां कामा नये. हा नियम प्रत्येकानें पाळलाच पाहिजे. या नियमाचा अंमल मात्र सक्त व सक्तीनें करण्यांत येईल. या नियमाप्रमाणें चालणाऱ्यांना बक्षीस मिळेल. उलट या नियमाचें उल्लंघन करणाऱ्यांना कडक शासन करण्यांत येईल. सूतिकागृहांतलें व त्यानंतरचे सर्व व्यवहार नुसत्या खुणांनीं व्हावयाचे आहेत. कसल्याही भाषेचें कोणीहि

एक अक्षर त्या ठिकाणीं तर बोलावयाचें नाहींच; पण जन्मलेल्या मुलांना ऐकूं येईल अशा प्रकारें किंवा इतक्या अंतरावर देखील उच्चारावयाचें नाहीं. ''

जमलेली मंडळी कांहींशी सचिंत दिसूं लागली.

'' आईशिवाय राहतां येतील अशीं मुलें झालीं कीं त्या आयांना आपापल्या घरीं जातां येईल. त्यांची पाठवणी त्यांच्या त्यांच्या घरीं सन्मानपूर्वक करण्यांत येईल. मुलांना मात्र जन्मल्यापासून बारा वर्षेंपर्यंत वरील प्रकारें सांभाळून वाढविण्यांत येईल. त्यांचें पालनपोषण आम्ही जातीनें आमच्या नजरेखालीं करविणार आहोंत. या मुलांना त्यांच्या घरीं त्यांचीं आईबापें पाळतात तितक्याच काळजीनें व ममतेनें पाळण्यांत येईल. बारा वर्षांनंतर या सर्व मुलांना त्यांच्या त्यांच्या आईबापांच्या घरीं आनंदानें पोंचविण्यांत येईल. ''

बरेच लोक निर्भय झाले.

'' आतां हा चमत्कारिक प्रकार करण्यांत आमचा हेतु काय असा विचार आमच्या साऱ्याच प्रजेला पडलेला आहे, तो आतां सांगतों. मूल जन्माला आल्याबरोबर प्रथम अक्षर, शब्द अथवा उच्चार कोणत्या भाषेंत काढतें हें पाहण्याचा आमचा हेतु आहे. आमच्या विद्वत्सभेंत याबद्दल आज कित्येक दिवस वादविवाद चालले आहेत; पण निर्णय कांहींच होत नाहीं. यासाठीं आजपासून बारा वर्षेंपर्यंत आतां हा विषय चर्चेला घ्यावयाचा नाहीं. बारा वर्षांनंतर याचा निकाल काय होतो, तो आपोआपच सर्वांस समजेल. याच हेतूच्या पूर्ततेसाठीं मुलाच्या समक्ष कोणीहि कसलाही शब्द न उच्चारण्याचा कडक नियम योजण्यांत आलेला आहे. सगळे व्यवहार मूकपणें खुणांनीं करावे लागतील. आम्हांला या प्रयोगाकरितां फक्त वीस मुलें पाहिजेत. यासाठीं सरासरी पंचवीस गरोदर स्त्रिया सूतिकागृहांत ठेवावयाच्या आहेत. अशा प्रकारें रहावयास कबूल असलेल्या स्त्रियांना, त्यांच्या होणाऱ्या मुलांना व त्यांच्या कुटुंबांना सरकारांतून मोठमोठ्या देणग्या देण्यांत येतील. कबूल नसलेल्यांना जुलमानें ठेवण्यांत येणार नाहीं. सर्व भाषा बोलणाऱ्या निरनिराळ्या प्रत्येक भाषेच्या दोन दोन स्त्रिया पाहिजेत. कबूल असलेल्यांनीं रहावें. बाकीच्यांनीं निघून जावें. या हुकुमाच्या बजावणीच्या बाबतींत आमच्या अधिकाऱ्यांनीं कळून वा न कळून जुलूमजबरदस्ती केल्याच्या ज्या तक्रारी व अर्ज आमचेकडे आल्या आहेत, त्यांचा निकाल उद्यांच करून अपराध्यांस शासन करण्यांत येईल असें आश्वासन देतों. ''

इतकें भाषण करून बादशहा थांबले. सर्व लोक विस्मयचकित व आनंदभरित झाले. बादशहाकडे सिंहासनाच्या एका बाजूस युवराज व त्यांच्याबरोबर बाजूस एक पांचसहा वर्षांची कुमारिका बसली होती. चोपदार सभा बरखास्त झाल्याचें पुकारणार होता, इतक्यांत हुसेन धांवतच दरबारांत आला व तो नवीन नेमलेल्या कारभारी

साहेबांच्या कानास लागला. त्याबरोबर कारभारीसाहेबांची मुद्रा एकदम चिंताक्रांत झाली. त्यांना अतोनात दुःख झाल्याचें त्यांच्या मुद्रेवरून पहाणाऱ्यांस दिसलें. असला कोणता निरोप हुसेननें आणला असावा बरें? आणि तो ऐकून नव्या कारभाऱ्यांस इतकें वाईट कां वाटावें? सभासद आतां सभास्थान सोडण्यास फार उत्सुक झाले होते. पण दरबार खलास होण्याची आतां त्यांना आशा वाटेना. वास्तविक धर्मसभेचा दरबार आज राज्यव्यवस्थेचा न्यायदरबार होणार कीं काय, असेंच प्रत्येक सभासदाला वाटत होतें.

कारभारीसाहेब आतां उठणार, तोंच बादशहांच्या इशारतीवरून चोपदारानें "दरबार बरखास्त" ची पुकारणी केली आणि कारभारीसाहेब पुढें जाऊन कुर्निसात करतात न करतात तोंच बादशहांची स्वारी उठून चालतीही झाली. कारभारीसाहेबांना या गोष्टीचा विषाद वाटला. पण करतात काय बिचारे. त्यांना निमूटपणें खालीं मान घालून मागें परतावें लागलें!

---

# प्रकरण एकोणिसावें.

## सती गेली!

कारभारीसाहेबांची विनंति बादशहानें ऐकून घेतली नाहीं, याचें कारण ती विनंति कोणती असणार हें त्याला ठाऊक होतें. सभास्थानांत त्या विनंतीचा उल्लेख व्हावा असें बादशहास वाटत होतें. आणि कारभारीसाहेबांस देखील आपण सभेच्या वेळीं विनंति करावयास उठलों ही आपलीच चूक आहे असें वाटलें. पुष्कळसा विचार केल्यावर कारभारीसाहेबांचें संतप्त मन पुनः शांत झालें व ते बादशहासमोर जावयास पुनः योग्य संधीची वाट पहात बसले. त्यांना कोणती विनंति करावयाची होती, हें बादशहास आगाऊ धोरणानें कळलें होतें. त्याचप्रमाणें आमच्या धोरणी वाचकांसही कळणें अशक्य नाहीं.

कारभारीसाहेब आले ते **बदाउनीकडे** उतरले ही गोष्ट खरी. पण **बदाउनी** आणि **जलालुद्दीन** यांचा चांगलाच स्नेह होता आणि आस्ते आस्ते **जलालुद्दीन** व **इन्मनुद्दौला** यांचाही स्नेह जमला. कारभारीसाहेबांना **ग्यासुद्दीन बेग** म्हणत; पण त्यांचें खरें नांव **इन्मनुद्दौला** असें होतें.

पुढें पाठशाळेंत कारभारीसाहेबांची मुलगी आणि युवराज **सेलीम** यांची चांगलीच गट्टी जमली. **सेलीम** या मुलीला आपली खेळगडीण म्हणून नेहमीं

जवळ बाळगीत असे. कारभारीसाहेब व त्यांची दोस्त मंडळी यांना हा योग अपूर्व व फार फायदेशीर वाटला. हीच मुलगी पुढें "**नूरजहान**" या नांवानें **जहांगीरची** राणी झाली. तेव्हां तिला आपण आतांपासूनच **नूरजहान** म्हटलें तरी हरकत नाहीं. "**जगद्दीपिका**" ही संज्ञा सार्थ करण्यासारखेंच तिचें सौंदर्य बालपणापासून होतें. जलालुद्दीनचा नोकर हुसेन हा **बदाउनीकडे** जात येत असे व तो बहुधा **नूरजहानला** खेळायला व फिरावयालाही घेऊन जाई. पाठशाळेंत तो तिच्याबरोबर देखील जात असे. त्यामुळें हा हुसेन देखील सेलीमला पुढें पुढें आवडूं लागला. एकंदरींत कारभारीसाहेब आल्यापासून **बदाउनीपक्षा**च्या कारस्थानाला भावी यशस्वितेच्या नवीन हुरूपामुळें नवा रंग चढूं लागला. **बदाउनी, शिरहिंदी, जलालुद्दीन, इन्मनुद्दौला** प्रभृतींचें हें नवें मंडळ तयार होऊन त्यांनीं आपले प्रयत्न शिस्तीनें आंखण्याचें ठरविलें. **नूरजहान** व **सेलीम** यांच्या परस्परआकर्षणाच्या संबंधांत त्यांना आपल्या भविष्यकालीन यशस्वितेचें सूक्ष्म बीज दिसूं लागलें होतें. त्यांना **अकबराच्या** राज्यव्यवस्थेचें धोरण बिलकुल पसंत नव्हतें. पण अकबर कोणाच्या हातांतलें बाहुलें होण्यासारखा लेंचापेंचा नसल्यामुळें व सारासार विचारानें प्रत्येक कार्य करण्याच्या त्याच्या पद्धतीमुळें कोणाचेच छक्केपंजे त्याच्यापुढें चालत नसत. तेव्हां निदान युवराज तरी पूर्ण आपल्या कह्यांत कसा येईल, याची चिंता बदाउनीप्रभृति मंडळी करीत असत. कारभारीसाहेबांच्या आगमनानंतर त्यांची ही काळजी अंशतः तरी दूर झाल्यासारखी दिसत होती. **नूरजहानच्या** मैत्रीमुळें सेलीम मंत्रमुग्ध झाल्यासारखाच वागत असे. बापानें तिच्याशीं खेळण्यास आपणास आडकाठी करूं नये, म्हणून तो धूर्तपणानें सांगितलेला अभ्यास व नेमून दिलेलें काम मन लावून करूं लागला. अर्थात् अकबरालाही युवराजाच्या जीवनक्रमांत इष्ट असा फरक पडलेला पाहून व नूरजहान खरोखरच गोड मुलगी असल्यामुळें; नूरजहानला वाड्यांतच जनानखान्यांत ठेवून घ्यावी, असें वाटूं लागलें. तथापि आपल्या राण्यांला व मामानागाला कळवून त्यांची संमति घेतल्याशिवाय तो तसें करणार नव्हता.

आधल्या दिवशीं रात्रीं आपण जुळवून ठेवलेल्या बेताचा हा परिणाम झालेला आहे, हें **अकबरशहानें** हुसेन दृष्टीस पडल्याबरोबर तेव्हांच ताडलें. कारण रात्रीचा प्रकार मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें घडल्यानंतर सकाळीं **जलालुद्दीन**चे लोक पहातात तर **जलालुद्दीनच्या** वाड्याभोंवतीं सरकारी शिपायांचा पहारा आहे. वाड्यांतल्या लोकांना आंतबाहेर जातांना शिपायांना योग्य जाबजबाब द्यावा लागे. शिवाय खुद्द **जलालुद्दीनला** वाड्याच्या बाहेर पडावयाला सक्त मनाई होती!

**जलालुद्दिनाला** याचा अर्थच समजेना. पण त्याला या बाबतींत आपला मोठा अपमान झाला असें वाटलें. मधून मधून त्याला आपल्या कर्मांच्या कारवाईचा

सुगावा **बादशहास** लागला असावा असा बळकट संशय येऊं लागला. त्याची सर्व भिस्त हुसेनवर होती. गोष्टी बाहेर फुटल्या असतील तर त्या एकट्या हुसेनच्याच तोंडून. **हुसेनशिवाय** दुसऱ्या कोणाविषयीं अंदेशा घेण्यास त्यास जागाच नव्हती. आणि ती गोष्ट खरीच होती.

पण गोष्टी या थराला पोंचणार याचें स्वप्नही **हुसेनाला** यापूर्वी कळलें नव्हतें. उजाडल्याबरोबर आपल्या धन्याच्या रोषास आपण पात्र होणार, असें हुसेननें ओळखतांच तो त्यांतून सुटण्याच्या मार्गाचा विचार करूं लागला. धन्याचें वाटेल तें झालें तरी त्याची त्याला मुळींच काळजी नव्हती. **फैझीवर** नाहीं तर नाहीं, निदान **फाजलवर** झडप घालण्यास आपणास संधि कशी मिळेल याचा बेत त्याला बसवून ठेवावयाचा होता. आणि आपणास साह्य केल्यास आपण तो मार्ग सुचविण्यास कबूल आहों असें वचन जोरावरसिंगनें त्याला देऊन ठेवलें होतें. त्याचा हा **खुनशी बेत बदाउनी-जलालुद्दीन** या जोडीला समजता तर त्याला जोरावरसिंगासारख्या परकी मनुष्याच्या नादीं लागण्याचें प्रयोजनच पडलें नसतें. पण **फाझल** हा मुसलमान असल्यामुळें मुसलमानभाई त्याचा द्वेष करणार नाहींत, हिंदूंच करूं शकतील, असा त्याचा कयास होता, तो चुकीचा होता. पण त्या चुकीच्या कयासामुळें तो आयताच **जोरावरसिंगाच्या** मुठींत धरून दिल्यासारखा सांपडला होता. **जोरावरसिंगाला** मदत करण्यास म्हणूनच तो तयार झाला. **जोरावरसिंग** हा पंडितजींचा कट्टा अनुयायी असल्यामुळें त्याच्याविषयीं फाजील शंका **अबदुल्लाखानाला** आली नाहीं व **बादशहाचे** खाजगी बेत अबदुल्लाखान जरूर तेव्हां **जोरावरसिंगाच्या** मदतीनें पार पाडूं लागला.

त्या दिवशीं रात्रौ सतीनें आपल्या इच्छेस अडथळा केल्यास तिला ठार मारायला लावावयाची असें **जलालुद्दीननें** पूर्वींच ठरवून ठेवलें होतें व त्याबरहुकूम त्यानें आपल्या विश्वासू नोकरास **हुसेनास**-मारेकरी बोलावून ठेवण्याची तजवीस करून ठेवावयासही सुचविलें होतें. आपला बेत बेमालून तडीस नेण्यासाठीं सतीला त्या पडक्या घराच्या तळघरांतून उचलून स्वतःच्या वाड्यांतील तळघरांत कोंडून ठेवण्यांत आलें होतें. हे मारेकरी जमविण्याचें काम हुसेननें जोरावरच्या मदतीनें केलें होतें. त्याला त्या रात्रीं मारेकरी **जोरावरसिंगानें** कुटून मिळवून दिले हें आतां वाचकांना समजलेंच आहे.

**बादशहाला जलालुद्दीनाचा** अपराध आपल्या मुत्सद्यांच्या नजरेला आणावयाचा होता. तें कार्य बादशहानें अशा प्रकारें साधून घेतलें. पुढच्या व्यवस्थेबद्दल बादशहानें आपल्या अधिकाऱ्यांना जशा सूचना केल्या तशा त्या अमलांत आल्या आणि **जलालुद्दिनाच्या** वाड्याभोंवतीं चौकी पहारे बसले !

हा असला विपरीत परिणाम झालेला पाहून या सर्व दोषाचें खापर **जलालुद्दीन** आपल्यावर फोडणार, म्हणून हुसेन घाबरून गेला. हकीमाकडून औषधोप-

चार केल्यावर जलालुद्दिनाला थोडासा आराम वाटतांच त्यानें बादशहानें **जलालुद्दिनावर** असा रोष कां केला, हें जाणून घेऊन शक्य तर चौकीपहारा उठविण्याचा हुकूम आपण मिळवून येतों असें सांगून तो **शिक्रीला** जावयाला निघाला. पागेंतला एक घोडा सोडून स्वार झाला व तडक निघाला.

जातांना त्याला जोरावरसिंगाला भेटावें असें एकवार वाटलें होतें, तथापि कालापव्यय होण्याच्या भीतीनें तो तडक शिक्रीलाच निघाला. पण जर कां तो जोरावरसिंगाला भेटायला **शिवशर्म्यांच्या** मठाकडे जाता तर त्याला काय प्रकार दिसला असता बरें ?

त्याच्या दृष्टीस जो देखावा पडला असता, त्या देखाव्यानें त्याला सर्व उलगडा झाला असता. मग कदाचित् तो **शिक्रीस** देखील गेला नसता. कारण आधल्या रात्रींच्या प्रकारांत त्याला कसलीच शंका आली नव्हती. वास्तविकपणें मारेकरी जमवून आणण्याचें काम खुद्द **हुसेननें** देखील केलें असतें. कारण मारेकरी लोकांत त्याची तशी चांगलीच जानपछान होती. पण त्याला सवड नव्हती. आणि या आपल्यावरील कामगिरीचा उल्लेख **जोरावरसिंगाकडे** करतांच त्यानें आनंदानें ती कामगिरी आपल्या शिरावर घेतली. यांत **हुसेनला** संशय येण्यासारखें कांहींच नव्हतें. म्हणून **हुसेननें** त्याला पसंति दर्शविली. ठरल्याप्रमाणें रात्रीची कामगिरी पार पडली व एका मारेकऱ्यानें म्हणजे वेषधारी **अबदुल्लानें हुसेनला** कामगिरी पार पाडल्याची खात्रीही पटविली होती. तेव्हां **हुसेनला** मारेकऱ्यांचा संशय तरी कां यावा ?

इकडे **शिवशर्म्यांच्या** मठांत सतीची सती जाण्याची तयारी जारीनें सुरू होती. कांहीं हिंदू सुवासिनी जमून सतीला सौभाग्यलेणीं चढवीत होत्या. ओटी भरणें, वायनें वांटणें, पिवळा पोषाख करणें, सौभाग्य द्रव्यें लेवून तीं सर्व सुवासिनींस वांटणें वगैरे सर्व प्रकार त्या ठिकाणीं चालले होते, व सती बंद करण्याचा कायदा अकबराच्या राज्यांत प्रचलित असतांही केवळ अपवादादाखल सती जाण्याची खास परवानगी सतीला बादशहाकडून मिळाली होती.

सर्व प्रकारची निरवानिरव झाल्यावर चिता प्रज्वलित करण्यांत आली. सतीनें मोठ्या प्रेमानें सर्वांचे निरोप घेतले. जिचे तिच्यावर आतांपर्यंत अत्यंत उपकार झाले होते त्या **जोधबाईस** तिनें सौभाग्यवृद्धीचा सप्रेम शुभाशीर्वाद पाठविला. पंडितजींना तिनें नमस्कार सांगून ठेवला. सम्राट् **अकबरशहालाही** तिनें आपला शेवटचा शुभाशीर्वाद सांगितला. आपल्या दिरानें प्रतिज्ञापूर्तीचा अर्धा भाग तडीस नेल्याबद्दल कृतज्ञतेच्या अश्रूंनीं डोळे डबडबले असतां तिनें त्याला—जोरावरसिंगाला—नमस्कार केला आणि राहिलेल्या अर्ध्या भागाची पूर्ति करावयास ईश्वर तुम्हांला सामर्थ्य देवो, अशी त्याच्यासाठीं परमेश्वराकडे तिनें मागणी मागून त्याची प्रार्थना केली. नंतर तिनें आपल्या पतीची मूर्ति मनांत आणली.

**दिल्लींत** तरी हा प्रकार अपूर्व होता. कोणाही स्त्रीला तिच्या इच्छेविरुद्ध जुलमानें सती जाण्यास भाग पाडूं नये असा अकबराचा हुकूम होता; आणि या उदाहरणानें आपला हुकूम योग्य असल्याची अकबराची खात्री झाली होती. पतीच्या निधनानंतर ज्यांना मृत्युलोकीं संसार थाटून नांदणें असह्य होतें अशा स्त्रिया हिंदु-समाजांत थोड्या प्रमाणांत कां होईना, पण असल्यामुळें त्यांचे शाप आपल्या माथीं घेऊन त्यांना जबरदस्तीनें संसाराचे दुःखभोग भोगावयास लावणें दोषास्पद ठरतें. याच स्त्रीच्या बाबतींत आपल्या कायद्याचाच भलता फायदा घेऊन तिला **जला-लुद्दिनानें** कशी नाडली, तेंहि **अकबराच्या** निदर्शनास आलें होतें. स्वेच्छेनें व सर्वांच्या संमतीनें सती जाणाऱ्या स्त्रीला देखील आपले खालचे अधिकारी केवळ पापी वासनेला बळी पडून छळीत असतात, अशा तक्रारीहि त्याच्या कानीं आल्या होत्या. अशा लोकांस आपल्या कायद्याचा खरा मतलब कळावा, अशा हेतूनें त्यानें आपल्या खुद्द राजधानींत सर्वांसमक्ष हा प्रकार घडून येण्याची परवानगी हेतुपुरःसरच मुद्दाम दिली होती.

कायदा करणाराच्या अंतःकरणांत सद्धेतु असतो. पण शब्दाचा कीस काढून हेतूची विटंबना करून स्वार्थी लोक मतलब साधण्याकरितां शब्दांची ओढाताण करून हेतूचा विपर्यास कसा करतात, हें कोणास सांगावयास नको. अर्थात् हा सती जाण्याचा प्रकार पाहण्यासाठीं ज्यांना ज्यांना तेवढ्या अवधींत ही गोष्ट कळली, ते ते लोक त्या ठिकाणीं जमा झाले; आणि तो देखावा पाहून क्षणभर थक्क झाले!

चिता धाड् धाड् जळत होती. सतीनें आपल्या प्रियकर पतीचा शेला आपल्या हातांत घेतला होता. त्या शेल्याची तिनें गंधमाल्यादिकांनीं विधिपूर्वक पूजा केली होती. ती हौसेनें सर्वांचा निरोप घेऊन हास्यमुख होऊन आली होती. तिच्या मुख-मंडलावर अपूर्व तेज चमकत होतें. ती नखशिखांत उल्लसित झाली होती. तिनें केलेला सौभाग्यशृंगार काष्ठप्राय झालेल्या तिच्या देहयष्टीलाहि शोभवीत होता. ती प्रियपतिसंदर्शनोत्सुक झाली होती व आतांच आपल्याला अलभ्य असा प्रिय समागम होणार, अशी खात्री झाल्याचें तिच्या एकंदर आविर्भावांवरून दिसत होतें.

तो शेला तिनें आपल्या हृदयाशीं धरला होता. त्याच्याकडे पाहूनच आज-पर्यंत तिनें आपले प्राण कुडींत ठेवले होते. आपल्या पतीजवळ आपणाला पोंच-विणारा तोच एक वाटाड्या उरला आहे, असें तिचें मन तिला सांगत होतें. सासरचें मूळ घेऊन येणाऱ्या माणसाबद्दल प्रियसंगमोत्सुक तरुण स्त्रीची जी भावना असते, त्याच स्नेहभावनेनें ती त्या शेल्याकडे पहात होती. माहेरून पतिगृहीं जाणाऱ्या तरुणीप्रमाणेंच तिनें सर्व तयारी केली होती. चितेजवळ जाऊन ती उभी राहिली आणि तिनें तो आपला सांगाती शेला नजरेसमोर हातांत धरला व त्याच्याकडे टक लावून पाहूं लागली.

लोकांना वाटलें ही भीतीनें मूर्च्छित झाली. कित्येकांना वाटलें ती चेटकीण

असून कांहीं तरी ढोंग करीत आहे. कांहीं जण म्हणत होते कीं, कांहीं तरी निमित्त करून ही आतां पळून तरी जाईल अथवा अग्नींत उडी टाकण्यास नाकबूल तरी होईल. कोणी म्हणत होते कीं, **जलालुद्दिनावर** सूड उगविण्याकरितां ही कांगावखोर बाई स्वतःला जाळून देखील घेईल आणि हिंदूंचीं मनें मुसलमानांविरुद्ध चिथावून मुसलमान बादशाहीवर संकट आणील. कोणी दुरात्मे तर असें कुजबुजत होते कीं, स्वतःच शीलभ्रष्ट झाल्यामुळें तें झांकण्यासाठीं हें सर्व नाटक आहे. तथापि कित्येकांचा विचारमालिका वरच्याहून अगदीं भिन्न अशी होती.

पतिपत्नींचा एकजीव झाल्यानंतर पत्नीला पतीच्या अभावीं सुखविलास सुचणें शक्यच नाहीं. शरीराचें अर्पण एकवारच होतें. तें यथासांग एकवार विधिपूर्वक झालें कीं, त्याच शरीराचा उपभोग दुसऱ्या व्यक्तीस घेऊं देणें ही हीन कल्पना आहे. शास्त्रकारांनीं विचारपूर्वक ठरविलेले कांहीं योग्य अपवाद वर्ज केले असतां एकाच शरीराच्या भोगाचें दान अनेकांस करून देणें, हा शरीरविक्रयाचाच एक मासला आहे. एकप्रकारें त्याला व्यभिचारच म्हणतां येईल. केवळ विषयवासनेच्या तृप्तीसाठींच जर पुनर्विवाह करावयाचे असतील तर ते निषिद्धच ठरतील. तथापि विषयभोगाच्या विधिपूर्वींच जर वैधव्य आलें असेल तर पुनर्विवाह करावयाला शास्त्र अथवा व्यवहार देखील आड येणार नाहीं. हा साधारण नियम सोडून दिला तरी विशिष्ट अडचणींचा देखील कित्येक बाबतींत विचार करावा लागेल. तथापि साधारण किंवा विशिष्ट बाबी कीं ज्या सूज्ञजनसंमत होतील अशा कोणत्याच नसतां केवळ विषयोपभोगेच्छेसाठींच पुनर्विवाह करावयाचे तर त्या पुनर्विवाहाच्या परंपरेला सीमाच राहणार नाहीं.

कित्येकांना वाटत होतें कीं, पत्नीनिधनानंतर एकपत्नी व्रत पाळणारा नीतिमान् पुरुष जसें आजन्म कडकडीत ब्रह्मचर्य व्रत पाळतो व समाजसेवा करितो अथवा संन्यासी बनून देहदंडन करीत ईश्वररूपाशीं ध्यानविलीन होतो, तसें स्त्रीनेंहि कां करूं नये? पण लगेच त्यांनाहि शंका येई, कीं, तरुण स्त्रीच्या मार्गांत भलभलतीं संकटें आणणारे पापात्मे जोंपर्यंत जगांत आहेत, तोंपर्यंत निर्बल स्त्रियांचा असला उद्देश सिद्धीस जाणें कसें शक्य होणार? शिवाय समाजसेवा करण्यास तरी सर्वांसच चालू सालच्या परिस्थितींत वाव कुठें आहे? सर्वत्र स्थिरस्थावर होऊन शांतता प्रस्थापित झाली, तर सध्यां सती जाण्याला तयार होण्याइतकी मनाची खंबीरता असणाऱ्या स्त्रिया जोगिणी बनून चार दोन पोरांच्या आया बनण्याऐवजीं असंख्य गरीब व मातृपितृविहीन बालकांच्या दाया बनण्यास खात्रीनें तयार होतील. एकच एक कुटुंब सांभाळण्यापेक्षां राष्ट्रांतील अनेक कुटुंबें सांभाळण्यासाठीं त्या विश्वकुटुंबी परमेश्वराचें व्रत चालविण्यास खात्रीनें तयार होतील. तोहि एक सती जाण्याचाच मार्ग आहे. तोहि एक पातिव्रत्याचाच प्रकार आहे. राष्ट्रप्रेमी पतीचा आत्मा पत्नीच्या असल्या आचरणानें खात्रीनें प्रसन्न होईल व तो स्वर्गद्वाराच्या वरवरच्या पायऱ्या चढूं

लागेल. पत्नीच्या दयाभूततेच्या वर्तनानें त्याला पत्नीपुण्याईच्या बलाचा बळकट आधार मिळेल.

असे नानाविध विचार त्या ठिकाणीं जमलेल्या लोकांच्या मनांत येत होते. पण सगळ्यांचे डोळे सतीकडे लागले होते. आणि सतीचे डोळे कुठें—कोणाकडे लागले होते?

सदासर्वकाळ हृदयाजवळ बाळगलेला शेला हस्तद्वयांत धरून व त्याच्याकडे डोळे भरून किंचित्काल पाहिल्यावर तो शेला पेहरणाऱ्या माणसाची—तिच्या पतीची वीरमूर्ति तिच्या नजरेसमोर आली. नखशिखांत ती मूर्ति अगदीं स्पष्टपणें तिला आपल्या मनश्चक्षूंसमोर दिसूं लागली. तिचें ध्यान तिनें आजवर केलें होतें. तिच्या नेत्रांसमोरून ती मूर्ति कधींच ढळली नव्हती. अर्थात् या क्षणीं देखील ती मूर्ति तिच्या मनचक्षूंसमोर यायला विलंब लागला नाहीं. कर्मेंद्रियाला जसा सवंयीचा सराव कार्याला सौकर्य आणि सुलभता देतो, तसाच ज्ञानेंद्रियांना देखील सवंयीचा फायदा मिळत असावा. आपण एखादी पाहिलेली देवमूर्ति अगर मनुष्यप्रतिमा डोळे मिटून मनचक्षूंसमोर आणण्याचा प्रयत्न करावा, कीं त्यांत हटकून विकृति होते. शिवाय चंचल मनाच्या चांचल्याला त्याच वेळेला खेळ मांडायला अवसर मिळतो. अगदीं नको असेल तें कल्पनेच्याहि पलीकडून तेथें येऊन ध्यानाच्या आड खेळखंडोबा मांडील; पण धारणा स्थिरावूं देणार नाहीं. पण नित्य असाच प्रयत्न करीत गेल्यास ह्या चंचल मनाचे चाळे कमजोर होतात आणि ध्येयमूर्तीशीं मनाचें तादात्म्य होऊं लागतें. मनाच्या धांवत्या पायांत खोडा घालण्याचें सामर्थ्य साधकाला हळुंहळूं प्राप्त होतें व ती ध्येयमूर्ति ध्यात्याला आपल्या मनश्चक्षूंसमोर जशास तशी उभी करतां येऊं लागते. या सतीचें हें ध्यान आजकालचें नव्हतें. अनेक दिवसांचा सराव तो आणि पूर्ण प्रेमाच्या कळवळ्याचा. पतिमूर्ति डोळ्यांसमोर प्रगट होतांच सतीची मूर्ति रोमांचित झाली. तिला ब्रह्मानंद झालेला होता. निरनिराळ्या भावनांच्या प्रेक्षकांना तें दृश्य पाहून नवल वाटलें. तिची डोळे मिटलेली मुद्रा त्यांना हंसतमुख दिसूं लागली. त्या हांसऱ्या मुद्रेकडे पाहतांच चांडाळ मनाच्या दुष्टपणावर देखील सात्त्विकतेचें झांकण पडलें. अधमांतल्या अधम आणि कुत्सित मनाचे देखील मनोव्यापार बंद होऊन क्षणैक दैवी भावनांचें वारें त्यांच्या हृदयांतून हलकेंच झुळझुळून गेलें! **तो क्षण**—तो देखावा, ती परिस्थिति तें सर्वच तसें परिणामकारक होतें.

सतीनें डोळे किंचित् उघडले. चितेला तिनें वंदन केलें. तिनें त्या चितेच्या भोंवतीं तीन प्रदक्षिणा घालण्यास सुरुवात केली. सर्वांचीं हृदयें सद्गदित झालीं होतीं. पाषाणाला देखील आर्द्रता येऊं लागली होती. पतिप्रेमाचा हा **हिंदुधर्माचा** उमाळा इतरेजनांस अपूर्वच वाटत होता.

सतीचें हृदय या जगांत नव्हतें. तिचे पाय जमिनीवरून चालत होते, पण ती जमीन दिसत नव्हती व भासतहि नव्हती. धडधडणाऱ्या चितेच्या उष्ण वाफा पन्नास-

साठ कदमांवर रहाणाऱ्या लोकांच्या अंगास देखील झळ मारीत होत्या. पण प्रदक्षिणा घालणाऱ्या सतीला त्या उष्ण आहेत कीं शीतल आहेत हें देखील समजत नव्हतें. सुख-दु:खाच्या द्वैताच्या पलीकडल्या प्रांतांत तिनें प्रवेश केला होता. योगीजनांच्या निर्विकल्पक समाधिसुखाचा अनुभव सतीला चितागमनाच्या प्रसंगीं येत असतो असें म्हटल्या-वांचून राहवत नाहीं. तसें नसेल तर सहगमन म्हणा अथवा चितागमन म्हणा होणेंच शक्य नाहीं. सारे इंद्रियव्यापार प्रतिबद्ध करण्याइतका निष्ठेचा जोर असावा, तेव्हांच सतीचें वाण प्राप्त व्हावें. सतीचें वाण आणि सूळावरची पोळी या दोन म्हणी मराठी भाषेंत रूढ झालेल्या आहेत; पण पहिलीचा जोर दुसरींत नाहीं. सतीचें वाण तें हें असें असतें. त्याला दुसरी उपमाच नाहीं. सतीच्या वाणाची कल्पना हिंदुधर्माशिवाय दुसऱ्या धर्मांत नाहीं. सतीच्या वाणाची कल्पना हिंदू स्त्रियांवाचून अन्य स्त्रियांत नाहीं; आणि सतीच्या वाणाची कल्पना भारत देशाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं. इतर लोकांनीं ही क्रूरता असें मानून सतीच्या वाणाचा धिःकार करावा, कारण त्यांच्या उदात्ततेची उडी इतकी उंच उठणारच नाहीं. सतीला सती जाण्या-करितां जुलूमजबरदस्ती कोणाचीच नसते. ती तिची उत्कट स्वेच्छा असते. ती अद्वैताची परमावधि असते. स्वसुखनिराभिलाषतेची परिसीमा असते. भारतेतरांना ती कल्पनातीतच वाटायची ! त्याला त्यांचा मुळींच इलाज नाहीं.

चिता अवकाळ धडाडत होती. तिच्या लालेलाल ज्वाळा आकाशपंथानें चालल्या होत्या. सतीला आपल्या पतीकडे जावयाला हाच मार्ग होता. शेल्याच्या संगतीनें अग्निशिखांच्या आकाशगामी मार्गानें ती स्वर्गारोहण करणार होती. चितेला तीन प्रदक्षिणा घालून झाल्यावर तिनें आपल्या मार्गाचें समीक्षण केलें, आणि आपल्या त्या शेल्याला हृदयाशीं धरून धाड्कन् चितेंत उडी घेतली ! हूं नाहीं कीं चूं नाहीं. आगीच्या धडधडण्याशिवाय कसलाच ध्वनि निघत नव्हता. अग्नीच्या ज्वाळांनीं सतीच्या सुकुमार पवित्र देहाला चोहोंबाजूंनीं कवटाळिलें. त्या ज्वाळांच्या ठिकाणीं काठिण्याचा लेशही नव्हता. सतीला आपल्या ताब्यांत घेतल्यावर त्या ज्वाला पूर्वीपेक्षां खरोखरच उंच झालेल्या दिसल्या, त्या आकाशमार्गानें सतीला तिच्या प्रियकर वीरपतीकडे घेऊन चालल्या होत्या ना ? मग ? त्यांनीं अधिकाधिक उंच कां होऊं नये ?

# प्रकरण–विसावें.

## " म्हाताऱ्यालाच गारद करावा ! "

**का**रभारीसाहेबांनीं आपल्या मित्राच्या सुटकेकरितां खटपट करावयाचा निश्चयच केला होता. व त्याप्रमाणें त्यांनीं लवकरच पहिलीच मिळाली ती संधि साधून सम्राटाला **जलालुद्दिनाची** विनंती कळविली. नवीन नेमलेला कारभारी इतक्यांतच खाजगी राजकारणांत पडूं लागलेला पाहून बादशहाला थोडेंसें आश्चर्य वाटलें. बादशहानें कारभाऱ्याला रोखठोकच जबाब दिला. पण तो जबाब कारभाऱ्याला जन्मभर पुरला आणि त्या घटकेपासून तो बादशहासमोर जावयास चळचळ कांपूं लागला. तो बादशहाचा जबाब ऐकून व त्यावेळची ती त्याची रागीट मुद्रा पाहून कुठली झक मारली आणि आपण पुढें आलों असें त्यास झालें. तो जबाब पुढील भावार्थाचा होता.

" **जलालुद्दिन** गुन्हेगार आहे. **जलालुद्दिनाची** सुटका आजच्या आज होईल; पण ती त्याच्या वाड्यांतून तुरुंगांत जाण्याकरितां होईल. त्याच्या गुन्ह्यांचा न्यायनिवाडा लवकरच सर्वांसमक्ष केला जाईल. तुम्ही असली लुडबुड पुन्हा कराल तर तुमची इराणांत रवानगी करण्यांत येईल. "

हा जबाब ऐकतांच आपलें मस्तक भ्रमण करीत असल्याचा भास **इन्मनुद्दौल्याला** झाला. **बादशहाचा** जबाब इतरांस जशाचा तसा सांगावयास त्याला तोंड नव्हतेंच. पण **हुसेनची** समजूत तर केली पाहिजे होती. कारभाऱ्याला समजून चुकलें कीं **जलालुद्दिनानें** खुद्द बादशहाचाच कांहीं तरी भयंकर गुन्हा केलेला आहे. म्हणून **हुसेनची** गांठ पडतांच त्यानें **जलालुद्दिनाचा** गुन्हा समजून घ्यावयाचा निश्चय केला. पण **हुसेन** नुकताच एकवार फसला होता. शिवाय कारभारीसाहेब परकी गृहस्थ त्यांना आपल्या धन्याचें रहस्य एकदम कसें सांगून टाकावें असें वाटूं लागलें. या शंकेमुळें खऱ्या हकीगतीचा मागमूस तो कारभाऱ्यास लागूं देईना. **हुसेन** उडवाउडवीचीं आणि टाळाटाळीचीं उत्तरें देत आहे, असें पाहून कारभाऱ्याच्या मनांतला संशय अधिकच दृढ झाला. त्यानें या **जलालुद्दिनाच्या** भानगडींत आपण मुळींच पडूं नये, असें ठरविलें. त्यानें **हुसेनला** एवढेंच कळविलें कीं **जलालुद्दिनावर** बादशहाची मर्जी खप्पा झाली असून त्याबद्दल न्यायमनसुबा व्हावयाचा आहे.

हा कारभाऱ्याचा निरोप ऐकून **हुसेनची** भीति अधिकच वाढली. **जलालु-द्दिनाचें** पापकर्म बादशहास कळलें असलें पाहिजे असेंच त्याला वाटूं लागलें. बहुधा **जलालुद्दिनाची** आतां सद्दी फिरणार, तेव्हां आपल्याला दुसरा आश्रय पहावा लागणार. त्याअर्थी पुढची तजवीज एव्हांपासूनच करावयास लागणें जरूर होतें. तो **शिक्रीहून दिल्लीस** येण्याकरितां निघाला. आतां जातांना तरी **शिवशर्म्याच्या** मठावरून जावें असें त्यास वाटूं लागलें. चालतां चालतां त्याचा हा निश्चय कायम झाला. **जोरावरसिंगाबद्दल**ही त्याला थोडासा संशय येऊं लागला. पण **जोरावरसिंगाची** इच्छा त्याला ठाऊक होती. **जोरावरसिंग** वीर मर्द होता. त्याला **जलालुद्दिनाला** स्वतःशीं दोन हात करावयाची संधि देऊन गारद करावयाचें होतें. तेव्हां **बादशहा**कडून परस्पर **जलालुद्दिनाला** तो कैद करविण्यांत सबंध ठेवणार नाहीं असें त्याला वाटत होतें. तरी पण मारेकरी त्याच्यामार्फत आले होते, तेव्हां सतीला ठार केल्याची त्यांनीं सांगितलेली हकीगत खरी कीं काय हें काढून घ्यावें व आपला पुढचा बेत ठरवून टाकावा अशा विचारानें तो मठाकडे जाण्यासाठीं निघाला.

तो मठाकडे आला आणि त्यानें **जोरावरसिंगा**ची चौकशी केली, तों **शिवशर्मा** आणि **जोरावरसिंग** कोणा पाहुण्याची मुलाखत घेत आहेत असें त्यास समजलें. तेव्हां त्याला बाहेरच वाट पहात बसावें लागलें. पण आंत बसून बोलणाऱ्या माणसांचा एखादा शब्द त्याच्या कानीं मधूनमधून पडत होता. बाहेरच्या लोकांस आपण कान लावून ऐकत आहोंत असा संशय न येऊं देतां तो जरा विशेष लक्षपूर्वक बाहेर पडणारा शब्द ऐकूं लागला, तों त्याचा चेहरा विस्मयचकित झाला. परक्या मनुष्याचा आवाज आपल्या ओळखीचा आहे असें त्यास वाटूं लागलें. आवाज ओळखीचा रा, पण कोणाचा हें त्याला अनुमान करतां येईना, अथवा त्याच्या घाबरलेल्या मनःस्थितीमुळें त्याच्या चटकन् लक्षांत येईना. इतक्यांत त्याच्या कानांत पुढील शब्द पडले.

"**फैझी** तिकडे सुरक्षित आहे, त्याची काळजी नको तुम्हांला. त्याला तिकडे कोणाचीच भीति नाहीं. आतां.........."

हे शब्द कानीं पडतांच त्याला तें भाषण ऐकूं आल्यास बरें असें वाटून जिकडून तो आवाज येत होता, तिकडे हळूहळू सरकूं लागला. मठांतल्या रक्षकांच्या लक्षांत तो प्रकार आला व त्यांनीं त्याला बाहेर बसावयास सांगितलें. ते शब्द ऐकून **हुसेन** बेभान झाला होता. त्याची ती हालचाल नकळत: झाली. आतां आपणांला होती तीही ऐकण्याची संधि गेली असें वाटलें व म्हणूनच तो हिरमुसला. पण त्याला बाजूस जावेंच लागलें. आपला शत्रु कोठें तरी सुरक्षित आहे, असें ऐकून **हुसेनला** चैन पडेना. त्याची द्वेषबुद्धि त्याचें मन भडकवूं लागली. तो **जलालु-**

दिनाची नजरकैद आणि चौकी पहारा विसरला. रक्षकांचें न ऐकतां आपण तडक **शिवशर्मा** व **जोरावरसिंग** बोलत बसले असतील तेथें बेधडक जावें असेंही त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. पण थोड्याशा विचाराअंतीं थोडा दम धरणेंच त्याला इष्ट वाटलें.

बाजूस गेल्यावर तो परका माणूस कोण, हें त्याच्या लक्षांत आलें. तो आवाज कोणाचा तो आतां त्याला आठवला. तो आवाज त्याच्या शत्रूचाच. त्याच्या पूर्ण परिचयाचा तो स्वर होता. तो स्वर त्याच्या जीवनक्रमांत क्रांति घडवून आणणाऱ्या त्याच्या वैऱ्याचा होता. तो शब्द **शेखमुबारिकचा** होता. आतां तर त्याला कसेंसेंच वाटूं लागलें. त्याच्या मनांत हजारों विचारविकारांचें वादळ उठलें !

**फैझीला** कोणी तरी कुठें तरी कांहीं तरी विशिष्ट हेतूनें लपवून ठेवलेला आहे; आणि **फैझीच्या** हालचालीची व लपण्याच्या स्थानाची माहिती **जोरावरसिंग, शिवशर्मा** व **मुबारिक** यांस आहे, असें असून या गोष्टीचा सुगावा ज्याला आपण दोस्त समजतों त्या **जोरावरसिंगानें** आपल्याला अद्याप लागूं दिला नाहीं. तेव्हां **जोरावरसिंग** लुच्चा आहे अशी आपल्या मनाची त्यानें समजूत करून घेतली. आपण आपल्या पुढच्या सोईबद्दलचा सल्ला ज्याला विचारावयाला इतक्या विश्वासानें आलों, तोंच आपला दोस्त आपल्या शत्रूंशीं खलबत करीत असलेला पाहून त्याच्यासारख्या शीघ्रकोपी, विचारशून्य आडदांडाला क्रोध आल्याशिवाय कसा राहील ? तो रागानें लाल झाला. आंत जाऊन **मुबारिकला** जेथल्या तेथें ठार करावा, असें देखील त्याला वाटत होतें !

रक्षकांनीं **जोरावरला हुसेन** बाहेर आल्याचें कळविलें. तेव्हां त्याला विचार पडला. पण **हुसेन** भोळसर आहे व शीघ्रकोपी आहे हें त्याला ठाऊक होतें. तो हातचा सुटूं देणें म्हणजे अगदीं वाईट. अर्थात् त्याला बाबापुता धरून सांवरून धरणें हें **जोरावरसिंगाचें** आद्य कर्तव्य होतें. **जोरावरसिंग** लगेच बाहेर येऊं लागला. **शिवशर्मा** आणि **मुबारिक** यांस त्यानें बसण्याबद्दल खूण करून तो बाहेर आला व दुसऱ्या बाजूच्या एका खोलींत त्यानें **हुसेनला** बोलाविलें. **हुसेन** जळफळतच त्याच्याबरोबर खोलींत गेला. **जोरावरसिंगानें** हुसेनच्या रागीट मुद्रेकडे मुद्दामच दुर्लक्ष केलें होतें. तो अगदीं हलक्या आवाजांत **हुसेनच्या** कानांत **हुसेनला** जवळ ओढून बोलूं लागला.

“ **हुसेनभाई** ! शत्रूचा गळा कापावयाचा तर शत्रूच्या गळ्यांत गळा घातल्याशिवाय गत्यंतर नाहीं हें तुम्ही अगदींच विसरतां. तुमचा शत्रू आमच्या काबूंत येत चालला आहे ही आनंदाची खबर मला तुम्हांला सांगावयाची होती. तेव्हां तुम्ही आलां तें बरें झालें, **बादशहा** आतां **शिक्रीहून दिल्लीस** आल्यावर पूर्वीप्रमाणें पुन्हा **आग्र्यासच** रहावयास जाणार आहे. तेव्हां पुढचे बेत आप-

त्याला पुन्हा ठरवावे लागतील. **बादशहाच्या** मुक्कामाची ही हकीगत मला आधीं एका दरबारी इसमाकडूनच समजली. ''

पण त्याला पुरतें बोलूं न देतां मध्येंच तोंड घालण्यासाठीं **हुसेन** उत्कंठित झाला होता. आपल्याला थापा देऊन आजवर चकविल्याबद्दल त्याला **जोरावरसिंगाचा** धिक्कार करावयाचा होता. पण **जोरावरसिंग** त्याला मध्यें बोलायला संधीच देत नव्हता. **जोरावरसिंगाच्या** तोंडून निघणारा एकेक शब्द त्याचा क्रोध शांत करीत चालला होता. त्याच्या मुद्रेंत क्रमाक्रमानें पडणारा हा फरक **जोरावरसिंग** न्याहळीतच बोलत राहिला होता.

'' बादशहाची स्वारी **आग्र्याला** रहायला गेल्यानंतर तुम्हांला उत्तम संधि मिळणार आहे. शिवाय आतां तुम्हांला **जलालुद्दिन** सुटला तरी **बदाउनी** व **शिरहिंदी** यांपैकीं एकादा मिळेल. आणि **युवराजाची** नजर आतां तुमच्यावर रोज रोज पडत जाण्याची संधि आहेच. यासाठीं तुमचें काम आतां लवकरच झाल्याशिवाय राहणार नाहीं. तुम्हीं व मी आपण एकत्र बसून याबद्दलचा सगळा बेत ठरवून टाकूं. ''

आतां मात्र **हुसेनच्यानें** धीर धरवेना. तो मध्येंच म्हणाला.

'' पण आंत आलेला माणूस कोण ? ''

'' म्हणजे ? त्याला तुम्ही नाहीं ओळखला ? ''

'' नाहीं ! '' **हुसेन** मुद्दामच नाहीं असें म्हणाला. कारण त्याला **जोरावरसिंग** आपल्याशीं खऱ्या मित्रभावानें बोलत आहे कीं थाप मारीत आहे हें ओळखावयाचें होतें.

'' ते **शेखमुबारिक**-तुमचे-''

'' आमचे ? '' उतावीळपणानें मध्येंच **हुसेन** म्हणूं लागला, '' आमचे कां म्हणतां ? तुम्ही आपलेच म्हणा ना ? ''

'' तुमचे म्हणजे तुमचे शत्रू, **हुसेनभाई** ! '' **जोरावरनें** आपल्या वाक्यावर स्पष्टीकरणार्थ टीप दिली.

'' आणि आमचे शत्रु म्हणजे तुमचे मित्र, असाच ना याचा अर्थ ! '' **हुसेननें** खोंचून विचारलें.

'' भाई, आपण आज असें कां बरें बोलतां ? ''

'' गुप्त खलबतें कसलीं चाललीं आहेत ? ''

'' तीं तुम्हांला कळल्याशिवाय रहाणारच नाहींत. ''

'' हो, हो—तर ? त्यासाठींच आम्हांला शिपायांनीं हांकलून बाहेर दवडलें वाटतें ? ''

'' म्हणजे ! येणाऱ्या जाणाऱ्या कोणालाही आपले शिपायांनीं आंत सोडायचें ? त्यांना कुठें कळत कीं तुम्हीआम्ही जानीदोस्त आहोंत म्हणून ? हुकूम पाळायचें

काम त्यांचें, तें त्यांनीं बजाविलें. हें पहा. तुम्ही बोवा लगेच चिडतां. धीरानें–क्षमानें कसें घ्यावें, तें तुम्हांला समजतच नाहीं. आतां तुम्हांला एक गोष्ट सांगतों तेवढी पक्की ध्यानांत ठेवा. या **मुबारिक**सारखीं माणसें बोलूं लागलीं कीं तीं उभें, आडवें कसेंही बोलतात आणि त्या त्यांच्या बोलण्यांत सहजासहजीं न समजणाऱ्या गोष्टी समजून येतात. तुमच्याकारितांच मी त्यांची गांठ घेतली. तुमच्या कामांत मी तुम्हांला खरोखरच मदत करीन. आपण पुन्हा भेटूं. तोंपर्यंत ते माझी वाट पहात आंत बसलेले असणार त्यांना वेळ नाहीं. पुनः **शिक्रीला** जायचें आहे, कीं ते **आग्र्याला** जाणार तें अद्याप समजलें नाहीं. यासाठीं शक्य तितक्या गोष्टी मला त्यांच्याकडून समजून घेतल्या पाहिजेत. तेव्हां तुम्ही यावेळीं जा. कारण बाहेर तुम्ही आलां आहांत, हें त्यांना समजलें तर ते येथें क्षणभरही बसणार नाहींत. ”

ही गोष्ट **हुसेनला** मात्र अगदीं पटली; व तो जावयासही कबूल झाला. पण त्याला एक प्रश्न विचारावासा वाटला.

“ कायहो ! सिंगजी, मी येथें आहे हें त्याला ठाऊक आहे का ? ”

“ नसावेंसें वाटतें ” असें म्हणून **जोरावर** मागें परतूं लागला. **हुसेनला** आतां जोरावरसिंगाच्या विश्वासाची खात्री झाली. त्यानें लवकरच फिरून त्याची भेट घ्यावयाचें ठरविलें. पण फिरून त्यानें **जोरावरला** हाक मारून जातां जातां मागें बोलाविलेंच. **हुसेन** जोरावरच्या अगदीं कानास लागून म्हणाला.—

“ **फैझी** तिकडे सुरक्षित आहे असें तुम्ही कीं कोणीसें आंत बोललें तें काय हो ? ”

**हुसेनचा** हा प्रश्न ऐकतांच **जोरावरसिंगाची** चलबिचल झाली. आपल्या भाषणाचा भाग ह्या आठमुठ्यानें कितीसा ऐकला कोण जाणें असें वाटलें व त्याला आपल्या मठाच्या रक्षकांचा रागही आला. आतां त्याला ताबडतोब काय जबाब द्यावा हें त्यास एकाएकीं सुचेना. तरीही त्यानें गप्प बसण्यापेक्षां कांहीं तरी उत्तर देऊन त्याला एकदा वाटेस लावला पाहिजे म्हणून म्हटलें.

“ तें सारें विचित्रच आहे त्रांगडें ! **फैझीला** तुम्ही मारलांत असाल असा त्या म्हाताऱ्याला संशय आला आहे. तुमच्यावर त्याचा वहीम आहे. पण तुमचा शोध मात्र त्यास लागत नाहीं. तुमचा जर का शोध लागेल तर तो तशीच समजूत स्वतःची करून **बादशहासही** तसेंच सांगेल, असें वाटतें. मी लगेच त्याला सांगून टाकलें कीं तुमचा **फैझी** तिकडे सुरक्षित आहे म्हणून ! पण तें सगळें तुम्हांला मागाहून कळवितों. तुम्ही आतां लवकर येथून चला. नाहीं तर तो मला पुष्कळ वेळ लागला म्हणून बघायला दार उघडून बाहेर येईल. मग सगळेंच ऑफस् ! ”

आतां मात्र **हुसेन** ताबडतोब तेथून निघून चालता झाला. त्यानें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. सारखा विचार करीत तो चालला होता त्याचे पाय यंत्रासारखे हालत होते. डोक्यांत खुनाचे विचार घोळत होते. त्या विचारांमुळें

त्याच्या हातांच्या मुठी वळत होत्या. कपाळाच्या शिरा उडत होत्या. पायांला ठेंच लागली तरी ती समजत नव्हती. अशा प्रकारें चालत असतां आपल्या धन्याच्या वाड्यासमोर आपण येऊन केव्हां पोंचलों, याचें त्याला मानही राहिलें नव्हतें. खालीं मान घालून विचारांच्या तंद्रींत तो सारखा नाकासमोर पायाखालच्या वाटेनें चालत राहिला होता. आपणाजवळ कोणी एक माणूस बघत असून तो आपल्याला खूण करीत आहे याच्याकडे त्याचें लक्ष देखील नव्हतें. त्यानें वाजविलेल्या टाळ्या देखील त्याला ऐकूं येत नव्हत्या. हलक्या आवाजांत त्याला "हुसेन" म्हणून मारलेल्या हाका देखील त्याला समजत नव्हत्या. त्या माणसानें मागाहून धांवत येऊन खांद्यावर हात टाकला, तेव्हां तो दचकून भानावर आला.

"कोण ?" त्यानें एकदम दचकून विचारलें.

"छान्! आम्ही सगळे जण तुमची वाट बघत आहोंत ना!" त्याच्या बरोबरच्या **जलालुद्दीनच्या** एका नोकरानें उत्तर दिलें.

"चला. चला." असें वेड्यासारखें बोलून **हुसेन** पुढें तडकच वाड्याकडे निघाला. त्या नोकराला हें त्याचें वागणें विक्षिप्तपणाचें वाटलें. कारण **हुसेन शिक्रिला** गेल्यानंतर त्याच्यामागें घडलेल्या प्रकारानें त्या साऱ्या लोकांच्या तोंडचें पाणी पळालें होतें. ते सारे नोकरचाकर **हुसेनच्या** वाटेकडे डोळे लावून बसले होते. त्यांना **दिल्लींत** सतीच्या सती जाण्याच्या प्रकारानें तर भयचकित करून सोडले होते! **हुसेन** येतो केव्हां व बादशहाकडून कारभारीसाहेबांच्या मध्यस्तीनें कोणती बातमी आणतो हेंच आतां पहावयाचें होते. ते वाट बघून बघून कंटाळले तेव्हां त्यांच्यातवरला एक माणूस **हुसेनचें** मार्ग निरीक्षण करण्याकारितां जरा पुढें गेला होता. पण **हुसेनभाईचें** हें भ्रमिष्टासारखें वर्तन पाहून तोही बिचारा चकित झाला, **हुसेन** वाड्याजवळ येऊन वर मान करून पाहतो, तों सगळे नोकर बाहेरच असून त्यांच्या सर्वांच्या चेहऱ्यांवर भीतीचें ठाणें बसलेलें होतें. कित्येकांनीं माना खालीं घातल्या होत्या. ज्यांनीं वर माना केल्या होत्या, त्यांनीं त्या **हुसेनभाई** कांहीं आशेची वार्ता आणतो कीं काय हें जाणून घेण्याकारितांच केवळ वर केल्या होत्या. हा विचित्र प्रकार पाहून **हुसेन** चरकला व तो जागच्या जागींच स्तंभित झाला.

कोणीच बोलण्यास पुढाकार घेईना. शेवटीं **हुसेननेंच** प्रथम चौकशीस सुरुवात केली. पण बराच वेळपर्यंत ते उत्तरच देईनात. त्यांनीं **हुसेनकडे** आशेनें लक्ष लाविलें होतें. पण **हुसेनचा** चेहरा देखील त्यांना उतरल्या सारखाच दिसूं लागला होता. **हुसेन** तर घोड्यावरून जाऊन पायांनीं आला होता.

कांहीं तरी क्षुल्लक कारणावरून **जलालुद्दीन** नोकरांवर रागावत असे त्यामुळें तेही रुसून बसत. तेव्हां अशांपैकींच एखादा प्रकार आज घडला असावा असें समजून **हुसेन** तडक वाड्यांत रिघूं लागला. पण आंत जातांच त्याला चोहोंकडे शून्याकार

दिसूं लागला. जिकडेतिकडे दरवाजे सताड उघडे पडलेले ! कोणी माणूस असलेंच तर सुतक्यासारखें खालीं मान घालून बसलेलें. कोणी कोणाशीं धड बोलत देखील नव्हतें. खुद्द धनीसाहेबांच्या बैठकीच्या खोलीकडे तो वर चढून गेला. तर त्या खोलीला बाहेरूनच आडाणा लावून ती बंद करून घेण्यांत आलेली होती. आणि सरदार साहेबांची तर कुठें जागमागही नव्हती ?

शेवटीं तो पुन्हा खालीं आला आणि ज्यानें त्याला येतांना हांक मारून खांद्यावर हात टाकला होता त्यालाच त्यानें काय प्रकार आहे म्हणून विचारलें. त्याकडून त्याला समजलें कीं आपण **शिकारीला** गेल्यावर मागाहून सरकारी धरणें येऊन सरदारसाहेबांना कोठडीचा मार्ग दाखविण्यांत आला. ते सरकारचे कैदी झाले !

त्यानंतर त्यानें कारण विचारलें व आणखी कोणकोणत्या गोष्टी घडल्या तेंही विचारलें. तेव्हां त्याला सती जिवंतपणें सती गेल्याची हकीगत समजली. ती वार्ता ऐकून मात्र त्याची जीभ कोरडी पडली ! तो एकदम उद्गारला "सती जिवंत कशी ?"

मारेकऱ्यांनीं ठार मारलेली सती जिवंत कशी ? **जोरावरसिंगा**बद्दलचा त्याचा संशय निघून जाऊन त्याच्याबद्दल **हुसेन**चें मन नुकतेंच निवळलें होतें. पण आतां त्याला पुन्हा संशयपिशाचानें पछाडलें. पण कांहीं झालें तरी त्याला **जोरावरसिंगा**शिवाय कोणाचा आधार नव्हता.

त्याला वाटलें कीं ज्या ठिकाणीं **जलालुद्दीना**ला कोंडून ठेवलें असेल त्या ठिकाणीं जाऊन त्याची भेट घ्यावी व सगळा खुलासा करून घ्यावा. त्याला पुन्हा वाटे कीं आपण सरळ **जोरावरसिंगा**कडेच जावें; व अपुऱ्या राहिलेल्या गोष्टींची शहानिशा करून घ्यावी. **फैझी** कुठेंतरी सुरक्षित आहे कदाचित् आपण त्याला मारायला टपत आहोंत हें जाणल्यामुळेंच त्याला कोणींतरी मुद्दाम लपविलेला असावा. **फाझल** आपल्या तडाक्याला कोठें आणि कसा मिळणार ? ती तर गोष्ट सध्या अशक्य आहे. दोघा मुलांना जिवंत मारून त्यांच्या वृद्ध पित्याला पुत्रविरहाचें दारुण अघात सोसावयास लावण्याची त्याची प्रतिज्ञा ! पण ती पुरी पडत नाहीं, तर म्हाताऱ्यालाच उडवला तर कसें, बस्स् ! ठरलें. आतां जाऊन **मुबारिक**लाच गाठावा आणि गारद करावा, असें त्याला वाटलें.

# प्रकरण एकविसावें.

## " तो एक अवलिया आहे ! "

" चला ना विश्वेश्वराच्या देवालयांत जाऊं."

" ऊं हूं."

" असं काय बरं **कुमार**? आपल्याला फार वेळ नाहीं लागायचा. बाबा घाटावरतीं गेले आहेत तेही देवालयांतच येतील. मग आपण तिघं मिळून आश्रमाकडे बरोबरच जाऊं."

" अं हं !"

" खरोखरच आज मी तुम्हांला घेतल्याशिवाय जायचीच नाहीं मुळीं देवळांत. दर सोमवारीं मी तुम्हांला बोलावतें, पण एकदां देखील तुम्ही आलांत नाहीं माझ्याबरोबर देवदर्शनाला. आणि सांगतां काय तर मी आपला एकटाच देवदर्शनाला जात असतों म्हणून. मी तर तुम्हांला कधींच पाहिलं नाहीं."

" ताई ! मी कधींच खोटं बोलत नाहीं."

" तुम्ही माझ्या अपरोक्ष देवदर्शन घेत असतां का? खरं सांगा हं! घेतां का?"

" खरंच मी एकटाच देवदर्शन घेतों."

" मग माझ्या बरोबरच आलांत तर काय बिघडेल बरं?" अगदीं गयावया करून काशी म्हणाली.

" नाहीं, मला कुणाच्याही बरोबर देवदर्शन करायला आवडत नाहीं."

" असे तुमचे नियम आहेत तरी कितीसे? जेवणाचे, संध्येचे, झोंपण्याचे, जपाचे, मंत्राचे, देवदर्शनाचे, ध्यानधारणेचे असे असंख्यात नियम तुम्ही पाळतां तरी कसले? आणि ते कोणाला बघूंही देत नाहीं, तुम्ही. मोठं नवल आहे हें. मी एक दिवस चोरून बघणार तुमचे मंत्र जप."

" हं, ताई ! असलं काम मात्र कधींच करूं नकोस हो. मग मला इतका राग येईल कीं मी कुठें तरी निघून जाईन. आणि मग फिरून कधींच मागं यायचा नाहीं." अगदीं दृढनिश्चयानें आणि कांहींशा रागाच्या आविर्भावानें **कुमार** म्हणाला.

पण त्या धमकीनें कुमाराचें काम झालें. ताई गोरीमोरी झाली. बिचारी यावर काय करणार? ही निर्वाणीची शिक्षा तिला सहन करणें अशक्य होतें. **कुमारनें**

निघून जावें व त्याच्या सहवासाला आपण मुकावें याच्या पलीकडे भयंकर शिक्षा तिला कोणतीच नव्हती. **कुमारलाही** हें निर्वाणीचें शस्त्र मोठें अमोघ वाटत होतें. कोणतीही गोष्ट आपल्या मनाविरुद्ध **काशी** करूं लागली, कीं तो या आपल्या निर्वाणीच्या शस्त्राचा प्रयोग तिच्यावर करी, कीं तिचें तोंड मिटलें. वरीलप्रमाणें बोलतां बोलतां तीं देवालयाच्या नजीक आलीं. ताई देवदर्शनाला जाऊं लागली. कुमार म्हणाला.

" ताई ! मी नदीवर जातों. तूं रोजच्या जागीं मला भेट बरं का ? "

ताईनें रागानें एक मानेला हिसडा दिला आणि ती फणकाऱ्यानें देवदर्शनाला जाऊं लागली. पण त्यावेळची ती तिची नजर **कुमाराचें** हृदय भेदून गेली !

त्याच ठिकाणाहून त्यानें आपलें मस्तक किंचित् विनम्र केलें आणि तो तडक मागच्या पावलीं निघाला. **गंगा**-किनाऱ्यावरच संध्याकाळीं बसण्याची त्याची एक ठरीव जागा होती. तेथें तो गेला आणि त्यानें आपली नित्यनैमित्तिक प्रार्थना सुरूं केली.

**इस्लामी** धर्मांत पांच वेळां दैनिक प्रार्थना करावी लागते. **हिंदु** धर्मांत तीन वेळां संध्योपासना करावयाची असते. सकाळ, सायंकाळ आणि माध्यान्ह काळ. पण मुसलमानी धर्मांत पांच वेळां ईशप्रार्थना करावयाची असते. त्या पांच वेळा पुढीलप्रमाणें आहेत. १ सूर्योदयाच्या पूर्वीं; २ माध्यान्हकाल कलंडतांना; ३ सूर्यास्ता-पूर्वीं; ४ सूर्यास्तानंतर दिवा लावणीच्या सुमारास; ५ दिवा लावणीनंतर पण एक प्रहर रात्र उलटून जावयाच्या पूर्वीं. **फैझीला** महंताच्या घरीं बादशहाच्या सांगण्या-वरून रहावें लागलें. हिंदुधर्माची वेदविद्या जाणण्याची जितकी उत्कट इच्छा **अक-बर** बादशहाची होती, तितकीच **फैझीचीही** होती. पण **हिंदूच्या** घरीं राहून हिंदुधर्मभावना न दुखविणें, त्यांच्याशीं दगलबाजी न करितां प्रामाणिकपणानें राहणें, हिंदूच्या घरीं राहून **इस्लामी** धर्माज्ञांचें उल्लंघन न करणें, दोन्ही धर्मांच्या मर्यादा सांभाळून आपण खरें कोण आहोंत, याचा घरच्यांस अथवा बाहेरच्यांस सुगावा लागूं न देणें, आणि **बादशाही** कारस्थानाचें गुपित न फोडणें इतक्या गोष्टी असहाय स्थितींत एकट्या तरुणानें पार पाडणें ही सामान्य गोष्ट आहे काय ? आणि ह्या इतक्या गोष्टी मनाकडे वागविणारी व्यक्ती तरी कशी ? **फैझी**सारखी. त्याच्या मनो-भावना इतक्या कोमल आणि पापभीरू होत्या कीं त्यांचें यथार्थ वर्णन करणें खरो-खरच अशक्य आहे. वर लिहिलेलीं हीं अनेक तंत्रें **फैझीला** सांभाळावीं लागत असत. याकरितां त्यानें महंताच्या घरीं प्रवेश केल्याबरोबरच आपल्या अटींचा पाढा वाचला. आपला दिनक्रम सुरळीत चालेल, अशा अटी त्यानें आपल्या गुरूला विनय-पूर्वक कळविल्या आणि त्यांची त्यानें संमति मिळविली. कंदमूलफलभक्षण, अथवा अन्नसेवन करावयाचें तें आपलें आपण स्वतंत्र करावयाचें. आपली ध्यानधारणेची

एकांत अशी स्वतंत्र जागा त्यानें तयार केली. या सर्व अटींचें अंतिम ध्येय हेंच कीं गुरूच्या तपस्येंत व्यत्यय येईल असला अनाचार आपल्याहातून घडूं नये आणि आपण मुसलमान आहोंत ही गोष्ट दुसऱ्या कोणाला कळूं नये.

पण कुटुंबांत मिळूनमिसळून वागावयाचें आणि इतकीं तंत्रें सांभाळावयाचीं हें कर्म महा कठिण आहे. तें तितकेंही त्यानें सांभाळलें असतें. पण केव्हां ? एकट्या महंताशींच त्यांची गांठ पडती तर. पण त्यांची गांठ पडली होती ताईसारख्या हुषार, चाणाक्ष, प्रेमळ आणि भावनाशील कुमारीशीं. त्यामुळें त्याला आपलें बेंड फुटेल अशी धास्ती वाटे. यासाठीं त्यानें एक युक्ति काढली होती. आपल्या गुरुजींकडून अभ्यासाची संथा घ्यावी, समजूत घ्यावी, अर्थबोध करून घ्यावा आणि पोथी घेऊन आठ आठ दिवस आश्रमांतून निघून जावें तें येऊंच नये. आश्रमांत असल्या मुदतींत देखील वरील तंत्रें त्याला सांभाळावीं लागत; त्यामुळें त्याला फार जपून वागावें लागे. अर्थात् त्याचें वर्तन अगदीं चमत्कारिक व विलक्षण होत असे. **महंतांचें** या कोणत्याही गोष्टीकडे लक्ष नसे. पण **ताईचें** तसें नव्हतें. तिची टेहळणी **कुमारवर** होती. तिला **कुमार** म्हणजे एक गहन कोडें वाटे. तो कोणी तरी मोठा तत्त्ववेत्ता, महान् तपस्वी असावा, असा तिला संशय येई. पण तो आपल्या येथें रहावा व त्यानें आपल्याशीं प्रेमानें, मनमोकळेपणानें वागावें असें तिला फार फार वाटे. पण **कुमाराच्या** तुसडेपणामुळें हरएक बाबतींत तिचा मनोभंग होई. तेव्हां तिला त्याचा राग येई. पण त्या रागाला आयुष्य एका पळाचेंही नसे. कारण **कुमाराची** ती विनवणी आणि मधूर शब्द व ती चित्ताकर्षक मुद्रा पाहिली कीं ती तेव्हांच वळे.

आत्तांच पहा ना ! तिनें इतकें विनवून **कुमाराला** बोलाविलें. पण कुमार तिच्याबरोबर जाईच ना. आणि जाईल तरी कसा ? तो सहृदय होता. पाषाणहृदयी नव्हता. कुराणाची शिकवण त्याच्या हृदयांत पुरती ठसली होती. तो धर्मवेडा नव्हता. तो माथेफिरूही नव्हता. दुसऱ्यांच्या हृदयांना जखमा करणें त्याच्यानें होत नव्हतें. **ताईबरोबर** तो देवालयांत गेला असता तर ताईनें त्याला तेथेंच सोडलें असतें काय ? नाहीं. ती त्याला आणखीही पुढें घेऊन गेली असती. म्हणजे आपण परधर्मीयानें आपल्या हिंदुबांधवांच्या अज्ञानाचा आणि प्रेमाचा फायदा घेऊन त्यांना फसविल्यासारखें झालें असतें. कुराणाची आज्ञा त्याला पाळावयाची होती. कुराणाच्या पांचव्या भागांत पुढील आशयाची आज्ञा आहे.

**“ देवासमोर साक्षीदार म्हणून उभा राहशील, तेव्हां न्यायनीतीनें चाल. दुष्टाव्यानें कोणाचा घातपात करूं नको. न्यायानें वाग. याच मार्गानें तूं धार्मिकतेप्रत पोंचशील. ”**

कुराणाच्या अशा अनेक उदात्त आज्ञा आहेत. त्यांचे नुसते शब्द नव्हत, तर त्यांचें खरेंखुरें तत्त्व **फैझीच्या** हृत्पटलावर प्रतिबिंबित झालें होतें. विश्वासघाताचें

पाप त्याला जोडावयाचें नव्हतें. **महंत** आणि त्यांची कन्या हीं दोघें त्याला आपल्या घरच्याप्रमाणें मानीत होतीं, त्याचा अवास्तव फायदा त्याला घ्यावयाचा नव्हता. इतकेंच नव्हे, तर त्यांचें आपल्यावरील अकृत्रिम प्रेम, आपण एक **ब्राह्मण-कुमार** ही त्याची करून देण्यांत आलेली भावना आणि तदनुरूप आपण चालविलेलें कपटनाटक याचा त्याला वारंवार तिरस्कार वाटे. आपण त्यांच्या निर्व्याज प्रेमाला न शोभणारें आचरण करीत आहों असें त्याला वाटे. सर्व कारस्थान गुप्त राहावें म्हणून त्याला अनेक लपंडाव करावे लागत व ते करतांना त्याचें मन विषण्ण होई. तो भरा-भर विद्याभ्यास करीत होता. वेदाध्ययन हा त्याचा मूळ उद्देश होता. म्हणून पहिल्या प्रथम ऋग्वेदाच्या ऋचांनाच त्यानें सुरवात केली होती. निरानिराळ्या संन्यासी, महंताचे धार्मिकवाद, पारायणें, प्रवचनें, व पुरश्चरणें पहावयास तो जाई. क्वचित् तो याज्ञिकांचे प्रयोगही आजूबाजूनें पहात असे. एवंच हिंदुधर्मांतर्गत वेदवेदांगांचें पदरांत पडेल तितकें ज्ञान मिळवून घेण्यास तो सदासर्वदा टपलेला असे. पण ती **ताई** त्याच्यावर टपलेली असे. आणि हल्लीं कांहीं दिवस आणखी एक व्यक्ति त्याच्या-वर टपलेली असे.

त्यानें आपली प्रार्थना-नमाजी संपविली आणि पुन्हा विचारमग्न होऊन बसला. त्याला प्रथम आठवण झाली ती **ताईची**. आपण तिला फसवून इकडे आलों, ही केवढी वाईट गोष्ट केली ? तिला किती तरी वाईट वाटलें. आपण संध्योपासना करतों म्हणून तिला सांगितलें. पण ज्या अर्थानें तिनें आपला शब्द घेतला त्या अर्थाचा नुसता आभास आपण उत्पन्न केला. शब्दशः पाहिलें तर आपण मोठेंसें पातक केलें असें नाहीं. **इस्लामी** धर्माची ही संध्योपासनाच म्हणावयाची. पण हें यज्ञोपवित पंडितजींकडून मंत्र शिकून धारण केलेलें म्हणजे केवढें ढोंग. किती अनु-चित कर्म आपण करीत आहोंत ? असे विचार त्याच्या मस्तकांत भ्रमण करूं लागले होते. पुढें पुढें तर तो आपल्याशींच पुटपुटूं लागला.

“ भोळ्या मनाची **ताई**! हाय हाय! मी किती खोटें बोलत आहें! सरळ मनाच्या बालिके! तुझ्याशीं मी किती प्रतारणा करीत आहें? तुला पदोपदीं मी किती फसवीत आहें? मला तूं ब्राह्मण समजून वागत आहेस. पण मी कोण? तुझ्यासारख्या प्रेममूर्तीशीं मला अशाप्रकारें पुढें वागावें लागणार असें मला स्वप्न जरी पडतें, तरी मी या फंदांत पडलों नसतों आणि हें दिव्य अंगावर घेतलें नसतें. मी **बादशहाचा** रोष सहन केला असता. पण हें कापट्य पांघरलें नसतें. मी करतों हें बरें कीं वाईट हेंच मला समजत नाहीं. यांतून कधीं मी पार पडणार कोणाला ठाऊक. पण मी हें पातक करीत आहें काय? मी हें वर्तन धर्मविरुद्ध करीत आहें काय? माझ्या या शंकेचें कोण निवारण करील? असें वर्तन या जगांत कोणीं कधीं कोठेंच केलें नसेल काय? ”

धर्मभीरु **फैझीच्या** या सवालाला उत्तर द्यायला आमचे बरेचसे वाचक तयार होतील अशी आमची खात्री आहे. **महाभारत फैझीलाहि** ठाऊक नव्हतें असें नाहीं. **कर्णानें परशुरामा**पासून धनुर्विद्या अशीच कपटानें संपादिली होती. **शुक्राचार्या**पासून **संजीवनी** विद्या देवगुरु **बृहस्पतीच्या** पुत्रानें—**कचानें**— अशीच हरण केली होती. या दुसऱ्या उदाहरणाशीं **फैझीचें** आणखी थोडेसें अधिक जुळत होतें. गुरुकन्या **देवयानी कचा**बरोबर होती. तशीच महंतकन्या **काशी-ताई फैझी**बरोबर होती. विद्यासंपादनासाठीं अनेक लपंडाव अशाप्रकारें योजल्याचीं उदाहरणें सांपडतात. मग **फैझी** देखील त्यांच्यासारखाच वागत होता. त्याला बादशहानें मुद्दाम पाठविलें होतें. वेदविद्या सरळ सिध्या मार्गांनीं आपल्याला हस्तगत होत नाहीं, असें पाहून बादशहानें हा डाव योजिला होता. पण तो साधण्याची जबाबदारी एकट्या **फैझीवर** पडली होती. त्या जबाबदारीखालीं तो वांकून गेला होता. तथापि **विश्वंभरशास्त्री**जींच्या मठांत त्यानें **हिंदुधर्मांतर्गत** दैनिक-क्रमाची जी तालीम घेतली होती, ती त्याला या वेळीं उपयोगी पडत होती. पंडितजींकडून त्याला सर्व उत्तम सूचना मिळाल्या होत्या. म्हणूनच त्याला आतां-पर्यंत बेमालूम तग काढतां आला. त्याची मुद्रा, त्याचें आचरण, त्याची वागणूक हीं सर्व हिंदुधर्मांत इतकी मुरली होती कीं तो ब्राह्मण नव्हे असें कोणालाच म्हणतां आलें नसतें.

पण **महंताच्या** आश्रमांत आल्यानंतर हिंदुधर्माचें दिव्य तत्त्व त्याला आस्ते आस्ते हिंदू बनवूं लागलें. **हिंदुधर्माची** महनीयता त्यला प्रशंसनीय वाटूं लागली. **हिंदुधर्माच्या** उज्वलतेचा प्रभाव त्याला दिवसेंदिवस पटत चालला. यामुळें आपण आपल्या धर्माविषयीं अनुदार तर होणार नाहीं ना? अशीहि त्याला भीति वाटूं लागली. त्याग, दया, दाक्षिण्य, शांति, क्षमा, तप, शुचिता, अशा अनेक दिव्य गुणांचा विकास होण्याची शिकवण, अपरंपार ज्ञान, अथांग तत्त्वज्ञान, भक्तिभावाची उपासना या सर्वांचें संकलन **हिंदुधर्मांत** आहे. इतर धर्मांचीं जीं निरनिराळीं विशिष्ट अंगें आहेत, त्या सर्वांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अंतर्भाव पंथभिन्नत्वाच्या रूपानें एका विशाल **हिंदुधर्माच्या** उदरांत झालेला आहे, असें पाहून व हिंदु लोकांचें अति पवित्र, अति प्रेमळ व अत्यंत परधर्मसहिष्णु असें विशुद्ध वर्तन पाहून त्याला **हिंदुधर्मीय** बांधवाबद्दल फारच आदर वाटूं लागला. बादशहाला अशा थोर धर्माचीं तत्त्वें जाणून घेण्याची जिज्ञासा बलवत्तर झाली याचें त्याला आतां मुळींच आश्चर्य वाटेनासें झालें. आजपर्यंत **इस्लामाच्या** अनुयायांनीं विनाकारण **हिंदुधर्माचा** छल केला, असें त्याला वाटूं लागलें. **अकबर** बादशहाच्या राजवटींत आपल्या चुका दुरुस्त करून उदात्त आणि अनुकरणीय अशी राजशासनपद्धति प्रचलित करतां येणें शक्य आहे, असें त्याला त्याचें मन सांगू लागलें. तो अशा विचारांत मग्न बसला असतां त्याला

ताईची विसर पडली. दुरून आपल्याला कोणी बोलवीत आहे असें त्याला वाटलें. तो तिकडे नीट न्याहाळून पाहूं लागला. आपण जागचें उठूंच नये, असें त्याला वाटलें. पण तरीहि तो उठलाच. तीहि व्यक्ति त्याच्या जवळजवळ येऊं लागली. तो कोणी तरी फकीर असावा असें त्याला भासलें. त्याचा वेष तरी **फकीराचाच** होता. तो खराच फकीर होता कीं काय तें त्यास माहीत नव्हतें. तो तसाच त्याच्याकडे पहात उभा होता. **फकीर** तर आतां अगदीं त्याच्या समोर येऊन उभा राहिला. दोघेहि एकमेकांकडे पहात बराच वेळ राहिले.

" कोणाला शोधतां आपण ? " **कुमारानेंच** विचारलें.

" आपणाच सारखा मला कोणी तरी पाहिजे होता ! " या उत्तरानें **कुमाराला** बुचकळ्यांत पाडलें.

" माझ्यासारखा म्हणजे कसा ? "

" एखादा **ब्राह्मण-कुमार** ! "

" फकीराला **ब्राह्मण-कुमाराशीं** काय करायचें ? "

" **हिंदु** तत्त्वज्ञान शिकावयाचें. "

" तर मग तें **कुमारा**कडून शिकण्यापेक्षां एखाद्या वयस्क आचार्याकडून शिकणें अधिक चांगलें नाहीं कां ? "

" तथापि एखादा **कुमार** वयस्काहूनहि अधिक ज्ञानी असूं शकतो कीं नाहीं ? "

" पण तसा मी असेल असें मानायला आपल्याला काय आधार आहे ? आणि शिवाय आपण **मुसलमान** ना ? "

**फकीराला** असलाच प्रश्न निघावयाला पाहिजे होता. हा प्रश्न **कुमारा**कडून येतांच त्याच्या भव्य चेहऱ्यावर किंचित् स्मित आलेलें होतें.

" अलबत् ! मी सच्चा मुसलमान आहें. इमान आणि दीन या दोहोंचें यथार्थ पालन करण्याचें माझें व्रत आहे. मी नुसता नांवाचा **मुसलमान** नाहीं. "

" मग **फकीराला हिंदुधर्माचें** ज्ञान जाणून घेण्याची इच्छा म्हणजे हें एक अजबच आहे म्हणायचें ! "

" एकच अजब ? असा मी एकच आहें कां ? **हिंदुधर्माचें** ज्ञान जाणून घेणारा दुसरा कोणीच **मुसलमान** नाहीं काय ? " हें **फकीराचें** भाषण **कुमाराला** संशयित करूं लागलें.

" असा दुसरा कोणी असल्याचें आपणाला ठाऊक आहे काय ? "

" आहे; मला ठाऊक आहे. मला तो सांपडला तर मी त्याला दाखवूनहि देईन आपल्याला. मी सध्यां त्याच्याच शोधांत आहें. "

" कां बरें ? आपणाला त्याच्याशीं काय करायचें आहे ? " हा प्रश्न विचार-

तांना **कुमाराच्या** आवाजांतील उत्सुकता, उतावीळपणा आणि संशय कोणाहि सूक्ष्म शोधकांस सहज दिसून आला असता.

" तो मला सांपडल्यानंतरच्या त्या गोष्टी. मला त्याच्याशीं पुष्कळच बोलायचं आहे. आणि तेंहि फार महत्वाचं आहे. " कुमाराची उत्कंठा वाढविण्याकरितांच फकीर हें बोलत होता.

" आपला गांव कोणता? आपण आज कुठून आला? "

" मी आज बरेच दिवस या काशी क्षेत्रांत त्याच्या शोधांत आहें. आतां फकीराला गांव कुठला असायचा? मक्कामदीना हाच त्याचा गांव. तिथून तो जगभर फिरत जातो. "

" तें सर्व ठीक आहे. पण मक्कामदीनाची यात्रा करणारा फकीर माझ्यासारख्या **ब्राह्मण-कुमाराच्या** शोधार्थ कशाला फिरत राहील? मला आपल्याविषयीं शंका येते! "

" असं म्हणतां? माझ्याविषयीं शंका येते आपणाला? काय बरं, काय शंका येते? "

" कीं तुम्ही खरे फकीर नसाल अशी. "

" कशावरून? "

" तें सांगतों, पण तुम्हांला **ब्राह्मण-कुमाराला** काय सांगायचं होतं? "

" पण मला पाहिजे तो **ब्राह्मण-कुमार** तुम्हीच असें मी कसें मानूं? "

" कां बरं? तुमच्या **ब्राह्मण-कुमाराला** कांहीं विशेष खुणा आहेत काय? तुम्हांला कोणताहि **ब्राह्मण-कुमार** नाहीं चालायचा? "

" मी मघाशींच नाहीं कां म्हटलं कीं, **मुसलमान** असून **ब्राह्मण** झालेला **कुमार** मला पाहिजे म्हणून. "

" **मुसलमान** असून **ब्राह्मण** झालेला? तो कसा? **हिंदु** लोक **मुसलमानास** आपल्या धर्मांत घेत नाहींत हें तुम्हांला ठाऊक नाहीं काय? "

" खुळे बिचारे, दुसरें काय? **मुसलमानाला** म्हणे **हिंदु** करून घ्यायचें नाहीं. एखाद्या **मुसलमानाची** इच्छा असली तर त्यांनीं कां घेऊं नये? तुमची इच्छा असेल तर मी तुम्हांला **मुसलमान** करून घेईन. "

" म्हणूनच मी म्हणतों कीं तुम्ही खरे **फकीर** नाहीं. "

" माझ्या **फकीरीवर** हा तुम्ही दुसऱ्यांदा आक्षेप घेतला. आणि त्यामुळें मला आतां तुमचाहि संशय येऊं लागला आहे, कीं—"

" कीं काय? तें बोला—बोला. काय तुम्हांला माझा संशय येतो, तो बोला तर खरें. "

" कीं तुम्ही खरे **ब्राह्मण-कुमार** नाहीं. "

**कुमार** तत्क्षणींच चरकला.

" पाहिलंत " तो **फकीर** म्हणाला; " माझी परीक्षा खरी आहे. तुम्ही **मुसलमान** आहांत. तुम्ही **ब्राह्मण** नव्हे. तुमच्या मनांत **ब्राह्मणाचें** सोंग घेऊन कांहीं तरी कावा साधावयाचा आहे. मला पाहिजेत ते तुम्हीच, असें आतां मला खात्रीपूर्वक वाटूं लागलें. खरें ना? "

**कुमारानें** त्या **फकीराचे** एकदम दोन्ही पाय धरले. तो थिजून गेला.

" माफ करा. " तो म्हणाला, " मोठ्यानें असें बोलूं नका. तुम्ही खरोखर कोण आहांत, तें मला अगोदर सांगा. "

" तेंच तर आतां मला सांगायचें आहे. आपण येथून जरा दूर जाऊं. **फैझी**! ओहो—चुकलों **कुमार**! " तो **फकीर** जीभ चावून म्हणाला.

आतां तर त्या **कुमारानें** त्या **फकीराच्या** तोंडावर हातच ठेवला. **फकीरहि** हांसला. काळोखांतून ते दोघेहि दूर एका बाजूस जाऊं लागले. ते निमूटपणें चालले होते.

इकडे ताई काशीविश्वेश्वराचें दर्शन घेऊन फिरून आश्रमांत येण्यासाठीं निघाली. तिनें इकडेतिकडे पाहिलें. तिचा सोबती कुमार तिला कुठें दिसला नाहीं. तेव्हां त्याची संध्योपासनेची जागा हुडकायाला ती गेली. पण तिथेंही तो नव्हता. घाटावरही नव्हता. चांगला काळोख पडेपर्यंत तिनें त्याची वाट पाहिली. कुमार तिला कुठेंही दिसला नाहीं. मग ती एकटीच आश्रमाकडे जाऊं लागली.

जातांना किती तरी विचार तिच्या मनांत येत होते, आणि ते सगळे कुमारच्याचबद्दल होते. कुमाराच्या विचित्र वर्तनाचा उलगडा तिला होत नव्हता. तो आपल्याबरोबर देवदर्शनाला कधींच येत नाहीं हें कसें? शिवाय आपल्यापेक्षां जास्त उपवास करतो, पचांगांत, हिंदुधर्मआचारांत प्रचलित असलेल्या उपासांच्या अथवा सणावारांच्याशिवाय आणखी निराळे उपासतापास व सणवार तो पाळतो, असा संशय तिला आला होता. आपल्या खोलींतलि पोथी तो आपल्याला पहायला देत नाहीं. शपथ घालतो. कित्येक दिवस तासाचे तास तो आपल्या खोलींत दार मिटून घेऊन बसतो! तर कित्येक आटवडेच्या आठवडे आणि पंधरवडे तो बाहेरच्या बाहेरच घालवितो ! हा प्रकार आहे तरी काय? बाबांच्या कांहीं ठराविक आज्ञा तो पाळतो. कांहीं आज्ञा आपल्याच्यानें पाळवत नाहींत म्हणून विनयशीलतेनें सांगतो ! काय हें विक्षिप्त वर्तन! हा कोणी स्वर्गभ्रष्ट योगी आहे कीं माथेफिरू आहे?

पण त्याच्या मुद्रेवरचें तें तेज! विद्याभ्यासंगांत त्याची असाधारण बुद्धिमत्ता आणि कालपनातीत स्मरणशक्ति! प्रेमळपणा, साधेपणा आणि नम्रपणा, किती तरी त्याच्या ठिकाणीं. ताईच्या मनांत त्याचें चरित्र या वेळीं अगदीं मूर्तिमंत प्रगटलें

होतें; नव्हे तें नेहमींच तसें प्रगट होत असे. तिला त्याच्याबद्दल फारच स्नेह वाटूं लागला होता. पण तिला एक अंदेशा वाटत असे. आपण त्याच्यावर जसा स्नेह ठेवितों तसा स्नेह तो आपल्याबद्दल बाळगतो कां? ती बारीकसारीक कृति देखील लक्षांत आणून तोलूं लागली. तिचें मन तिला सांगूं लागलें कीं, **कुमार** प्रेमळ आहे, पण अनासक्त आहे. आपल्याशीं तो स्नेह ठेवतो. तो कृतघ्न तर मुळींच नाहीं. विक्षिप्त आहे अथवा अनासक्त आहे. विद्याध्ययन संपल्यावर तो निघून जाणार म्हणतो, पण कुठें म्हणून विचारलें, तर मात्र उत्तर देत नाहीं! आईबापांचा ठावठिकाणा नाहीं! घरादाराचा मागमूस नाहीं! भावाबहिणींची आठवणच नाहीं! म्हणजे हा काय आकाशांतून खालीं उतरला कीं पाताळांतून वरतीं आला!

पण आतां आधीं **कुमार** गेला कुठें? ती असे विचार करीत आश्रमांत आली. पण तिथें तर **कुमार** नव्हता. मग **कुमार** गेला कोठें? त्याला आठवडेच्या आठवडे बाहेर काढावयाची संवय आहे खरी, पण तो आपल्याला सांगितल्याशिवाय कधीं असा एकदम नाहींसा होत नाहीं.

कांहीं वेळानें **महंत** आश्रमांत आले. दोघांनींहि एकमेकांकडे कुमाराचा तपास केला. दोघांनाहि त्याच्या नाहींसें होण्याचें नवल वाटलें. पण **महंत** मुलीला म्हणाले.

" येईल कुठून तरी रात्रौ. तो एक **अवलिया** आहे. "

" आहे खरा **अवलिया**! " ताई म्हणाली.

---

# प्रकरण बाविसावें.

## परस्परांची आणभाक.

फैझी खरोखरच एक वलीच होता. तो **काशी** येथें त्या फकिराबरोबर बोलत असतांच तिकडे **हुसेन** त्याच्या खुनाच्या चित्तक्षोभानें जळफळत होता. हुसेन पुन्हां **जोरावरसिंगा**कडेच जावयास निघाला. तो जावयाच्या पूर्वींच **शेकमुबारिक** तेथून **शिक्रीला** जाण्यासाठीं निघाला होता.

**मुबारिकला फैझी**बद्दलच बातमी–कुशलवर्तमान मिळवावयाचें होतें. त्याला परस्पर तें वर्तमान मिळाविणें शक्य नव्हतें. बादशहानें त्याच्या संमतीनेंच **फैझीला** अज्ञातवासांत ठेविला होता. वेदवेदांगांचें ज्ञान संपादून तो आला कीं, त्याच्या वैभवाला तोडच रहाणार नाहीं, याची **मुबारिकला** पक्की खात्री होती. दिल्लीचा सम्राट होऊन **अकबरशहाला** जन्माचें इतिकर्तव्य म्हणून ज्या कांहीं गोष्टी करावयाच्या होत्या. त्यांपैकीं वेदग्रंथांचें ज्ञान ही एक होय. **रामायण, महाभारत, भागवत** आदि करून ग्रंथ त्याच्या हस्तगत होऊन त्यांचीं फारशींत भाषांतरें सुरू होतीं. **स्मृत्या** व **उपनिषदें** मिळविण्याची खटपट अनेक रूपांनीं अखंड सुरू होती. **दीनेइलाहि** धर्माच्या स्थापनेचा मूळ पाया रचला जात होता. तो असा कीं, प्रत्येक धर्मांतलें एकेक उदात्त तत्त्व घेऊन तें इतर धर्मांतील समान तत्त्वाशीं ताडून पहावयाचें आणि अनेक धर्मांत जीं समान तत्त्वें असतील तीं सर्व एकत्र करावयाचीं.

गरीब याचकास दान, हेंच एक तत्त्व घेतलें, तर तें कोणत्याहि धर्मांत समाविष्ट केलेलें आढळतेंच. अशाच प्रकारचीं सर्वसामान्य सर्वसंमत अशीं तत्त्वें संकलित होत होतीं. पण या गोष्टींला बदाउनीची प्रथमपासूनच संमति नव्हती. तो हजर राही तो तिऱ्हाईत म्हणून किंवा इस्लामी धर्माच्या वर्तानें इतरांस विरोध करण्याकरितां म्हणून हजर रहात असे. **बदाउनी, फाझलचा** पाडाव करण्याला टपलेला होता. बादशहाची शासनपद्धति तर त्याला अगदींच नापसंत होती. तर्शांत हल्लीं ज्या ज्या गोष्टी

घडल्या, त्या सगळ्या मुत्सद्यांचा विचार घेतल्याशिवाय आणि कांहीं तर बादशहानें स्वतःच्याच इच्छेनें घडविल्या होत्या. त्या सर्व **बदाउनी**प्रभृतींस नापसंत होत्या. **फैझीला** आग्र्याहून आणून **दिल्लीच्या** मद्राशांत न ठेवतां **विश्वंभर**शास्त्र्याकडे ठेवलें ही एक गोष्ट. पुढें तिथून उचलून त्याला अज्ञातवासांत पाठविलें ही दुसरी. **फाझलला** आणून एकदम उच्च पदवीस चढविलें ही तिसरी. **मुबारिकवर** विशेष मेहेरनजर ही चवथी; सती जाण्याला खुद्द राजधानीच्या सीमेवर हिंदु स्त्रीला परवानगी ही पांचवी, आणि सर्वांत वाईट आणि **बदाउनी**सारख्याला क्रोधसंतप्त करणारी सहावी गोष्ट म्हणजे **जलालुद्दीनला** कारागाराचा रस्ता दाखविणें ही होय.

या शेवटच्या गोष्टीनें बऱ्याच जणांचें मन खवळून गेलें. मुत्सद्यांचे निरनिराळे संघ एकत्र जमून याविषयीं चर्चा करूं लागले. पण त्यांचे पुढारी जे **बदाउनी** आणि **शिरहिंदी** त्यांना मात्र या बाबतींत आक्षेप घेण्यास **अकबरानें** जागाच ठेवली नव्हती. इतकेंच नव्हे तर आपणांस देखील गुप्त कारस्थानें रचण्यांत धोका आहे इतकी दहशत त्यांना बसली होती. **जलालुद्दीन** खराखुरा अपराधी होता, हें त्यांना बादशहानें त्या रात्रीं मारेकऱ्यांचा वेष त्यांना देऊन दाखवून दिलें होतें. त्याअर्थी इतर लोकांस प्रत्यक्षपणें बादशहाविरुद्ध गैरसमजुतीची लाट उठविणें त्यांना अशक्यच होतें. पण खासगी अथवा अप्रत्यक्षपणें बादशहाविषयींच्या वाढत जाणाऱ्या मुसलमानांच्या असंतोषास हातभार लावण्याकडेच त्यांच्या धोरणाचा कल होता.

**जोरावरसिंगाला** आतां आपला डाव साधावयास उत्तम संधि आली होती. **जलालुद्दिनाला** कैद केलेला त्याला ठाऊक होताच. अस्सल रजपूत तो. पण त्याला सुद्धां **अकबरा**विषयीं आदर उत्पन्न झाला होता. पंडितजी धर्मांतर करून मुसलमान झाले, त्याचें खरें इंगित त्याला समजलें होतें. पण अशा बादशहाच्या सान्निध्यासाठीं एकादा लेचापेचा मनुष्य धर्मांतरित फसून जरी झाला असता, तरी त्याबद्दल त्याला आश्चर्य वाटलें नसतें. कारण बादशहाचें सौजन्य तसेंच होतें. वर सांगितल्याप्रमाणें कडव्या मुसलमानांस बादशहाचें धोरण असंतोषोत्पादक वाटत होतें, पण त्यांतल्यात्यांत एक गोष्ट त्यांना आवडण्यासारखी झाली होती आणि ती म्हणजे पंडितजीचें धर्मांतर ही होय.

वरील अनेक अप्रिय गोष्टींमुळें खवळणारीं कडव्या मुसलमानांचीं मनें **विश्वंभरशास्त्र्याच्या** धर्मांतरानें आनंदित झालीं होतीं. अकबरानें स्वतःची भीड घालून पंडितजीला मुसलमान केलें, अशी त्यांची समजूत होती; आणि तशी समजूत होण्यासारखेंच अकबराचें दुटप्पी वर्तन होतें. पंडितजी मुसलमान होण्यापूर्वीं त्याला इतमाम आणि नेमणूक बादशहानें सुरू केली होती. मुसलमान झाल्याबरोबर त्यानें त्याला धर्मसभेचा सभासद केला होता. त्याच्याकडून हिंदुधर्माचे महत्त्वाचे अनेक ग्रंथ पैदा करविले होते. तेव्हां या सर्व गोष्टींवरून सरळच अनुमान निघत होतें कीं विश्वंभरशास्त्र्याला मुसलमान करण्यांत बादशहाच्या वजनाचा बराच भाग आहे. शिवाय

अकबरानें राणा **प्रतापसिंहाबरोबर** वर्षानुवर्ष मोहीम चालविलीच होती. तेव्हां अशा त्याच्या कांहीं कृत्यामुळें बिथरलेलीं डोकीं पुन्हा शांत होत असत. अकबर आपल्या मुत्सद्यांचे उघड आणि गुप्त विचार जाणून होता. आपलें सिंहासन स्थिर राखावयास राज्यनौकेचें सुकाणूं कसें मधोमध चालविलें पाहिजे, हें त्याला चांगलें समजत होतें.

**जलालुद्दिनला** कैद केल्यानंतर थोडीबहुत चळवळ उडणार हें त्याला ठाऊक होतें. पण त्याला शिक्षा करावयास त्याला आतां अडचण वाटत नव्हती. तशी शाबिती करून देतां येण्यासारखी होती. परंतु जिला त्यानें छळली होती ती सति आतां या जगांत नव्हती. म्हणून त्यानें खटल्याचा निकाल **बदाउनी** आणि **शिरहिंदी** यांनींच द्यावा असें फर्माविलें. मात्र शिक्षा कोणती द्यावी याचा ठराव अद्याप व्हावयाचा होता. तोंपर्यंत त्याला कैदेची शिक्षा देण्यांत आली होती.

**फैजीच्या** कुशल वर्तमानाला पाठविलेला माणूस अद्याप आला नाहीं कसा याची काळजी **अबदुल्ला** आणि **जोरावरसिंग** करीत **शिवशर्म्याबरोबर** बोलत बसले होते. तोंपर्यंत अबदुल्लाच्या हाताखालीं वीरसिंहाच्या तोंडीला रतनसिंहाच्या ऐवजीं आपला एक माणूस चालण्यासारखा असल्यास द्यावयाचें कबूल केलें होतें. पण त्याला एकदम हो म्हणतां येईना. **अकबरशहा, पंडितजी** व त्याचे **शिवशर्मा जोरावरसिंग** वगैरे अनुयायी त्यांच्याशीं स्नेहानें वागतात हें त्याला समजून आलें होतें म्हणून आपल्या विश्वासू हेरांच्या मदतीस जरूर पडल्यास एखादा मठांतलाच माणूस द्यावयाचें त्यानें ठरविलें होतें.

**जोरावरला दिल्लींत** आल्यापासून एक नवीन छंद लागला होता आणि तो म्हणजे फार जुनाट काळापासून दृष्टीआड असलेलीं भुयारें शोधण्याचा व त्यांचे मार्ग शोधून काढण्याचा हा होय. **हुसेननें** दाखविलेल्या भुयाराला अनेक दरवाजे व अनेक शाखा असल्या पाहिजेत अशी त्याची समजूत होती व त्याप्रमाणें फुरसतीचा वेळ तो या गुप्त मार्गाचे शोध लावण्यांत आपल्या सोबत्यांना बरोबर घेऊन घालवीत असे.

एके दिवशीं तो त्या भुयारांतून निघाला तो त्या भुयाराच्या दोन्ही बाजू तपाशीत चालला. जी वाट मोडक्या इमारतीच्या तळघरांत गेली होती तिला आणखी एक दरवाजा असावा असें त्या किती दिवस तरी वाटत होतें. त्याला भिंतींत एके जागं एक लोखंडाची वाटोळी कडी भुयाराच्या एका भिंतीला लटकत असलेली दिसः दुरून दिसतांना जमिनींतून बाहेर आलेलें झाडाचें एखादें पाळ सुकलेलें असावें थेट ती कडी दिसत होती. त्यानें सहज त्या कडीला हात घातला व ती ओ तोंच एका माणसाला आंत शिरण्याएवढा सुंदर दरवाजा त्या ठिकाणीं तयार त्या दरवाजानें आंत उतरून तो चालू लागला. तों त्याला समोरून आडवें

दुसरें भुयार लागलें. या भुयाराला हें त्याच्या पायाखालचें भुयार जाऊन मिळालेलें होतें. येथें आल्यावर त्याला कोणत्या वाटेनें अगोदर जावें हा विचार पडला. शेवटीं त्यानें प्रथम उजव्याच बाजूनें जावयाचें ठरविलें. त्यानें आपल्याबरोबरच्या माणसांकडे शस्त्रें दिलीं होतीं. आणि हातांत दिवटी घेऊन तो पुढें चालला होता. बराचसा मार्ग चालून गेल्यावर त्याला अगदीं प्रशस्त अशी जागा लागली. हा भाग अनेक वर्षांपूर्वी उत्तम शृंगारलेल्या स्थितींत असावा असें त्याला वाटत होतें. कदाचित् तो दिवाण-खानाच असावा. एखाद्या मोठ्या प्रचंड वाड्याचें तें तळघर असावेसें वाटत होतें. पण त्यांतून पुढें जावयाला मार्गच नव्हता. चारी बाजूंना उंचच उंच भिंती होत्या आणि गंजून पडलेलीं शस्त्रें होतीं.

आतां त्याला भुयाराचे मार्ग शोधण्याची बारीक नजर प्राप्त झाली होती. उपे-क्षणीय व क्षुल्लक दिसणाऱ्या वस्तूंस देखील तो हात लावून पहात असे. एका भिंतीच्या कोपऱ्यांत एक दोर लोंबत असावासा त्याला वाटला. म्हणून त्यानें हात घातला तों तो विळविळीत लागला! त्यानें आपला हात मागें घेतला, त्याबरोबर जवळच्याच एका लहानशा बिळांतून तो विळविळीत दोर नाहींसा झाला. दोर कसला? तो एक जातीचा सापच होता. दंश केल्याशिवाय आपण सुटलों याबद्दल त्यानें परमे-श्वराचे आभार मानले आणि तरवारीच्या टोंकानें परतून पाहिल्याशिवाय कशालाहि हात न लावण्याचा धडा त्याच्या मनावर चांगलाच ठसला. नंतर त्यानें दिवटीनें अगदीं बारकाईनें थोडथोड्या जागेचें सूक्ष्म निरीक्षण चालविलें. तों दुसऱ्या एका कोपऱ्यांत बिळासारखेंच त्याला काळें वर्तुळ दिसलें. तरवारीचे टोंकानें त्यानें तें चाच-पडून पाहिलें, तों तरवारीचे टोंक आंत न रिघतां खट्खट् आवाज झाला. तें वर्तुळ पोकळ नसून भरींव आणि कठीण होतें. जोरावरला या चमत्काराचें नवल वाटलें. त्यानें भीत भीत हळूच हात लावला. तों ती लोखंडाची चाती असावी असा त्यास भास झाला. त्या चातीला ओढायला कडी वगैरे कांहीं नव्हतें. तरीहि त्या चातींत अगदीं मध्यबिंदूच्या ठिकाणीं एक लंब वर्तुळाकृति भोंक होतें. एका दांडगट सुऱ्याच्या टोंकानें त्यानें त्या चातीसभोंवारची भिंत खरचटली; आणि अर्ध इंचाइतका भाग मुठीसारखा मोकळा करून तो धरून ओढला. त्याबरोबर त्या ठिकाणीं सरळ जिनाच तयार झाला! तो जिना आतांपर्यंतच्या भुयाराहून अगदीं स्वच्छ आणि सुंदर होता. आंत जावयाला भीति वाटण्यासारखा नव्हता.

जिना चढून ते दोघेहि वर आले तों पुढें असलेल्या **जोरावरचें** मस्तक जोरानें आदळलें. पुढें त्याला लहान लहान सोपानांनीं चढावें लागत होतें. सभोंवतीं पाहिलें तों आपण अगदीं एका निमूळत्या विवरांत आलों आहों असें त्यास वाटलें. ती एक मोठी भिंतच होती. आणखी थोडें पुढें गेल्यावर त्याला पूर्वीच्यासारखी एक चाती दिसली. तिची मूठ ओढावयास मिळण्याइतकी बाहेर होती. ती त्यानें ओढतांच बाहेरचा अर्धाअधिक खडक बाजूस सरकला आणि बाहेरचा प्रकाश त्याला

आंत दिसूं लागला. त्यानें मान बाहेर काढून पाहिलें तों शिवपिंडिकेचें देवालय !

महादेवाच्या पिंडीचें हें देवालय त्यानें पूर्वीं प्रसंगोपात्त एकदोनदां पाहिलें होतें. हेंच तें सध्यांचें परकोटाचें मैदान; यालाच अझूनही पांडवकिल्ला म्हणतात. त्यावेळीं देखील यांला पांडवकिल्लाच म्हणत असत. परकोट सभोंवतीं होता. ज्या दारांतून तो बाहेर आला होता, तो पूर्ववत् त्यानें करून पहातांच त्याला एक नुसती ओबडधोबड मोठ्याशा शिळेची आकृति दिसली. त्या शिलेला वेड्यावांकड्या अनेक भेगा पडलेल्या होत्या. त्यांपैकीं एका भेगेंतून शिलेचा तुकडा बाजूस सरकून आंत शिरण्याचा मार्ग तयार होत असे. जोरावरसिंग व त्याचा सोवती यांनीं भक्तिपूर्वक महादेवास नमस्कार केला व ते आल्यामार्गानें मागें परतले. जातांना त्यांनीं सर्व खाणाखुणा नीट तपासून लक्षांत ठेवल्या. येतांना त्यांना आपण किती दूर आलों हें समजलें नव्हतें. जातांना त्यांनीं भुयाराचें अंतर पाहिलें तों सरासरी सव्वा मैल असावेंसें त्यांना वाटलें. दुसऱ्या खेपेस त्यांनीं आडव्या भुयाराची डावी बाजू तपासावयाची ठरविली. जसे दरवाजे उघडीत ते गेले होते, तसेच पुन्हा बंद करीत करीत ते दोघेहि परत फिरले; आणि आपल्या मठाकडे येऊन दाखल झाले. आपल्या कामास असल्या भुयारांच्या मार्गाचा एखादे वेळेस उपयोग करून घेतां येईल असें जोरावरसिंगास वाटत असे.

**बदाउनी** गेल्यानंतर **अबदुल्लाखानही** येऊन गेला आणि आपण तलास लाविलेल्या निरनिराळ्या भुयारांच्या मार्गाची हकीगत **जोरावरसिंग शिवशर्म्यास** सांगत होता. **शिवशर्मा** आतां मठपति झाला होता म्हणून तो पूर्वींसारखा फारसा बाहेर पडत नसे. शिवाय मठाचें म्हणजे पंडितजींचें वार्षिक वेतन आतां त्याला मिळालें होतें. तेव्हां त्याला तितकी यातायात काढण्याची जरूरही नव्हती. परंतु खरी गोष्ट अशी कीं त्यानें लोकांस आतांपर्यंत फसवून धर्मग्रंथ मुसलमानांस मिळवून दिल्यामुळें सगळा ब्राह्मणसमाज त्याला ठेंचून टाकण्यास तयार झाला होता. पंडितजीला मारण्याकरितां क्षेत्रस्थांनीं जे लोक पाठविले ते परस्परांच्या हातूनच कसे बेपत्ता झाले हें बऱ्याच दिवसांनीं पाठविणाऱ्यांस कळलें. त्यानंतर दक्षिणेकडून दिल्लींत येऊन बसलेले **पंडितजी** नामधारी ब्राह्मण बाटून मुसलमान झाल्याची वार्ताहि हळूहळू देशभर जिकडेतिकडे पसरली. त्यामुळें तर क्षेत्रस्थ ब्राह्मणांना विश्वंभरशास्त्र्याचा फारच राग आला. त्याच्या जागेवर त्यांच्या हस्तकाची—**शिवशर्म्याची** स्थापना झाल्याचें ऐकून तो कसा तावडीस मिळतो याची सारेजण वाट पहात राहिले होते. हें वर्तमान **शिवशर्म्यास** ठाऊक होतें. म्हणूनच तो आतां स्वतः पूर्वींसारखा बाहेर पडावयास तयार नव्हता. आभ्यास तर तो मुळींच गेला नसता. त्याला त्या मुसलमान वेषधारी रजपुताकडे दिलेली शपथ क्षणोक्षणीं आठवत असे. **पंडितजी शेखभावन** झाल्यापासून **शिवशर्मा** स्वतः पंडितजी झाले.

एवढ्यांतच हुसेनची स्वारी कांहींशी कोपसंतप्त, कांहींशी भेदरट अशा स्वरूपांत

घेऊन ठेपली. जोरावरसिंग व शिवशर्मा ऊर्फ नवे पंडितजी यांनीं त्याचें शांत शब्दांत स्वागत केलें. शिवशर्मा त्या दोघांच्या खलबतांत अजून तितकासा मिसळत नसे. अर्थात् तो उठून गेला. त्यानें आपलें देवालयांत नैमित्तिक सायान्हिक सुरू केलें.

**शिवशर्मा** उठून गेल्यावर **जोरावरसिंग** आणि **हुसेन** हे दोघेच तेथें राहिले. हुसेननें आल्याबरोबर आपला पाढा वाचावयास सुरुवात केली!

" आमच्या धनीसाहेबांना पकडून कैद केलें! "

" म्हणजे? " आश्चर्यचकित होऊन जोरावरसिंगानें उलट त्याला विचारलें.

" म्हणजे साराच अन्याय! "

" मी तरी कुठें न्याय होतो असें म्हणतों? "

" तुम्ही कशाला म्हणाल? विश्वास दाखवून विश्वासघात करायची संवयच आहे लागलेली तुम्हांला! "

" हुसेनभाई! असलें मोघम नका बोलूं. स्पष्ट होऊं द्या काय व्हायचें असेल तें. "

" त्या रात्रीं सतीला ठार मारण्यासाठीं मी तुमच्या हवालीं केली असतां तुम्ही तिला जिवंत कशी सोडलीत? "

" पण तुम्हांला ठाऊक नाहीं, मध्यंतरीं काय घोटाळा उडाला तो? हं! तरीच! आतां आलें माझ्या लक्षांत, तुम्ही माझ्यावर इतके कां रागावलांत ते. मी त्या मारेकऱ्यांबरोबरच मारेकऱ्यांचा वेष घेऊन तुमच्याकडे आलों. पण बादशहाचे गुप्त हेर आहेत ना? त्या हेरांनीं आपल्याला हेरलें असलें पाहिजे असें मला वाटतें. सतीला कुठें तरी न उमगेल अशा ठिकाणीं पाठवून द्यावी अशी माझी इच्छा होती. तोंपर्यंत तिला लपवून कुठें ठेवावी याचा मी विचार करीत असतां तुम्ही परतून गेल्यावर आम्ही भुयारांतून मागें परततों तों सरकारी हुकूम घेऊन हेरांचा नायक आमच्या समोर उभा! आणि हुकूम काय? तर सतीला हिंदुधर्म पद्धतीनें पंडितजींच्या मठामार्फत सती जाण्याची परवानगी. त्याप्रमाणें आम्ही सर्व विधि आटोपला. पण यांत तुम्हांला घाबरून जाण्यासारखें कांहींच नाहीं. तुम्ही उगीच माझ्यावर रागावतां झालें. तुम्ही आतां **बदाउनीकडे** सुद्धां राहूं नका. मी तुम्हांला कारभारीसाहेबांच्याकडेच लावून देण्याची तजवीज करीत आहें. म्हणजे तुम्ही नेहमीं **नूरजहानच्या** बरोबर रहावयाचें. या युक्तीनें युवराज **सलीमाची** तुमच्यावर मर्जी सुप्रसन्न राहील, आणि तुम्हांला लवकरच हवी तशी संधि मिळेल. आतां **मुबारिकला** मात्र अद्यापपर्यंत ठेवून घेऊन मी बरीचशी माहिती मिळविली. **जलालुद्दीनवर** त्यानें सतीला छळल्यामुळें आणि बंगालच्या मोहिमीवर पाठविलें असतां दिरंगाई केल्यामुळें बादशहाचा फारच कोप झालेला आहे. तथापि धन्याला सोडवावयाचाच असेल तर मी तुम्हांला एक युक्ति सुचवीन. पण मला विचार करायला अजून चार दिवस अवधि पाहिजे. "

" आतां मला तुमची कोणतीच युक्ति नको आहे, आणि **जलालुद्दिनाला** मी तुमच्या आतां स्वाधीन करणारहि नाहीं."

" ठीक आहे. म्हणजे **फैझीचा** पत्ता काढण्याची दगदग, **फाझलवर** तुझी उडी जाईल असले जोखमीचे डाव टाकण्याची यातायात, आणि गरीब **मुबारिकला** फूस लावून इकडे आणण्याचें पाप, या खटपटी तरी मला करायला नकोत."

**हुसेन** हें **जोरावरसिंगाचें** भाषण ऐकत स्वस्थ उभा होता. त्याला आपण त्याचें बोलणें मानावें कीं मानूं नये हेंच ठरवावयाचें होतें. **जोरावर**शिवाय त्याचें बिंग कोणाला माहीत नव्हतें, पण जोरावरला त्याचा दुष्ट हेतु ठाऊक होता. जोरावरसिंगाला बिथरूं देऊन त्याला कांहींच फायदा झाला नसता.

पण **जोरावरसिंगाचा** बेत काय होता? **हुसेनचा** द्वेष मुबारिक आणि त्याचे दोघे मुलगे· यांच्याविषयीं किती खोल गेलेला—किती कडेलोटाला पोंचलेला आहे—हें जोरावरसिंगाला समजलें होतें. हे तिघे गृहस्थ किती पापभीरु, किती सालस, किती उदारमतवादी, किती नीतिमान् होते हें ठाऊक होतें. खरें म्हटलें, तर जोरावरसिंगासारख्या तडफदार शिपायानें हुसेनाला केव्हांच त्याच्या पापी विचारांचा मोबदला द्यावयाचा होता. पण तुझ्या शत्रूला आणि तुझ्या पातिव्रत्याची विटंबना करणाऱ्या नराधमाला मी योग्य प्रायश्चित्त स्वतःच्या हातानें देईन अशी त्यानें शपथ घेतली होती. कैदेंत अडकविला गेल्यानंतर **जलालुद्दिनाला** बादशहाच शिक्षा करील, तर आपली प्रतिज्ञा अपुरी राहील, ही धास्ती त्याला आतां पडल्यामुळें तें काम शक्य तितक्या तडकाफडकीनें त्याला उरकावयाचें होतें. पण **हुसेनला** त्यानें सहाय्य करण्याचें तर कबूल केलें होतें. **हुसेनच्या** वर्तनाचा त्याला अतिशय तिरस्कार आला होता. कांहीं एक अन्याय नसतां एका मुलास त्यानें ठार मारला होता व आणखी तीन सज्जनांना तो मारावयास टपला होता. त्यानें थोडीशीच जरी जीभ हालविली असती तरी हुसेनचा कायमचा बंदोबस्त झाला असता. पण **हुसेनचें** पुढें काय करावयाचें हा विचार आज त्याला ठरवावयाचा नव्हता. त्याला चुचकारून धरून आपली प्रतिज्ञा पार पाडल्यानंतर मग हुसेनचा विचार. तथापि आपल्या बोलण्यांत कांहीं तरी सत्य आहे असें वाटलें नाहीं तर निराश झालेला हुसेन विनाकारण फिसकटणार असें त्याला वाटलें.

" मग माझी पुढें व्यवस्था काय? " **हुसेननें** निराशेनें विचारलें.

" अगदीं सोळा आणे चोख व्यवस्था! "

" ती कशी तें तर कळूं द्या. " **जोरावरसिंगानें** आपली व्यवस्था नव्या कारभाऱ्याकडे लावून देतों म्हटलें, तेव्हां **हुसेन**भाईलाहि जरासा आनंद झाला. म्हणूनच त्यानें पुन्हा तोच प्रश्न विचारला होता.

" शिक्रीवरून मुक्काम हालला कीं, पुढच्या मुक्कामाला कारभाऱ्यांच्या **नूर-जहानकडे** तुझी कायमची नेमणूक. "

" खरें कशावरून ? "

" अनुभवावरून. नुसतें तोंडानें बोलण्याचें काम आमचें नाहीं, तें तुमच्या-सारख्यांचें. "

" अनुभव किती दिवसांनीं येईल ? "

" **जलालुद्दिनाची** आमची गांठ पडल्यानंतर. "

" तें तर आतां अशक्य आहे. " **हुसेन** म्हणाला.

" शक्य आहे ? "

" मला तरी अशक्य आहे. "

" तुम्हांलाहि शक्य आहे. "

" कसें तें ? "

" मी सांगतों तसें. "

" मग सांगाना आतांच ? "

" नाहीं. आणखी चार दिवसांचा अवधि पाहिजे. तोंपर्यंत **शिक्रीचा** मुक्काम **आग्र्याला** जात नाहीं. "

" मला वचन पाहिजे. "

" मी सांगेन त्याप्रमाणें वागून **जलालुद्दिनाला** माझ्या स्वाधीन कराल ना? शपथपूर्वक ? "

" हें घ्या वचन. "

" मीहि तुम्हांला कारभाऱ्याकडे देतों लावून. हेंच घ्या वचन. "

# प्रकरण तेवीसावें.

## बादशहाच्या जीवावर.

मागील प्रकरणांत सांगितलेली आणाभाकांची हकीकत घडल्यानंतर **जोरावरसिंग** डावीकडच्या भुयाराच्या शोधाला लगेच लागला. **जलालुद्दिनाला** कैदेंत घातला होता. पण तो एका जुनाट वाड्यांत घालला होता. या वाड्यांतील एका खोलींतून शीळ घातल्यासारखा आवाज मधून मधून येत असतो, असें पहारेकरी म्हणतात अशी बातमी **अबदुल्ला**च्या तोंडून त्यानें ऐकली होती. तेव्हां **अबदुल्ला**कडून त्यानें त्या जागेच्या खाणाखुणा विचारून घेतल्या होत्या. त्याचें मन आतां भारीच संशोधक बनत होतें.

पूर्वीच्याप्रमाणेंच तो भुयारांतून खालीं उतरला आणि आपल्या सोबत्यासह हळुहळू दिवटीनें मार्ग शोधीत चालू लागला. हा मार्ग पूर्वीच्या त्या उजवीकडच्या भुयाराप्रमाणें सरळ नव्हता. नागमोडी वळणांनीं हा मार्ग गेलेला होता. या निरनिराळ्या वळणांच्या जागीं कड्या आणि चात्या त्याला दिसत असत; व त्यावरून दिल्ली शहरांतील निरनिराळ्या गुप्त ठिकाणीं भुईखालून जावयाचे ते मार्ग होते हें त्याला आतां कोणी सांगायला नको होतें. अनुभवाच्या धोरणावरून हे मार्ग, बादशहाचा वाडा, कुतुबमिनार मनोरा, योगमायामंदिर, कुरुक्षेत्राचा भाग व अशोकस्तंभ या व अशाच अनेक जुन्या पुराण्या ठिकाणीं जावयाचे आहेत असा कयास त्यानें केलेला होता. इतके दिवस मठांत राहून आपण फुकट व्यर्थ दवडले असेंही त्याला वाटलें. तथापि पंडितजीला मात्र हे ठाऊक असले पाहिजेत, हें त्याच्या आतां लक्षांत आलें. **पंडितजींनीं** आपणाला अगदीं विश्वासांत घेतला पण फक्त एकच मार्ग दाखवला, बाकीचे मार्ग गुप्तच ठेवले. रात्रौ पंडितजी एकटेच नाहींसे होत ते इकडेच कुठें तरी जात असावेत असें त्यास आतां वाटूं लागलें.

पुष्कळसें अंतर चालून गेल्यावर उजव्या बाजूस त्याला पोकळी दिसली. त्यांत तो शिरला, तेथें त्याला एक लोखंडी दरवाजा लागला. तो त्यानें उघडला. तों आंत भयंकर दुर्गंधी आली. आणखी चार पावलें तो पुढें गेला, तेव्हां ती घाण फारच असह्य झाली. पुढें जाण्याचें धाडस त्याला करवेना. तो मागें परतला आणि पुन्हा पूर्वीच्याच मार्गानें चालूं लागला.

आतां हा रस्ता डावीकडे वळण घेऊन जात होता. त्याच रस्त्यानें तोहि जाऊं लागला, तों त्याला पूर्वीच्याच म्हणजे उजवीकडच्या भुयारांतील शिवपिंडीच्या देवालयाखालील आवाराप्रमाणें मोठें आवार लागलें. विस्तीर्ण दिवाणखाना असावा तसें तें आवार ऐसपैस होतें. तें पाहून त्याला आनंद झाला, कारण आतां येथून लवकरच

बाहेरच्या कुठल्या तरी एखाद्या नव्याच स्थानाला जावयाला त्याला मार्ग मिळणार होता. दिवटीच्या प्रकाशांत तो इकडे तिकडे पहातो तों एका कोंपऱ्यांत त्याला लोखंडी चाती दिसली. एकदम त्यानें हात पुढें घातला. पण तो लगेच मागें ओढला. त्याला त्या विळाविळित सर्पाची आठवण झाली. तरवारीच्या टोंकानें खात्री करून घेतल्यावर त्यानें ती मूठ जोरानें ओढली, त्याबरोबर किंचित् वाऱ्याची झुळुक आंत आली. अगदीं लहानसा एक जिनाही त्याला दिसलाच. पण अगदीं बारीक आणि कर्कश अशी शीळ त्याला ऐकूं आली. ती ऐकतांच मात्र तो चपापला ! त्याचा सोबती यापुढें यावयास बिलकुल तयार नव्हता. ती शीळ ऐकतांच त्याला कांपरें भरलें होतें. ती शीळ कुठून येते हेंच त्या दोघांना कांहीं केल्या समजेना !

आपल्या सोबत्याच्या आग्रहास्तव आपण आतां मागें परतावें असें जोरावरसिंगाला वाटलें. पण तेवढ्यांत त्यास **अब्दुल्लाच्या** शब्दांची आठवण झाली. ज्या अर्थी शीळ ऐकूं येते, त्या अर्थी जलालुद्दिनाला ज्या वाड्यांत कैद केला आहे, तो येथेंच जवळ पास असावा असें त्यास वाटलें. त्यामुळें भीतीचा दाब त्याच्या मनावरचा दूर सरून त्या ठिकाणीं जिज्ञासा येऊन बसली. ती नुसती बसली असेंच केवळ नव्हे, तर त्या चिंचोळ्या जिन्यावरून वर चढून जावयास प्रवृत्त करूं लागली. पण तेवढ्यांत त्याचा सोबती आपल्या कांपऱ्या हातानें जोरावरसिंगाला धरून जवळ ओढूं लागला. त्याच्या मनांत कांहीं तरी बोलावयाचें आहे, हें जोरावरनें ओळखलें. म्हणून आढेवेढे न घेतां तो खालीं वांकला. तेव्हां भिंतीस कान लावावयास त्या सोबत्यानें जोरावरला सांगितलें. जोरावरनें त्याप्रमाणें भिंतीला आपले कान लावले.

" काय हें ? " सोबत्यानें विचारलें.

" आहे झालें कांहीं तरी; चल तूं आपण जाऊं पुढें."

" पण हा दणदणाट तुम्हांला स्पष्ट ऐकूं येतो ना ? "

" मग तें काय आहे असें तुला वाटतें ? "

" भुताटकीशिवाय दुसरें काय असणार ? "

" अमर ! अरे, तुझें अमरसिंग नांव कोणी बरें ठेवलें ? "

" सगळ्यांचीच करणी नांवासारखी असते असें नाहीं. एखाद्याचें नांव असतें रामचंद्र आणि तो असतो मात्र राक्षसी शीलाचा. " अमरसिंग उत्तरला. जोरावर निरुत्तर झाला. शिवाय त्याला या वेळीं वाद नको होता.

" अमरसिंग ! मी पुढें आहे ना ? माझा बळी पडेल, तेव्हां तुझ्या जिवाला धोका. चल माझ्या मागून. "

जोरावरसिंगाच्या या उत्तरानें अमरसिंगाला आपल्या भित्रेपणाची लाज वाटली.

" अमरसिंग, " जोरावर पुढें म्हणाला, " हें भूत नसून भूतासारखे आचार करणारें माणूस आहे. पिशाच्चासारखीं वागणारीं माणसें पुष्कळ असतात. तुला जो

दणदणाट ऐकूं येत आहे, तो भुताटकीचा नसून माणसाचा आहे, हें मी पाहिल्या-शिवायच खात्रीपूर्वक सांगूं शकतों."

"माणूस असला, तर तो राक्षसारखा शक्तिमान् असला तरी मला भीति वाटणार नाहीं. मला फक्त भुताचीच भीति वाटते."

"आतांच त्याचा निकाल होईल, हातच्या कांकणाला आरसे कशाला पाहिजेत ?"

हळूहळू बोलत ते दोघे चालले होते. शिळीचा आवाज आणि पावलांचा आवाज आतां त्यांना अधिक जवळ जवळच ऐकूं येऊं लागला. तोंच दिव्याच्या प्रकाशांत त्यांना लोखंडी वाटोळी कडी दिसली.

ही कडी जोरानें उघडतांच कसलाही आवाज न होतां समोर पोकळी दिसूं लागली. ही पोकळी उघडणाराच्या छातीच्या इतक्या उंचीवर होती. अर्थात् खालीं वांकून पुढें जावें लागणार होतें. वांकून पुढें जावें तर उभें राहतां येत नव्हतें. धड बसतांहि येत नव्हतें. डोकीवर तक्तपोशीसारखें लांकूड लागत होतें. पण तेथेंहि त्याला आणखी एक नेहमींच्याच सारखी लोखंडी कडी लागली. तीहि त्यानें ओढली, तों त्याचे पाय जमिनीला लागले. पण त्याच्या समोर दरवाजा होता आणि तो बंद होता, पण त्याला बारीकशी फट होती. त्या फटींतून आंतील भाग दिसत होता. आंत दोघांचें बोलणें चाललें होतें. एक असामी इकडून तिकडे येरझारा घालीत होता. आणि दुसरा माणूस बसलेला होता. त्या येरझारा घालणाऱ्याचे पाय जमिनीवर पडले कीं त्यांचा आवाज जरी वरून ऐकूं येत नव्हता, तरी तो खालून चांगलाच ऐकूं येत होता. तीच गत शब्दांची. त्यांचें बोलणें अगदीं हलक्या आवाजांत चाललें होतें, पण त्या मघांच्या जागेवरून हें बोलणें ऐकतां येत होतें. ती शीळ या जागेवरून ऐकूं येत नव्हती. हा सारा विलक्षण प्रकार पाहून जोरावरसिंग आणि अमरसिंग दोघेहि विस्मित होऊन गेले !

येरझारा घालणारा माणूस खुद्द **जलालुद्दीन** होता आणि बसलेला माणूस कोणी अनोळखी होता. जलालुद्दीन पहारेकऱ्यास वश करून घेऊन कैदेंतून सुटून जाण्याची खटपट आणि वाटाघाट करीत होता, असें त्यांच्या बोलण्यावरून जोरावरसिंगाला अजमावतां आलें.

"ही बाजू अधिक सुरक्षित आहे, येथून ती भयंकर शीळ ऐकूं येत नाहीं."

"आज मला थोडी तरी झोंप लागेल असें वाटतें."

"वाटतें नाहीं, इथें आपण सुरक्षित आहोंत. इथें भुताटकीची तितकी भीति नाहीं."

"या वाड्यांत असेपर्यंत भीति ही असणारच, पण त्या बाजूच्या इतकी नाहीं एवढेंच."

"मग माझी सुटका कधीं होईल इथून ?"

" तें आतां तुमच्यावर अवलंबून. "

" पण माझ्या मित्रानें तुम्हांला पाठविलें ना ? माझ्या सुटकेकरितां ? "

" म्हणून काय झालें ? तुम्हाला इथून बाहेर काढायचें म्हणजे आमची गर्दन गेली असें मानून चालायचें. मागें जिवंत राहणाऱ्या बायकापोरांची तर तरतूद लावली पाहिजे ना ? "

" मग किती आंकडा तुमचा ? "

" नक्की सांगायचें तर दहा हजार मोहरा. "

" अबब ! काय तुम्ही बोलतां हें ? "

" त्याशिवाय काम होणारच नाहीं. "

" बरं इथून निघाल्यावर पुढें वाट काय ? "

" ज्या दिवशीं बादशहाचा मुक्काम **शिक्रीहून** उठेल, त्याच दिवशीं तुमचा मुक्काम इथून उठेल आणि तुम्ही शिक्रीला पोंचाल. तुमचा निम्मेहून जास्त मार्ग जमिनीखालून असणार. तुम्ही कोणाच्या नजरेस पडणार नाहीं. तुम्हाला वेषांतर करून रात्रीचा मार्ग आक्रमण करावा लागेल. **मुलतानवरून, पेशावरवरून** तुम्ही **काबूलला** जावें, अगर **इराणचा** रस्ता सुधारावा. असा सध्याचा बेत आहे. तुम्हाला प्रत्यक्ष गुन्हेगारींत पकडलें आहे, असें **बदाउनीचें** म्हणणें आहे; आणि या संकटांतून आपणाला तुम्हांला सोडवितां येणें शक्य नाहीं असें त्यांनीं मला तुम्हाला कळवायला सांगितलें आहे. मोठ्या मेहेरनजरेनें नातलगांना भेटावयाला बादशाही परवाना मिळाल्यामुळें मी एक तुमचा नातलग आहे, असें पहारेकऱ्यांला सांगून मी आंत आलों आहें. पहारेकरी आपलें बोलणें ऐकतही असेल. यासाठीं मला ताबडतोब बाहेर पडलें पाहिजे. अधिक वेळ येथें बसतां येणार नाहीं. तेव्हां ठरवा काय तें. "

" बरं कबूल आहे गोष्ट. "

" द्या तर या कागदावर लिहून तुमच्या वाड्यांतील माणसाला, जामदाराला पत्र. त्यांनीं मला रक्कम मोजली पाहिजे. "

" पण सुटका झाली नाहीं तर— "

" **बदाउनीसाहेब** जबाबदार आहेत. मला ते ओळखतात. मी त्यांच्या बोलण्यावरून आलों आहें. तुमच्या नव्हे. ही कामगिरी जिवावरची आहे. प्रसंग बादशहाशीं आहे, कोणा दुसऱ्या तिसऱ्या लुंग्यासुंग्याशीं नव्हे, हें आपण जाणतांच. या कामगिरीला लाख मोहोरा मागितल्या तरी शोभण्यासारख्या आहेत. मी माझी बक्षिसी **बदाउनीसाहेबांच्या** आजपर्यंतच्या ऋणानुबंधाकडे पाहून अगदींच कमी सांगितली आहे. आणि आपण तर तेवढ्यालाही कुरकुरतां. तेव्हां आतां मर्जी आपली. मला ही कामगिरी आंगावर घ्यायचीच नाहीं. आपण नाकारीत असाल, तर मी आलों तसाच जातों. "

" पण इथून जायला वाट तर कुठेंच दिसत नाहीं. "

" म्हणजे तीही मी तुम्हाला आतांच दाखवून ठेवूं कीं काय ? "

" तसें नव्हे. पण इथून बाहेर पडायला तुम्ही मला वाट दाखविणार तरी कुठून ? "

" तें सांगतों मी तुम्हाला. " तो वृद्ध माणूस त्या कागदावर कांहीं तरी लिहीत होता. तें लिहून झाल्यावर तो कागद **जलालुद्दिनाच्या**पुढें धरून तो म्हणाला.

" करा आतां येथें सही तुमची. "

जलालुद्दिनानें तो कागद वाचून पाहिला आणि त्या मजकुराखालीं निमूटपणें सही करून दिली. त्यानंतर त्या वृद्धानें त्याची नीट घडी केली आणि पुन्हा जलालुद्दिनाच्या हातांत दिली.

" लिहा याच्यावर तुमच्या जामदाराचें नांव. "

**जलालुद्दिनानें** त्याच्यावर आपल्या जामदाराचें नांवही लिहून दिलें. वृद्धानें तो कागद आपल्याकडे घेऊन ठेवला.

" तुम्हाला खरं वाटणार नाहीं, सरदारसाहेब ! हा वाडा फारच फार जुनाट आहे. इथें फार दिवस रहातांच येत नाहीं. फार तर पंधरा वीस दिवस इथें माणूस राहूं शकतो. अधिक तर महिना. महिन्याच्यावर जर कोणी कैदी आंत राहिला, तर तो येथल्या येथें नाहींसा होतो. त्याचा फिरून कधीं या जगांत पत्ता लागत नाहीं. त्याची हड्डी देखील सांपडत नाहीं. त्याची खाणाखुणा देखील कधीं काळीं मिळण्याची आशा नाहीं. इथला भूतखाना तसाच अचाट आहे. ज्याला ठार मारायचा असतो, पण स्वतः शिक्षा मात्र यायची नसते, अशाच कैद्याला या वाड्यांत कोंडून ठेवतात. **बाबरच्याही** पूर्वीपासूनचा हा वाडा आहे. पण त्याची डागडुजी करून प्रत्येक बादशहा हा राखून ठेवीत आला आहे. कोणी म्हणतात **खिलजी** घराण्यांतल्या बादशहांनीं बांधला. कोणी म्हणतात **कुतुबमिनार** आणि हा वाडा **कुतुबुद्दीननेंच** उठवला. कसेंही असो. खरा शोध असा कांहीं लागत नाहीं. पण मी परत येईपर्यंत इथें तुम्हाला धोका नाहीं. मी ही जागा आतां मंत्रून–भारून टाकली आहे. येथें पिशाच्चाचा प्रवेश होणार नाहीं. आतां तुम्ही निर्धास्त असा. "

असें बोलून तो वृद्ध ज्या दारांत जोरावरसिंग उभा होता त्या दाराकडे टक लावून पाहूं लागला. जोरावरसिंग हळूच खालीं उतरूं लागला. मोठी चपळाई करून तो मागें सरला व त्यानें कळ पूर्ववत् दाबली. त्या वृद्धानें उठून जातां जातां म्हटलें—

" या फडताळांत तुम्ही कांहीं सामान ठेवलेलें नाहीं ना ? "

" नाहीं. कां बरें ? "

" बरें केलेंत. यांत मुळींच ठेवतां नये. हा दरवाजाच उघडतां नये. हें फडताळसें दिसतें, पण हें फार वाईट आहे. या फडताळांत ठेवलेला जिन्नस नाहींसा होतो. या सगळ्या जागेंत हें फडताळच तेवढें वाईट आहे. पण माझ्या मंत्रानें तुमच्या

जिवाला धोका पोंचणार नाहीं. तरी देखील तुम्ही या फडताळाला मात्र शिवूं नका म्हणजे झालें. अथवा तसें कशाला ? मीच तें बंद करून घेतों. " असें म्हणून त्यानें त्या फडताळाचा दरवाजा आपल्या हातानें झांकून घेतला.

तो वृद्ध निघून गेल्यावर एक लांबच लांब सुस्कारा टाकून **जलालुद्दीन** आपल्या जागेवर आकाशाकडे दृष्टि लावून बसला.

" बादशहाचा कैदी ! मी असा काय बादशहाचा अपराध केला होता कीं त्यानें मला कैद करावें ? त्यानें स्वतः काय थोडया हिंदु बायका केल्या आहेत ? एक हिंदु औरत मी कोंडून ठेवली, त्यांत बादशहाचा मी काय अपराध केला ? एकदा येथून सुटलों, तर फिरून येईन तो **दिल्लीच्या** तख्तावरून **अकबराला** खालीं ओढण्याकरितांच येईन. येथून एकदां सुटलोंच पाहिजे. आणि आतां सुटल्याशिवाय रहात नाहीं. "

**जलालुद्दिनाचें** हें आत्मगत भाषण बरेंच लांब चाललें होतें, पण त्या ठिकाणीं तें ऐकत रहावयाचें आतां जोरावरसिंगास कारणच नव्हतें. आपल्या सोबत्यासह तो आल्या वाटेनें जावयास परतला. पूर्वीच्या जिन्याकडे पुन्हा येतांच त्याला ती विशिष्ट शीळ ऐकूं आली. भुताटकीची शीळ म्हणून भले झुंजार शिपाई देखील ज्या शिळीला भीत असत, तीच शीळ ती होती. स्वतःसमक्ष त्यानें **जलालुद्दिनाला** त्या वृद्धानें घातलेली भुताटकीची धास्तीहि ऐकली होती. फडताळाच्या वाटेस न जाण्याबद्दल दिलेली इशारतही त्यानें ऐकली होती. त्यावरून त्याचा निराळाच ग्रह होऊं लागला. ही सगळी भुताटकी स्वार्थसाधु लोकांची भोळ्याभाबडयांस फसविण्याची युक्ति आहे, हें त्यानें तेव्हांच ओळखलें. या भुयाराचा मार्ग त्या वृद्धाला ठाऊक आहे. तेव्हां तो येऊन **जलालुद्दिनाची** मुक्तता करण्याच्यापूर्वी **जोरावरला** आपला कार्यभाग साधला पाहिजे होता. भुयाराच्या वाटा त्याला आतां समजल्यामुळें तेवढ्यापुरता त्याचा भुताटकीचा बाऊ निघून गेला होता. पण शिळीचें काय ? त्या चमत्काराचा उलगडा कसा करावयाचा ?

ज्या ठिकाणीं गेल्यावर ती शीळ ऐकूं येत असे, त्या ठिकाणीं बराच वेळ राहून त्यानें ती ऐकली. शीळ तर अगदीं हुबेहूब होती. त्यांत तिळमात्र फरक नव्हता. पण ती घालतो कोण ? आणि कुठून ? हातांतल्या दिवटीनें त्यानें इकडेतिकडे चारी बाजूंस पुष्कळ शोध करून पाहिलें. पण कांहींच उमगेना. अमरसिंह बिचारा मनांतून भीत होता, पण वरून त्याला निर्भयपणाचा आव आणणें भाग होतें. तशांत त्यानें दिवटी खालीं ठेवून व वरती काळोखांत जोरावरसिंगाच्या मागें उभें राहून जी नवलाई पाहिली, त्यावरून निंमेहून जास्त अशा भुताटकीचा उलगडा झालाच होता. पण शीळ मात्र भुताचीच असली पाहिजे, अशी त्याची खात्री होती. भूत शीळ घालतात ही दंतकथा व अनुभव फारच पुरातन कालापासूनचा होता. त्याला खोडून काढणारा अगर खोटें म्हणणारा कोणीच नव्हता. ही शीळ त्या वाडयाच्या बाहेरच्या बाजूनेंही स्पष्ट ऐकूं येई. या शिळीला भिऊन कित्येक शूरांची

देखील बोळकडी वळली होती. बिचारा **जलालुद्दीन** आज त्या वाड्यांत त्या शिळीला भिऊन जीव आंखडून बसला होता.

**जोरावरसिंगाला** या शिळीच्या बाबतींत अमरसिंगाचें समाधान करतां येण्यासारखें नव्हतें. तो तेथून पुढें निघाला आणि पडक्या घराच्या तळघरांतून थेट पुढें जाऊन तो तेथूनच वरती आला आणि मग आपल्या आश्रमाकडे येऊन दाखल झाला. तों त्याच्या अगदीं आंतल्या खोलींत कोणी तरी फार दुरून आलेला एक फकीर त्याची वाट पहात आहे असें त्यास समजलें. तें ऐकून त्यास विस्मय वाटला. इतकी सलगी करणारा त्याचा एकही फकीर ओळखीचा नव्हता. पण तेवढ्यांत त्याच्या डोक्यांत एक विचार आला. त्यानें आपल्या बरोबरच्या लोकांस बाहेरच ठेवून तो एकटाच आंत आला. त्यानें दरवाजा आंतून लावून घेतला. त्याच्या खोलींत तो बाहेरून आलेला फकीर अगदीं हैराण होऊन निजला होता.

जोरावरसिंगानें जवळ जाऊन पाहिलें, तों त्या फकीराचें सर्वांग रक्तानें माखलें होतें ! तो कण्हत होता, पण त्यानें आपली शिकस्त करून आपलें दुःख लपवून ठेवलें होतें. तो व्याकुळ होऊन गेला होता. त्याचें सर्वांग ठणकत होतें. शिवाय त्याचा चेहराही भीतिग्रस्त दिसत होता. त्याला कशाची तरी धडकी भरलेली दिसत होती. रक्त फार गेल्यामुळें त्याला मूर्च्छना आली होती. शिवाय त्याला भारीच कंप सुटला होता. **जोरावर, अमर व शिवशर्मा** त्या फकीराच्या शुश्रूषेला लागले. फकी-राला आतां तर तापही भरूं लागला होता.

मठांतील ही त्रयी फार चिंताक्रांत झाली. फकीर आतां जगतो कीं नाहीं, याची त्यांना धास्ती वाटूं लागली. इतकें त्या फकीराविषयींचें प्रेम या तिघांना कां वाटत असावें बरें ? कांहींहि असो. पण ते तिघे त्या फकीराची शुश्रूषा जिवापाड करीत होते. फकीराला किंचित् झोंपेसारखी गुंगी लागली होती. म्हणून हे तिघे असामी एकमेकांकडे पहात भयचकित होऊन बसले होते. तोंच गळा दाबून एकाद्याला मारीत असतां त्यानें ओरड केली असतां दाबलेल्या गळ्यांतून जसा आवाज निघतो तसा आवाज आला व लगेच गर्जना झाली—" पकडो दस्कू ! हरामजादा ! "

---

# प्रकरण चोविसावें.

## काबुली पठाण !

वरील ध्वनी कानांत पडतांच त्या तिघांनींहि चमकून पाहिलें व ते जवळपास हत्यार पहाण्याकरितां सभोंवार नजर फिरवूं लागले व शेवटीं क्षणार्धांत खरी स्थिति लक्षांत येतांच मोठ्यांदा खदखदां हांसले. वरील ध्वनि त्या फकिराच्याच मुखावाटे बाहेर पडला होता; व तोहि जागृतावस्थेंत नव्हे, तर निद्रावस्थेंत होता. अर्थात फकिराला झोंपड लागून स्वप्न तरी पडलें असावें अथवा त्याला भ्रम तरी झाला असावा. तो भ्रम असल्यास मात्र फकीर वांचण्याची आशा नव्हती. ते तिघे पुन्हां उद्विग्न होऊन शून्य चित्त होऊन बसले असतां बाहेर कोणी तीन चार माणसें आल्याची चाहूल लागली. **शिवशर्मा** बाहेर गेले; व आणखी तिघां चौघांना घेऊन आंत आले. **अबदुल्लाखान** व त्याचे बरोबर आणखी दोघे असून त्यांनीं हकीमाकडून दिव्य औषधी आणली होती.

हकीमानें सांगितल्याप्रमाणें औषध रोग्यास देण्यांत आलें. मात्र फकीराचा आजार **अबदुल्लाखानास** कळला कसा व इतक्या लौकर औषधी घेऊन हे लोक मठांत तयार झाले कसें, हें आणखी नवल मठांतल्या लोकांस वाटत होतें.

तो दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं रात्रीं प्रहर रात्रीच्या सुमारास फकीराला बराच आराम वाटूं लागला व त्याला बोलण्याची शक्तीहि आली. याच्या पूर्वी त्याला बोलावेसें पुष्कळ वाटत होतें. पण त्याला बोलण्याची मनाई केल्यामुळें बोलतां आलें नाहीं. कारण त्याला पुष्कळशा गोष्टी बोलावयाच्या होत्या हें सर्वांना ठाऊक होतें; व ठराविक वेळेच्या पूर्वी तो त्या बोलला असता, तर त्याचा आजार उलटला असता हेंहि सर्वांना माहीत होतें. म्हणून त्याला त्या वेळेपूर्वी कोणी मुळींच बोलूं दिलें नाहीं. फळांचा रस पोटांत गेला होता, ताप अजीबात कमी झाला होता व फकीराला थोडी हुषारी वाटत होती म्हणून त्यानें आपली हकीगत सांगावयास सुरवात केली.

“ मी इथून निघाल्यावर **काशी** क्षेत्रीं जाऊन पोंचलों. पण मला **फैजीला**

ओळखतां येईना. बरेच दिवस चोहींकडे फिरलों. त्याचें राहण्याचें ठिकाण शोधून काढलें, पण तो दुसरीकडे कुठें तरी रहात असल्याचें समजून आलें. मागाहून मला समजलें कीं, फैझीला मी हुडकीत असतां माझ्यासमोरूनच **फैझी** अनेकदां गेला होता. पण तो फैझी हें मला ओळखतांच आलें नव्हतें. इतका त्याच्यांत कल्पनातीत फरक पडला आहे. तो जन्मानें मुसलमान हें जीव तोडून सांगितलें तरी कोणास खरें वाटणार नाहीं. जन्मतः तो ब्राह्मणकुमारच दिसतो. त्यामुळेंच माझी एवढी फसगत झाली. ”

त्या फकीरानें इतकें बोलून दीर्घ श्वास सोडला. त्याला किंचित् दम लागल्या-सारखा वाटला. डाळिंबाचे कांहीं दाणे तोंडांत टाकून त्यांचा रस गिळल्यानंतर त्यानें पुन्हां आपली हकीगत चालू केली.

“ सरतेशेवटीं मी त्याला साधारण ओळखला व माझा अदमास खरा ठरेपर्यंत जपून चांचपत प्रश्नोत्तरें सुरू केलीं. ”

या ठिकाणीं फकीरानें एकविसाव्या प्रकरणांतली फैझीशीं झालेल्या मुलाखतीची सारी हकीगत सांगितली. सर्व श्रोते तटस्थ होऊन ऐकत होते. श्रोते-मंडळींत मागाहून **अबदुल्लाखान** व त्याचे साथीदारहि येऊन सामील झाले होते.

“ शेवटीं दोघांची आमची एकमेकांस ओळख पटल्यावर आम्ही फार दूर एका बाजूस गेलों व तुमचा व बादशहांचा निरोप त्याला सांगितला. तो त्यानें शांतपणें ऐकून घेतला; व स्मितहास्य केलें. पण खरें पहातां त्याच्या हृदयांत केवढी तरी मोठी कालवाकालव होत होती हें मीं ताडलें. ”

“ कशाबद्दल बरें ती? ” एका श्रोत्यानें उत्सुकतेनें विचारलें.

“ हं! तो इतिहास आणखी निराळाच आहे. पण त्याची मीं अद्याप पुरी खात्री करून घेतलेली नाहीं. तेव्हां तो सर्वच मी तुम्हांला एव्हां सांगून टाकणें योग्य होणार नाहीं. ती “ **प्रणयकथा** ” आहे. ”

“ काय म्हणतां—प्रणयकथा? **फैझीची** काशी क्षेत्रांत प्रणयकथा? जगांत याच्याहून नवलाची कोणती गोष्ट असेलसें वाटत नाहीं. ”

“ हं! ” फकीर म्हणाला, “ जग अफाट आहे, त्यांत आश्चर्येंहि अनंत आहेत. माणसांची बुद्धि आकुंचित आहे. फैझीची प्रणयकथा पुढें तुम्हांला समजणारच आहे. मी आतां तुम्हांला सांगूं इच्छित नाहीं. मी त्याला कर्तव्याची जाणीव करून दिली. **दिल्ली, आग्रा, मठ, अकबर, पंडितजी, शिवशर्मा** यांस विसरूं नकोस असें बजाविलें आणि त्याचा निरोप घेतला. ”

दुधाचा एक घोंट घेऊन फकीर म्हणाला—

“ **फैझीचें** विद्याध्ययन जोरांत चाललें आहे. फैझी अद्याप कर्तव्यविन्मुख झालेला नाहीं. थोड्याच अवधींत त्यानें आपल्या गुरुदेवांची मर्जी सुप्रसन्न करून घेतली आहे. वेदाध्ययन अखंड चालू आहे त्याच्याइतका पदवीचा दुसरा कोणी निपजणार नाहीं असें म्हणतात. त्यानें फारशींत लिहिलेल्या कविता आपणां सर्वांस

ठाऊकच आहेत. पण त्यानें आतां संस्कृतांतहि काव्यरचना सुरू केली आहे. तो फारच तेजःपुंज दिसतो. ”

श्रोत्यांना फैझीपुराण पुष्कळसें ऐकावयाचें होतें. पण एखाद्या कुशल कादंबरीकाराप्रमाणें जेथें वाचकांची उत्सुकता फार वाढते, तेथेंच तें अपुरें संपवून दुसऱ्यास सुरवात करावयाची, तसें त्या फकीरानें आपल्या दौऱ्याचें पुढील वर्णन सुरू केलें.

“ मी **काशीक्षेत्र** सोडून **दिल्लीस** आलों. दरम्यानच्या बारीकसारीक गोष्टी मी आपणांस मागाहून सांगेन. पण आतां अगोदर **बादशहाच्या** जिवावर प्रसंग कसा आला आहे तो सांगतों. मीं **दिल्लींत** प्रवेश केला तेव्हां रात्र पडून प्रहर लोटला होता. कलन मशिदीपाशीं मी येऊन पोंचलों, तों तेथें कोणी कुजबुजत असावेत असें मला वाटलें. म्हणून मी तिथेंच छपून राहिलों. ही मशीद पुरी करून **फिरोझशहा तघलख** निवर्तला, त्याला आतां दोनशें वर्षें भरत आलीं आहेत. ही गोष्ट लक्षांत घ्या. हीं दोनशें वर्षें पुरीं करावयाला आणखी थोडा अवकाश आहे. पण हीं वर्षें भरतांच अकबराचें राज्य संपणार असा ग्रह त्या ठिकाणीं कुजबुजणाऱ्यांचा होता व ते राजकारणी खलबत करीत होते अशी खात्री झाली. ”

**अबुल फैझीची** प्रणयकथा फकीरानें अर्धींच सोडल्याबद्दल श्रोत्यांचा विरस झाला होता, पण आतां हें रात्रींचें गुप्त कारस्थान सुरू झाल्याबरोबर फकीराच्या कथेस पुनरपि रंग भरूं लागला.

“ **कलन** मशीदच्या पाठीमागच्या बाजूस वळलेले त्यांना पाहून मीहि त्यांच्या मागोमाग गेलों. ते एका गुप्त वाटेनें भुयारांतूनच चालले होते. मीहि त्यांच्या मागोमाग चाललों होतों. बराच वेळ असा प्रवास झाल्यावर एका अंधुक प्रकाशाच्या दालनांत ते लोक बसले. मी मात्र ही बाजू कधींच पाहिली नव्हती. **दिल्ली**शहरांत भुयारांचें जाळें जमिनीखालून पसरलेलें आहे अशी नुसती अफवा मीं ऐकली होती. पण एकहि भुयार व त्यांतील तळघर स्वतः हुडकून काढलें नव्हतें. आज कांहीं तरी मोठ्या रहस्याचा शोध आपणाला लागणार असें मला वाटूं लागलें. आणि मागचा पुढचा विचार न करितां मी आपला त्या लोकांच्या पाळतीवर राहिलों. ”

“ ते तिघे बसल्यानंतर सामसूम झालें. त्या तिघांशिवाय तेथें कोणी नव्हते. तेव्हां त्यांनीं जरा मोठ्यानेंच बोलावयास सुरवात केली. मी वाटेवरच उभा होतों. आजूबाजूस कुठें मार्ग मिळाल्यास लपावें म्हणून मी पाहूं लागलों तों मला एक पांच सहा हात लांबीची व दोन तीन हात रुंदीची पोकळी मिळाली. त्याच ठिकाणीं मी छपून उभा राहिलों. त्यांचें बोलणें आतां रंगांत आलें होतें. ”

“ आजच्या दिवस तुम्ही या भुयारांतच रहा. उद्यां तुम्हांला मी **जलालुद्दीनकडे** घेऊन जाईन. दरबारची मंडळी जलालुद्दीनला काबूलकडे पाठवून देणार आहेत. त्यांचा तसा बेत चालला होता. इतक्यांत आपण आलांत हें बरें झालें. जलालुद्दीन आपलीच वाट पहात आहेत इतके दिवस. काबूलला आपण जाणार, पण

कोणाकडे जाणार हें दरबारी मंडळीस जलालुद्दीननें कळूं दिलेलें नाहीं. आपण आल्याची वर्दी त्यांना मी आतां देतों."

" ठीक आहे. **मिर्झा हकीम** साहेब तुमचें स्वागत करायला तयार असून तुम्हांला लागेल ती मदत देतील, असा निरोप मिर्झा हकीमसाहेबांचा जलालुद्दिनला सांगा."

" मी सांगतों," **हुसेन** म्हणाला, " मी सांगतों निरोप. पण तुम्ही इथें येतांना कुणी पाहिलें नाहीं ना?"

" छट्‌ कुणी देखील नाहीं. आम्हांला **अकबराच्याच** राजधानीची, दरबारची, खुद्द अकबरच्या दिनक्रमाची वगैरे सर्व माहिती गुप्तपणें मिळवावयाची आहे. यासाठीं आम्हांला येथेंच कांहीं वेळ काढला पाहिजे. जलालुद्दीनला आमच्या स्वाधीन करण्यांत आलें पाहिजे, म्हणजे मग त्याच्या केंसाला धक्का लागण्याची गोष्टच नको."

हे शब्द त्या परक्या गृहस्थांचे होते.

" इतक्यांत ज्या बाजूकडून त्यांनीं प्रवेश केला होता तिकडे कसलासा आवाज झाला. त्यामुळें ते तिघे उठून चोहोंबाजूस पाहूं लागले. तोंच माझ्या पायाखालीं दगड होता तो निसटून पडला व आवाज झाला. त्यामुळें ते सगळेच माझ्याकडे आले. त्याबरोबर माझी बोबडीच वळली. मला त्यांचा प्रतिकार करणें शक्यच नव्हतें. तथापि मी तिथें दबा धरून बसलेला पहातांच त्यांना फार संताप आला व त्यांतील एकानें माझी मानगुटी गच्च आंवळून धरली! माझी पुरीं शंभर वर्षें भरलीं, याची मला खात्री पटली. शेवटची धडपड म्हणून मी खंजिर काढून एकाला खुपसला. त्याबरोबर तो जरा मागें सरकला. तितक्यांत **हुसेननें** एक कळ दाबून मला ओढला आणि एका पोकळींत लोटून दिला, त्याबरोबर तोल जाऊन मी एका दगडी जिन्यानें धडपडत भयंकर काळोखांतून कोलमडत कुठल्याकुठें पडलों. त्यानें लोटण्यापूर्वीं दुसऱ्यानें माझ्यावर कट्यारीचा वार केला होता. त्यांतूनहि रक्त वाहूं लागलें होतें. सर्व बाजू सारख्याच काळोखाच्या होत्या. कुठून तरी दुर्गंधहि येत होता. मी त्या काळोखांत हातपाय गळल्यामुळें निःशक्त होऊन पडलों. मला उठण्याची शक्ति राहिली नाहीं."

" अशा स्थितींत कांहीं वेळ जाऊन थकवा किंचित्‌ कमी झाल्यावर आंग दुखत होतें, तरी देखील मी ओणव्या ओणव्यांनींच भुई सरपटत चांचपडत पाहूं लागलों."

या ठिकाणीं त्या फकीराला बोलण्याचे श्रम झाल्यामुळें थोडा विसावा घ्यावासा वाटला. श्रोत्यांना तर सारें आश्चर्यच वाटत होतें. आतांपर्यंतची हकीगत ऐकून त्यांना पुरा असा उलगडा कसलाच झाला नसला तरी अकबराचा जीव धोक्यांत आहे, असें त्यांना वाटूं लागलें. फकीराची पुढील सर्व हकीगत ऐकून घेण्याविषयीं ते उत्सुक झाले होते.

" मी चांचपून पहात असतां," फकीर पुढें म्हणाला, " मला फिरून वरच्या-

सारखीच लांबीरुंदीची खोली लागली. असल्याच खोलींत लपून मी राहिलों असतां **हुसेननें** मला ढकलून दिलें होतें. हुसेननें मला ओळखिलें नव्हतें. तेव्हां याहि खोलीला मी चोंहीकडे दाबून पाहूं लागलों. तों अकस्मात् आवाज होऊन दरवाजा उघडला व आंत वाऱ्याची झुळूक आली. पुढें रस्ता दिसत होता. त्या वाटेनें मी चालूं लागलों तों त्या भुताटकीच्या घराकडे येऊन थबकलों. पण पुढें चालायला मला त्राण नव्हतें. माझें सर्वांग कांपत होतें, व वेदना होत होत्या. लांबच्या पल्ल्याच्या त्रासानें मी आधींच थकलों होतों आणि शेवटीं हा असला प्रसंग आला. कसा तरी मुठींत जीव धरून मी एकदांचा हा मठ गांठला."

"तें सर्व समजलें, पण तुम्ही पकडो उस्कू म्हटलें तें काय?" **जवाहिरसिंगनें** विचारलें.

"तो भ्रमाचा प्रकार," फकीर म्हणाला, "मला तापांत भ्रम झाला व स्वप्न पडल्यासारखें वाटलें. त्यांत त्या मघाशीं सांगितलेल्या तिघां पठाणांची व माझी झटापट चालली होती. मीं त्या सर्वांना पकडून **अकबरशहा**समोर उभे केलें आहेत, असा देखावा माझ्या डोळ्यांसमोर होता. त्याच स्वप्नांत मी कांहीं तरी बोललों असेन."

"बरं, पण **अबदुल्लाखान**, आपण ऐन वेळीं औषध घेऊन कसे एकदम आलांत?"

"मी त्या भुताटकीच्या घरासमोरून यांना येतांना ओळखलें. हे कण्हत कण्हत येत होते. यांनीं आपल्या बरोबर कोणी नको असें सांगितलें व औषध आणावयास सांगितलें. मी हकीमजींजवळून औषध घेऊन लगेच आलों. या फकीरसाहेबांची हकीगत ऐकायला **बादशहा** फार उतावीळ झाले आहेत." **अबदुल्लाखान** म्हणाला.

"पण फकीरसाहेब, आपला फकीरीपेशा असाच अंगावर किती वेळ ठेवणार आतां?"

"माझी गोष्ट संपली," फकीर म्हणाला, "पण या सर्व गोष्टीवरून तुम्हीं काय अनुमानें काढतां?" त्यानें प्रश्न केला.

"**अकबरशहाचा** जीव धोक्यांत आहे."

"कबूल, पण ते तिघे परदेशी पठाण कोण?"

"होय बुवा हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे खरा." एकजण म्हणाला.

"ते बादशहाचा जीव घेण्यासाठीं कोणी तरी पाठविलेले मारेकरी असावेत." **अमरसिंह** म्हणाला.

"तें कोणीहि सांगेल, पण कोणी तरी म्हणजे कोणी हें तर अजमावलें पाहिजे?" फकीर म्हणाला. "शिवाय **अकबरशहा दिल्लीहून आग्र्याला** कधीं रहायला जाणार हीहि बातमी त्या गुप्त हेरांना समजलेली आहे, हें मी तुम्हांला सांगायला

विसरलों. जी गोष्ट फक्त आपणांलाच ठाऊक असायची, ती या परक्या लोकांना कशी कळली हें मोठें आश्चर्य आहे! ”

“ अस्सं ? ” **जवाहिरसिंगनें** म्हटलें.

“ शिवाय तुमच्या सांगण्यावरून **जलालुद्दिनाला** कुठें तरी पळविण्याचा घाट घातला असला पाहिजे हेंहि सिद्ध होतें. ” **शिवशर्मा पंडित** म्हणाले.

“ **अकबरशहाचें** धोरण पसंत नसणारी दरबारी मंडळी कोणी तरी त्या हेरांना आंतून सहाय्य करीत आहेत असेंच म्हणावें लागतें. पण **जलालुद्दिनाला** केव्हां, कसा व कुठें कोण पळविणार याचा मागमूस मला तुम्ही फकीरसाहेब अद्याप सांगितलांत नाहीं. ”

“ सांगेन, सर्व सांगेन. उतावीळ होऊं नका. पण बाहेर घोडेस्वार कोण आला तो आधीं पहा बरं. ” फकीर म्हणाला.

घोडेस्वार तडक आंतच आला. तो आंत यावयाच्या पूर्वींच आंतील मंडळी उठून बाहेर गेली.

“ आतां आपणाला खूबच घाई केली पाहिजे ” **जवाहिरसिंग** म्हणाला,

“ शिवाय **फैझी** देखील आतां लवकरच येईल विद्यासाधन करून—” फकीर म्हणाला.

“ **रतनसिंगाला** बादशहा बोलावीत आहेत. **अबदुल्लाखानानें** रतनसिंगाला घेऊन जावें असा निरोप आला आहे. ” **शिवशर्मा** म्हणाले.

“ ठीक आहे. हा रतनसिंग तयार आहे म्हणावें. ” आपला फकिराचा वेष फेकून देत रतनसिंग म्हणाला.

“ पण तुम्हांला इतकी शक्ति आहे काय? ”

“ येईल उद्यांपर्यंत. घोडा आहेच तयार. ” **जवाहिरसिंग** म्हणाला.

“ हो उद्यापर्यंत यायला हरकत नाहीं. ” तो आलेला स्वार म्हणाला.

स्वारानें आणलेला लखोटा **अबदुल्लाखान** वाचीत होता. वाचून झाल्यावर त्यानें तो **पंडितजी**जवळ दिला. **पंडितजीला** तो वाचून नवल वाटलें.

“ **जवाहिरसिंग!** या बादशहाचें मोठें आश्चर्य वाटतें बुवा! ” चकित होऊन पंडितजी म्हणाले.

जवाहिरसिंगनेंहि तो लखोटा तितक्यांत वाचला होता. तोहि आश्चर्यानेंच म्हणाला. “ बादशहाला ही गोष्ट कशी कळली? ”

“ काय तें? ” **अमर** म्हणाला.

“ **काबूलहून** येऊन **दिल्लींत** शिरलेल्या पठाणी लोकांवर पाळत ठेवून इकडे या. **जलालुद्दिनवरहि** नजर असूं द्या! ” अशी बादशहाची आज्ञा त्या लखोट्यांत होती.

“ ऑं! आतां आलें लक्षांत! ”

" काय–काय तें ? "

" काबूलहून ते पठाण कोण कशाकरितां आले तें मला आतां समजलें, " **अबदुल्लाखान** भविष्यवाद्यासारखा आकाशाकडे पहात म्हणाला.

" पण आम्हांला सांग ना ? "

" नाहीं; माझें अनुमान खरें कीं काय तें मी आधीं पडताळून पाहिल्याशिवाय त्याचा उच्चार करणार नाहीं. "

" पण आम्हांला सांगायला काय हरकत ? "

**जलालुद्दिन** आज उद्यां इतक्यांत कैदखान्यांतून खात्रीनें फरारी होणार. " **रतनसिंगानें** अबदुल्लाखानाच्या हातावर टाळी दिली **जवाहिरसिंगाचें** रक्त सळसळूं लागलें. बाकीच्या दोघांना या बोलण्याचा अर्थच समजेना.

" मग मला आजच तयार झालें पाहिजे तर ? " **जवाहिरसिंगानें** विचारलें, " **रतनसिंग**, आज रात्रीं तूं माझ्याबरोबर आलें पाहिजेस. "

" धीर धर, मी **बादशहाकडून** जाऊन येतों. परवां रात्रीं आपण एकदमच स्वारी करून जाऊं. "

" तोंपर्यंत ? "

" तोंपर्यंत तुम्ही आणि **अमरसिंह** डोळ्यांत तेल घालून सावध रहा. "

" बरं आम्ही आतां जातों. " असें म्हणून तो स्वार व अबदुल्लाखान निघून गेले. आणि राहिलेल्या तिघांचींच पुनः खलबतें सुरू झालीं.

" बादशहा देवभोळा आहे ही गोष्ट खरी काय ? "

" कशावरून म्हणतां ? " दुसऱ्यानें विचारलें.

" **सेलीमच्या** जन्माच्या पूर्वीं पुत्रप्राप्तीस्तव बादशहा एका मुसलमान साधूच्या नादाला लागला होता असें म्हणतात. त्या गोष्टी खोट्या कीं खऱ्या ? " पंडितजींनें विचारलें.

" खरेंच, त्या गोष्टी थोरल्या पंडितजींना बरोबर ठाऊक असणार. पण मींहि त्या ऐकल्या आहेत पुष्कळांच्या तोंडून, " **रतनसिंह** म्हणाला.

# प्रकरण पंचविसावें.

## तळघरांतलें युद्ध !

अकबरशहाचा सावत्रभाऊ **मिर्झाहकीम काबूलला** होता व तो तेथील वैभवावर संतुष्ट न होतां **अकबराच्या** वैभवावर जळफळत होता. त्याला स्वतःचें लहानसें राज्य अपुरें वाटून अकबराचें साम्राज्य आयतेंच आपल्या घशांत उतरावयास मिळेल तर पहावें अशा हेतूनें खटपट करीत होता. पण अकबरशहा कमी मुत्सद्दी नव्हता. त्याला ही गोष्ट समजून चुकली होती. मिर्झाहकीमचे गुप्तहेर त्याच्या राजधानींत होते. पण त्यांची पर्वा त्यास वाटत नव्हती. विशेषतः **जलालुद्दिनावर** बादशहाचा रोष झाल्यापासून राज्यांतील पूर्वीपासून बादशहाच्या कारभाराला नाखुष असलेली मंडळी विशेष उचंबळ झाली. या लोकांनीं जलालुद्दिनाला कैदखान्यांतून काढून शीरसलामत काबूलला पोंचविण्याची मसलत योजिली. **बहिरामखानाला मक्केच्या** यात्रेला घालवून दिल्यानंतर त्याच्या तर्फेची कांहीं मंडळी पूर्वीपासून नाखूष होतीच. त्यांतही आणखी थोडीशी भर पडली. शक्य झाल्यास **काबूलच्या मिर्झाहकीमचा** शह दिल्लीपतीस पोंचवावा, असेंहि या घरभेदी मुत्सद्यांचें मत होतें. त्याचा इरादा अकबरास पदच्युत करण्याचा नव्हता. पण आपली कदर जर बादशहा बाळगीत नाहीं, तर बाहेरून त्यास संकटांत घालून त्यांतून त्याला पार पाडण्याच्या प्रेमाच्या उमाळ्याचा देखावा आपणास करावयास सांपडावा असा त्यांचा इरादा होता. त्याप्रमाणें काबूलचे हेर आतांशा **दिल्ली-आग्र्यांत** गुप्तपणें फिरूं लागले होते. पण त्यांच्यावर शहाच्या हेरांची पाळत होतीच.

जलालुद्दिनाला काढण्याचा बेत दरबारी लोकांचा होता व त्या बेताला **इन्मुजुद्दोल्याची** आंतून अप्रत्यक्षपणें फूस होती. कारभारीसाहेबांना शहाची चांगलीच दहशत बसली होती. पण भविष्यकालचीं उज्ज्वल स्वप्नचित्रें त्याच्या नेत्रांला आराम देत होतीं. कारण या ठराविक दरबारी कंपूच्या मुठींत कोंवळ्या मनाचा **सेलीम** आस्ते आस्ते सांपडत चालला होता. जसजसा तो त्यांच्या मुठींत सांपडूं लागला. तसतसें बापाविषयीं त्याचें मन कलुषित करण्याचा उद्योग या मंडळीकडून विशेष नेटानें करण्यांत येऊं लागला. अर्थात् बापाविषयीं तेढ सेलीमच्या मनांत कायमची ठाणें धरून बसली. पण या बाबतींत मात्र अखेरपर्यंत **अकबरशहाचे** डोळे उघडले नाहींत. या मंडळीनें आपला सूड उगविण्याकरितां युवराजाला आपल्याविरुद्ध तयार करून ठेवण्याचा प्रयत्न चालविला आहे, या गोष्टीचा मागमूसही अकबरास नव्हता.

**रतनसिंगाकडून** सर्व वर्तमान **अकबरशहास** कळलें. **फैझीनें** आतां

शक्य तितक्या लवकर यावें अशी बादशहाची इच्छा होती. फैझीला तर विद्याध्ययनाचा ध्यासंगच लागला होता. एक तप पुरें करण्याचा त्याचा निश्चय होता. रतनसिंगानें इत्थंभूत वर्तमान बादशहाला कळविलें आणि तो फिरून मठास आला. दरम्यानच्या काळांत **जोरावरसिंग** आणि **हुसेनखां** यांच्या गांठीभेटी होऊन त्यांचें कारस्थान चांगलेंच रंगारूपास आलें होतें.

शेवटीं ठराविक दिवशीं त्या गुप्त हेरांच्या स्वाधीन करण्यासाठीं म्हणून **हुसेनची** स्वारी **जलालुद्दिनाकडे** चालली. पण हुसेनाला त्या वेषांत कोणीहि ओळखलें नसतें. काबुली हेर व हुसेन यांना त्या दिवशीं अचानकपणें रतनसिंग फकिराच्या वेषांत दिसल्यापासून त्यांना चांगलीच अद्दल घडली होती; व त्यापासून ते आतां विशेष खबरदारी घेऊं लागले होते. यासाठीं हुसेननें व जलालुद्दिनानें दोघांनींही वेषांतर करावें असें ठरलें होतें. **हुसेननें जलालुद्दिनाला** पूर्वींच बजावून ठेविलें होतें. कीं कोणीं कोणाशीं तोंडानें बिलकूल बोलावयाचें नाहीं. नुसत्या खुणा करावयाच्या.

जलालुद्दिनाची स्वारी वेषधारी हुसेनची वाट पहात बसली होती. कांहीं खुट्ट झालें तरी त्याचा जीव कसा उतावीळ होई. एकेक पळ त्याला आयुष्याच्या मोलाचें वाटत होतें. सरतेशेवटीं तळघराचें दार उघडलें आणि एक भिकारी आंत शिरला. त्यानें भिकाऱ्याच्या वेषाचे कपडे आपल्याबरोबर आणले होते, ते जलालुद्दिनाच्या समोर टाकले. **जलालुद्दिनानें** ती खूण ओळखून तो वेष धारण केला आणि तो त्या भिकाऱ्याच्या मागून चालूं लागला. तिकडे ते तिघे पठाण जलालुद्दिन व हुसेन यांची वाट पहात सारखे बसले होते. आणि इकडे हे दोघे भिकारी एकमेकांच्या संगतींत चालले होते.

बराच वेळ चालून गेल्यावर अगदीं हलक्या आवाजांत **जलालुद्दीन** म्हणाला

“ **हुसेन !** ”

“ हुं ! ”

“ अरे, हुसेन ! आणखी किती लांब जावयाचें ? अंतर तर कितीतरी दिसतें. ते पठाण इतके लांब कां बसले ? ”

**जलालुद्दिनाच्या** या प्रश्नाला हुसेननें फक्त जलालुद्दिनाचा हात दाबूनच उत्तर दिलें. बोलूं नये असा त्या हात दाबण्याचा अर्थ होता. पण जलालुद्दिनाच्यानें राहवत नव्हतें. तथापि त्याचा नाइलाज होता. त्याला गप राहणें भाग होतें. पण **हुसेननें** दाबलेला हात आपल्या नोकरानें दाबावा तसा दाबलेला जलालुद्दिनाला भासला नाहीं. त्यांत ताठरपणा होता. आणि हुसेनही आडदांड होता खरा. पण **जलालुद्दिनाला** थोडासा संशय येऊन गेला.

थोड्या वेळानें ते दोघे एका ऐसपैस चौकांत आले. त्या ठिकाणीं प्रकाश दिसत होता. त्या प्रकाशांत आल्याबरोबर वेषधारी हुसेन थांबला, तसा **जलालुद्दिनही** थांबला.

वेषधारी हुसेन एका कोपऱ्यांत गेला व त्यानें एक लांबलचक तरवार आणली आणि ती जलालुद्दिनाच्या हातांत दिली व दुसरी एक उचलून त्यानें आपल्या हातांत घेतली. नंतर युद्धाचा सारा पोषाख त्यानें आणून तो पेहरण्यास जलालुद्दिनास खुणाविलें व तसलाच निराळा पोषाख तो स्वतः एका बाजूस जाऊन काळोखांत आंगावर चढवूं लागला.

फार दूरचा पल्ला जावयाचें असल्यास अशी तयारी करून निघावयाची सूचना काबुली पठाणांनीं दिली असेल असें मानून जलालुद्दीन योद्धा बनला. गेल्या आठ दिवसांत विशेष हुरूप आल्यामुळें **जलालुद्दिनानें** खाण्यापिण्यावर अधिक प्रमाणांत हात मारला होता. तुरुंगांत तो असला, तरी त्याचे खाण्यापिण्याचे हाल नव्हते. शिवाय त्याला दुसरीकडूनही खुराक मिळत असे. बऱ्याच दिवसांनीं युद्धाचा पोषाख आंगावर चढतांच त्याला युद्धाची खुरखुरी आली.

" अरे हुसेन ! मला यावेळीं लढाई करावीशी वाटते आहे. तूं येतोस कां दोन हात करायला माझ्याशीं ? " सहज थट्टेनें त्यानें आपल्या नोकरास हटकलें.

" चल तर ये असा पुढें ! " असे अनोळखीचे शब्द अकस्मात् त्याच्या कानीं आले व ते संपतात न संपतात तों धिप्पाड वीरमूर्ती त्याच्यासमोर युद्धास आव्हान देऊन पवित्र्यांत उभी राहिली !

**जलालुद्दिन** आश्चर्यानें थक्क झाला आणि भीतीनें गारठून गेला. थोड्याच वेळांत तो फिरून देहभानावर आला.

" कोणरे तूं ? मला फसवलेंस काय ? "

" मला ओळखलेंस नाहीं अजून ? "

" तूं—तूं—जू. "

" होय, तोच—तोच मी तुझा शत्रु-**जोरावरसिंग.** "

" मला असें फसविण्याचें कारण ? "

" तुला फसविलें नाहीं. मी रजपूत वीर आहें. तुला युद्धसामग्री देऊन शूर सजविला आहे आणि स्वतः मी सज्ज झालों आहे. तुझा विश्वासघात करून फसवावयाचें असतें तर इथें आणीपर्यंत तुला जिवंत ठेविला नसता. काळोखांत तुझी नरडी छाटली असती. पण तो धर्म नव्हे. तो खून झाला असता. खून—काळोखांत खून करणें, विश्वासानें पाठीवर वार करणें हें खऱ्या वीराला रजपुताला—हिंदूला शोभत नाहीं. तो असलें नादान कृत्य करणार नाहीं. आपल्या वैराचा आज निकाल लावून टाकूं. ये असा. "

**जलालुद्दिनाला** बोलतां येईना. युद्ध केल्याशिवाय त्याला दुसरें गत्यंतरच नव्हतें. क्षणार्धांत त्यांनीं उड्या ठोकल्या व एकमेकांवर वार करण्यास सुरवात केली.

त्या दोघां वीरांचें युद्ध जोरांत चाललें आहे, तोंच त्या ठिकाणीं सहा हेर तीन पठाणांना कैद करून घेऊन आले. ते त्या ठिकाणीं एका बाजूस तो युद्धचम-

त्कार पहात उभे होते आणि ह्या दोघांचें निकराचें युद्ध चाललें होतें. एक वीर अन्नूच्या सूडानें संतप्त झाला होता. त्याला आपली प्रतिज्ञापूर्ती करावयाची होती आणि दुसरा जिवाकरितां झगडत होता.

आलेल्या हेरांच्या नायकानें हा युद्धचमत्कार पहावयाचें टाळलें नाहीं. तो, अनिमिष नेत्रांनीं तो युद्धचमत्कार पहात होता. बाकीचे पांच हेर त्या नायकापासून थोडेसे दूर अदबीनें उभे राहिले होते. इतक्यांत दोघेहि वीर एकमेकांच्या वारांनीं दोन बाजूंस गतप्राण होऊन पडले. आणि ते सारे प्रेक्षक आपापलीं वैय्यक्तिक सुखदुःखें विसरून त्या वीरांच्या युद्धकौशल्यांत समरस होऊन गेले होते ते भानावर आले.

मग युद्धाचा निकाल काय झाला ?

# प्रकरण सविसावें.

## साई आणि योगी.

तो गतप्राण झालेला वीर थोड्या वेळानें धडपडून उठला, त्यानें आपल्या शत्रूच्या शवाकडे एकवार पाहिलें आणि पुनः निश्चेष्ट पडला. त्याबरोबर त्याला इतरांनीं उपचार सुरू केले. कैद केलेल्या कैद्यांस दुसरीकडच्या बाजूस नेण्यांत आलें. त्यांचा अद्याप इन्साफ व्हावयाचा होता.

इन्साफ झाल्यावर आग्र्याला जावें कीं अगोदर जावें हा अकबराला विचार पडला होता. आग्र्याच्या किल्ल्यांची बांधणी व त्यांतील दुरुस्ती, शिवाय कांहीं नवीन महाल तयार होईपर्यंत कांहीं दिवस-कारणपरत्वें बादशहा येऊनजाऊन दिल्लीस राहत असे. बाकी त्याची खरी राजधानी आग्रा शहर हीच झाली होती. आग्रा शहर व तेथील किल्ला बांधावयास अकबरशहानें १५६३–६५ च्या सुमारास सुरवात केली. व तें काम पुरें व्हावयास सरासरी आठ वर्षें लागलीं. आमच्या कथानकाचा कालही त्याच सुमाराचा म्हणजे १५७२।७३ च्या नंतरचा आहे. आग्र्याचें बांधकाम पुरें झालें तरी शिक्रीचें व्हावयाचें होतें. शिक्रीला स्वतःला राहण्याकरितां अकबरानें जो वाडा बांधला त्याच्या भिंती त्यानें स्वतःच्या देखरेखीखालीं रंगवून घेतलेल्या आहेत. त्यावरून अकबराच्या चित्रकलेच्या आवडीची कल्पना व अटकळ करतां येते. इबादतखानाचें काम पुरें झाल्यावर तेथील पहिल्या धर्मसभेचें त्रोटक वर्णन मागें एकवार येऊन गेलेंच आहे. आग्र्याचा किल्ला बांधण्यास हजारों कारागीर रात्रंदिवस खपत होते. तो किल्ला बांधायला त्याला तीस लाख रुपये खर्च आला होता. शिक्रीला बांधकाम सुरू होतेंच. दिल्लीलाही थोडें तुरळक काम सुरू असे. शिवाय बाहेर लढाया व मुलुखगिऱ्या सुरू असत. त्यामुळें अकबरशहाला खरी विश्रांति अशी क्वचितच मिळे. अकबराला बाहेरच्या कारस्थानांस तोंड द्यावें लागे, तशीं अंतस्थ कारस्थानें पण चालू होतींच. आणि अंतस्थ कारस्थानांत जनान्यांतल्या स्त्रियांचाही थोडाबहुत हात असे. पण आतांपर्यंत स्त्रियांच्या कारवाईचा इतिहास आम्ही वाचकांसमोर आणलेला नाहीं, व आणण्याचाही हेतु नाहीं. तो आणल्यास वाचकांना पुष्कळ नवलाच्या आश्चर्यकारक गोष्टी समजून कथानक अधिक रम्य होईल हें खरें, पण त्यामुळें कथेचा विस्तार फार प्रचंड होईल. यासाठीं फक्त जरूरीपुरताच भाग या ठिकाणीं नुसता दिग्दर्शित करून जावयाचें आहे.

अकबरशाहाला एकंदर सात बायका होत्या. पण त्यांत दोन रजपूत म्हणजे हिंदु होत्या, एक आर्मिनियन होती आणि बाकीच्या चार मुसलमान होत्या. पण तुर्कस्थानच्या सुलतानची मुलगी ही अकबरची पहिली बायको होती. आमच्या कथानकांत ज्या जोधबाईचा उल्लेख पूर्वीं आला आहे, ती अकबरशाहाची तिसरी बायको अंबराधिपति बिहारी-

मल्ल याची कन्या व निःस्सीम रामभक्त होती. हिचें नांव अकबरशाहानें मरियामुल जमानी, असें ठेविलें होतें. या राणीचें नांव लाडकीनें मुसलमानी ठेविलें होतें, पण उलट-पक्षीं या राणीनें अकबराला ईश्वरभक्त बनविलें होतें. श्रीरामचंद्रजींचीं पूजा दररोज गंगोदकानें केल्यावर तें तीर्थ ती आपल्या पतीला सद्भावानें प्रसाद म्हणून प्राशन करावयास लावीत असें. अर्थात् अकबराच्या बाकीच्या पांच राण्यांस हा प्रकार बिलकूल पसंत नव्हता तेव्हां अर्थातच जनानखान्यांत थोडथोडी धुसफुस असेच. या सात बायका राण्या झाल्या. पण ह्यांच्याशिवाय अकबराच्या दोन दाशा होत्या. त्यांपैकीं एक अकबर बादशाहा झाल्यावर फार दिवस जगली नाहीं. पण माहंनागा अद्याप होती व तीही कमी कारस्थानी बायको नव्हती. बहिरामखानाला हांकलून लावावयास भाग पाडण्याच्या कारस्थानांत या माहम्नागाचें बरेंच अंग होतें असा पुष्कळांस संशय होता. तिचा स्वतःचा मुलगा अदमखान यास प्रधानकी मिळावी अशी तिची महत्त्वाकांक्षा होती ती तिची महत्त्वाकांक्षा साधली नाहीं, तरी तिला बादशाहा मानीत असें एवढें खरें. त्यामुळें तिच्याकडेही पुष्कळ माणसें येत जात असत.

बदाउनी, शिरहिंदी प्रभृति मंडळीच्या बैठकींत माहम्नागाकडे संधान साधण्याविषयींचा प्रश्न निघे, पण ती अकबराच्या विश्वासांतली असल्यामुळें उलट परिणाम झाला तर जीव नकोसा होऊन जाण्याची भीती होतीच. आज हें दरबारीमंडळ खलबत करीत बसलें असतां तेथें घाबरलेला एक दूत आला व त्यानें काबुली पठाण कैद होऊन तळघरांत नाहींसें झाल्याची बातमी दिली.

मुत्सद्यांनीं ही बातमी ऐकतांच त्यांच्या तोंडचें पाणी पळालें.

" जलालुद्दिन कुठें आहे तर मग ? "

" जलालुद्दिनाची कांहीं खबर कळली नाहीं. "

" तो आपल्या कैदखान्यांत तरी आहे काय ? "

" हुसेन त्याला कैदखान्यांतून घेऊन गेला, पण तो भुयारांतून बाहेर आल्याचें उमगलें नाहीं. "

" काय चमत्कार आहे हा ? " एकजण म्हणाला.

" योजावा तो डाव फसतो आणि आंगावर उलटतो ". दुसरा इसम सुस्कारा टाकून म्हणाला.

" आणखी एक बातमी आहे ? "

" कोणती ती ? "

" बादशाहानीं उदेपुरावर पाठविलेल्या दोन्ही टोळ्या प्रतापसिंगानें कापून टाकल्या. "

" खाशी झाली ! "

" आतां तरी डोळे उघडतात कां पहावें. "

" मला त्या रतनसिंगाचा संशय येतो आहे. "

" मला नाहीं त्याचा संशय येत" शिरहिंदी म्हणाले, "तो इमानी नोकर आहे."

" समजेल लवकरच. " बदाउनी म्हणाले.

" शिवाय " तो दूत म्हणाला " प्रतापसिंगानें असा निरोप बादशहाला पाठविला आहे म्हणतात कीं मीनाबाजारला लावलेला चितूर दरवाजा पुन्हां आणीपर्यंत अकबराला स्वस्थता मिळूं देणार नाहीं. चितूर शहर जिंकून घेऊन दिल्लीला गेलेला चितूर दरवाजा पुन्हां आणीपर्यंत लढाई थांबणार नाहीं. "

" आँ ! इतका शिरजोर झाला तो ? "

" ठीक, आतां तूं आपल्या कामाला जा ! " बदाउनी म्हणाला:

" जी ! " म्हणून दूत आपल्या कामगिरीवर निघून गेला. आणि आदमखान त्या मंडळींत येऊन दाखल झाला.

इकडे हा संवाद होत असतां तिकडे आरामबागेंत शेख भावनबरोबर अकबरशहाचें गुप्त बोलणें चाललें होतें. त्यांचें हें बोलणें बराचसा वेळ झाल्यावर बादशहा जावयास उठले.

" मग काय शास्त्रीजी, हेंच ना तुमचें मत ? "

" होय फाझलप्रमाणेंच माझें मत आहे. "

" बेत तहकूब करावा ? "

" बेलाशक. "

" बातमी आहे तशीच राहूं द्यावी कीं अमुक दिवशीं मुक्काम आग्र्याला व्हावयाचा म्हणून आणि एकेक दिवस पुढें ढकलीत दहा पंधरा दिवस जावयाचेंच नाहीं."

" ठीक. "

बादशहा निघून गेले. शेख भावनही आपल्या वाटेस लागले. पण दोघांच्याही मनांत निरनिराळे विचार थैमान घालून सोडीत होते. अकबर महालीखासकडे जाण्यासाठीं वळला. त्याची विशिष्ट खूण ठरलेली होती. त्या खुणेवरून ठिकठिकाणचे पहारेकरी त्याला ओळखीत असत. आजच्या रात्रीच्या प्रकारानें त्याच्या मनांत अनेक विचारांचें काहूर उठलें होतें. फत्तेपूर शिक्रीचा किल्ला बांधून संपत आला होता. आंतील सर्व इमारती कधींच पुऱ्या झाल्या होत्या. महालीखासची दक्षिण बाजू विशेष सुंदर सजविलेली असे कारण त्याठिकाणीं बादशहाची निजण्याची जागा होती. महालीखासच्या आंत बादशहा येतांच त्याचीच वाट पहात असलेला हुजऱ्या आला व त्याला खवाबागमधील शयनमंदिरांत घेऊन गेला.

मध्यरात्र केव्हांच उलटून गेली होती. बादशहाला झोंप यावी अशी इच्छा होती. पण झोंप यावी म्हणून म्हटलें तरी येणारी नसते अथवा न यावी म्हणून म्हटलें तरी यावयाची राहत नाहीं. तो विशिष्ट शरीरधर्म आहे. बादशाही बेगमच्या महालाकडे

जावयाची तिथूनच वाट होती. आपल्या पट्टराणीकडे जावें असें वाटून बादशहा उठला आणि शयनमंदिरांतून बाहेर आला. शेख भावन ऊर्फ विश्वंभरशास्त्री यांचा सल्ला न मानतां आपण एकदम दुसऱ्याच दिवशीं पूर्वी ठरल्याप्रमाणें मुक्काम नेण्याचा बेत कायम करावा असा त्याच्या मनाचा विचार होता. तो उठला आणि बाहेर आला. सारें आकाश ढगांनीं व्याप्त झालें होतें व काळोख कुट्ट पडला होता. कारंजांतलें पाणी उडत होतें व त्याचे तुषार वाऱ्याच्या झुळकीबरोबर आंगावर येऊन गार वाटत होतें. वारा झुळझुळ वहात होता. बेगमांच्या महालांतील नाचगाणें बंद झालें होतें. तुर्की सुलतानांची मुलगी बादशाही बेगम मात्र अझूनही बादशहाची वाट पहात जागी राहून कंटाळली होती व नुकतीच झोंपीं जात होती. बादशहाचें मन डळमळत होतें. तो विचारांच्या तंद्रींत त्या ठिकाणीं येरझारा घालीत असतां त्याच्या समोर एक धिप्पाड उंचच उंच, उघडा बंब, छातीपर्यंत दाढी लोंबत असलेला असा भव्य पुरुष येऊन उभा राहिला.

तो समोर येऊन त्याचा हात बादशहाच्या मस्तकावरून फिरेपर्यंत बादशहाला त्याची जागमागच नव्हती. काळोखांत स्पर्श झाल्यावर पहिल्या क्षणीं बादशहा दचकला. पण तो स्पर्श त्याच्या ओळखीचा असल्यामुळें बादशहानें लगेच त्या भव्याकृतीसमोर गुडघे टेंकले.

" अकबर! तुला दगा होण्याचा संभव आहे. "

" खरी गोष्ट. मला माहीत आहे. "

" तूं अतिशय काळजींत आहेस. "

" होय. "

" काळजी करूं नकोस. आग्र्याला जावयाचें थोडे दिवस थांबव. शेख भावन व फाझल यांचा सल्ला योग्य आहे. तोच ऐक. "

" ठीक आहे. "

" शिवाय तुला अप्रिय वाटणारी अशी गोष्ट मला सांगावी लागत आहे. पण ती मी न सांगेन तर तुझें नुकसान होईल. "

" सांगावी. "

" फत्तेपूर शिक्रीचा राहिलेला कोट पुरा करूं नको. तो पुरा करण्याच्या भानगडींत पडलास तर सध्या आलेल्या संकटाला जोर येईल. तो अपुरा टाकलास तर संकट निस्तरेल. "

हें बोलणें ऐकून अकबराला आश्चर्य वाटलें व वाईटही वाटलें. थोडेंसें राहिलेलें बांधकाम अपुरें टाकावयास त्याचें मन बिलकूल तयार नव्हतें. त्यानें नुसतें " हं" म्हटलें.

" ही गोष्ट तुला अप्रिय आहे हें मी समजतों. पण त्याला इलाज नाहीं. आतां आणखी आजच्या राजपुतान्यांतल्या बातमीबद्दल– "

" होय तेंच मी विचारणार होतों– "

" छट्‌ ? तूं कांहीं एक मला विचारतां कामा नये. तुला ज्या गोष्टी सांगणें योग्य आहेत, त्या मी होऊनच सांगेन. अयोग्य अशा माझ्या मनाला वाटतील, त्या तूं विचारल्यास तरी मुळींच सांगणार नाहीं. "

" हूं. "

" ऐक तर ! प्रतापसिंह तुझा अंकित कधींच होणार नाहीं ! तूं पाहिजे तर प्रयत्न करीत रहा. कारण तसें करण्यांत तुझी इभ्रत आहे. पण त्यांत तुला यश येणार नाहीं. तो स्वातंत्र्यवीर आहे व तो स्वतंत्रच असणार. ती एक सोडून बाकी सर्व स्वाऱ्या तुझ्या यशस्वी व्हावयाच्या आहेत. "

" मी आणखी एक प्रश्न विचारणार—"

बादशहाचें वाक्य संपायच्यापूर्वीच तो भव्य पुरुष—तो विलक्षण अवलिया काळोखांतल्या काळोखांत नाहींसा झाला होता.

बादशहा त्या ठिकाणीं डोळे चोळीत पहात तटस्थ चित्रासासारखा उभा होता. कांहीं वेळानें तो शयनमंदिरांत गेला. पण तरी झोंप येईना. तेव्हां तो तेथून महालीखासच्या गच्चीवर गेला व तेथील खुंटीवरून लोंबणाऱ्या दोरीच्या टोंकाला त्यानें धरून ओढलें. त्याबरोबर एकामागून एक पांच घंटेचे ठोके झाले आणि रहाटाला लावलेली घागर ओढतांना जसा आवाज व्हावा तसा आवाज सुरू झाला.

असा आवाज सरासरी वीसपंचवीस मिनिटें एकसारखा सुरू होता. या महालीखासच्या गच्चीवरून आगगाडीचा अथवा ट्रॅमचा रस्ता असावा तसा रस्ता लांकडी रूळ व भक्कम दोरखंडाचा केलेला होता. त्याला झाडें व उभारलेले खांब यांचा मधूनमधून आधार होता. या रस्त्यावरून एक काळी आकृति दूर अंतरावरून येत असलेली दिसूं लागली. जवळजवळ आली तशी ती आकृति स्पष्ट दिसूं लागली. जसा सोफा असावा, तशा आकाराची एक उत्कृष्ट बैठकीची खुर्ची व त्या खुर्चीवर बसलेला कोणी तरी माणूस होता. व तें वाहन झरझर घसरत त्या अंतराळांतच्या लांकडी रस्त्यावरून येत होतें. बादशहा उभा होता, त्याच्या मागच्या बाजूस झनानखान्याच्या इमारती होत्या. ती खुर्ची आलेली पाहतांच बादशहादेखील गच्चीवरील एका कोपऱ्यांतील खुर्चीवर बसला. त्याबरोबर ती खुर्ची वर ओढली गेली. या खुर्चीवर छत्र राजसत्कारसाधनें होतीं. थोड्याच वेळांत ती खुर्ची बादशहाच्या खुर्चीसमोर आली. बसलेल्या व्यक्तीनें किंचित्‌ उठल्यासारखें करून बादशहास अभिवादन केलें.

बादशहानें हळू आवाजांत त्या व्यक्तीला कांहीं हकीगत कळविली आणि त्याच्या उत्तराची वाट पाहूं लागला. ती व्यक्ति विचारांत गढलेली होती. त्या व्यक्तीनें उत्तरादाखल केलेलें भाषण म्हणजे एक शास्त्रच होतें. तें सबंध शास्त्र लिहूं गेल्यास मुख्य कथा बाजूसच राहील, शिवाय तें वाचकांसही आवडेल असें वाटत नाहीं. त्यादिवशीं त्या व्यक्तीचें बादशहासमोर झालेलें व्याख्यान नवग्रहांच्या स्वरूपाबद्दलचें

होतें. नऊ ग्रह, त्यांचे स्वभाव, त्यांचे पोषाख, त्यांना प्रिय असलेल्या वस्तु, इत्यादि विवरण करून शेवटीं त्या व्यक्तीनें अकबरास आठवड्याच्या सात दिवसांत त्या त्या वाराप्रमाणें त्या त्या दिवसाच्या ग्रहाला आवडणारा पोषाख व वस्त्रें आणि अलंकार पेहरावयास सांगितलें. मघाशीं त्या भव्याकृतीनें सांगितलेल्या गोष्टीच याही व्यक्तीनें अनुसरिल्या आणि तसाच सल्ला बादशहाला दिला. तें सर्व बोलणें बादशहा लक्षपूर्वक ऐकत होता.

" योगिराज ! " बादशहा म्हणाला, " सेलीम खिस्ती व आपण या दोघांच्या इच्छेप्रमाणें मी माझें धोरण ठरवीत असतों; जगांत यशस्वी पुरुष होऊन गेले, त्यांच्यांत माझी गणना होण्याइतकें यश मला आलें आहे. ही तरी अल्लाची किसमत, आणि तुम्हां दोघांची कृपा. सलीम खिस्ती यांनीं मला आतांच दर्शन दिलें. त्यांची नुस्ती आठवण मला झाली होती. तें तात्काळ ख्वाबागजवळ प्रगट झाले. त्यांचे शब्द ऐकून त्याविषयीं विचार करीत असतां मला तुमचें स्मरण झालें. आतां आपणाला मला विचारावेसें वाटतें तें असें कीं, तुमच्यासारख्या तपस्वी योग्यांच्या सल्ल्यानें वागत असतां देखिल मला यश पूर्णपणें कां येत नाहीं? प्रतापसिंगाचें मस्तक माझ्यासमोर नम्र होणारच नाहीं काय ? "

" बादशहा, आमच्यासारखा कोणी ज्ञानी–अर्थात् भविष्यज्ञानी पुरुष झाला तरी तो न विचारतां आपण होऊन सगळ्या गोष्टींचा उलगडा करणार नाहीं. कारण भविष्य-ज्ञान जीवमात्राला झालें तर तो निष्क्रिय बनेल. जगाच्या सर्व उलाढाली भविष्य-काळच्या अज्ञानावरच अवलंबून आहेत. चितोडवरच्या स्वारींत तुला यश आलें आहे. तूं तसाच प्रयत्न चालू ठेव. पण प्रतापसिंह तुझ्यासमोर मस्तक वांकविणार नाहीं."

" मस्तक वांकविणार नाहीं, तर प्रयत्न चालू ठेव कशाला म्हणतां ? "

" एवढ्याचसाठीं, कीं हें भविष्य तुला कळलें नसतें तर तो तूं चालू ठेवणार होतास म्हणून. "

" आलं लक्षांत–ठीक आहे. पण माझी धर्मैक्याची तयारी यशस्वी होणार ना ? "

" होणार "

" फैजीला विद्या साधन करायला पाठविला आहे, त्याला विद्यासाधन होईल ना ? "

" होईल "

" मग माझे मनोरथ पूर्ण होतील तर. "

यावर मात्र हे योगिराज कांहीं बोलले नाहींत पण तिकडे अकबराचें लक्ष गेलें नाहीं. त्याला हवीं होतीं तेवढीं उत्तरें मिळालीं; व तेवढ्यावरून आपली इच्छा शेवटास जाणार असें त्यानें अनुमान काढून त्या आनंदांत क्षणभर गढून गेला. उतावळ्या मनाचें असेंच असतें. फैजीला विद्यासाधन प्राप्त झाल्यानंतर तो आग्र्याला येणा-

त्याला आपण मोठ्या योग्यतेस चढवणार आणि हिंदूंचें ऋग्वेदादि वेद श्रुति ग्रंथ आपण फारसी भाषेंत उतरून एक अलौकिककार्य मोठ्या शिताफीनें पार पाडणार. आपण नवधर्म-संस्थापना तर केलीच आहे.

अशाप्रकारच्या विचारांनीं अक्बर फार खूष झाला.

" योगिराज ! आतां आपणाला आणखी तसदी देत नाहीं. एवढेच प्रश्न मला विचारावयाचे होते " शहा म्हणाला.

" ठीक आहे. मी जातों तर. "

" ठीक " अकबरशहानें पुन्हा रस्सी खेंचली. पुन्हा घंटा वाजली. पुनः सर्‌र्‌र्‌र्‌र् सर्‌र्‌र् आवाज झाला आणि योगिराजांचें आसन त्या रश्शीच्या आधारानें दूर दूर जात लवकरच काळोखांत अदृश्य झालें.

पण अकबराचें हे मनोरथ तडीस गेले काय ? योगिराजांचें हें भविष्य तंतोतंत अनुभवास आलें कीं नाहीं ? आलें नसल्यास तें कां ? तो इतिहास तर फारच मनोरंजक आहे आणि ओघानें आतां यावयाचा आहे.

या गोष्टीला कांहीं दिवस, दिवस कां महिने लोटले. शिकिचा तळ आग्र्याला गेला. अर्थात् सारा लवाजमा सुद्धां गेलेलाच होता. दरम्यानच्या अवधींत ज्या गोष्टी घडाव्या त्या आपणाला आयत्याच कळण्याला एक स्थळ आहे. तें म्हणजे बदाउनी शिरहिंदी प्रभृतींचा खलबतखाना हें होय. या ठिकाणीं बाजूस राहिलें असतां दरम्यानच्या काळावधींत घडलेल्या साऱ्या गोष्टी सहजच समजून येतील.

" अथर्ववेदाचें भाषांतर पुरें झालें ना ? "

" हो तें कधींच झालें. आतां ऋग्वेदाचें मात्र अद्याप झालेलें नाहीं. त्याचें काय होतें तें पहावयाचें आहे. "

" मध्यंतरी फैझी बेपत्ता झाल्याची जी वार्ता उठली, तिच्यांत मोठीच गोम आहे. खुद्द बादशहानेंच फैजीला विद्या संपादण्याकरितां कुठें तरी पाठविला आहे असें मला समजलें आहे " हे शब्द इत्मतुद्दौला याच्या तोंडचे होते. हे शब्द ऐकतांच इत्मतुद्दौला साहेबांचा शिपाई कान टवकारून ऐकूं लागला.

" कुठें तरी कां म्हणतां ? त्याला काशी येथें पाठविला आहे. मला ही बातमी कधींच समजली आहे. " बदाउनी म्हणाला.

" अस्सं ? तर मग तो कुठें आहे हेंही आपणांला समजलें असेलच. " इत्मतुद्दौला म्हणाला.

" हो ! हो ! तें देखील मला ठाऊक आहे, पण मी त्याचा स्फोट एव्हां मात्र येथें करणार नाहीं " बदाउनी म्हणाला.

" तें नाहीं चालणार. आपण जर सर्व विश्वासानें जिवाभावाच्या गोष्टी एकत्र करतों, तर तुम्ही मात्र आमच्यापासून ही गोष्ट लपवून ठेवावी हें नाहीं आपल्याला पसंत ! ! जरासे तेढानेंच शिराहिंदो म्हणाला.

" अलबत् ! शिरहिंदीसाहेबांचें म्हणणें रास्त आहे " इत्मतुद्दौलासाहेबांनीं दुजोरा दिला.

" हो ! " बाहेरून ध्वनि आला.



# प्रकरण सत्ताविसावें.

## फैझी कुठें आहे ?

सगळेच जण चपापले आणि " हो " असा ध्वनि कुठून आला हें डोकावून पाहूं लागले. जीभ चाऊन कावरा बावरा झालेला कारभारीसाहेबांचा शिपाई त्यांच्या दृष्टीस पडला.

" कायरे–ऐ–हो असें कां म्हणालास तूं ?" कारभारीसाहेबांनीं दरडावून विचारलें.

" कांहीं नाहीं, जांभई देतांना तो तसा आवाज झाला; मी 'हो' असें मुद्दाम म्हटलें नव्हतें "

या उत्तरानें बोलण्यांत गढलेल्या त्या मंडळीचें समाधान झालें व त्यांचा खल-बतखाना पुन्हा सुरू झाला. शिपायाला वाटलें, आपल्या जिवावरचें संकट टळलें. कारण तो इसम आंतील मंडळीच्या संवादाशीं इतका समरस होऊन गेला होता कीं फैझी कुठें आहे हें जाणून घेण्याची इच्छा आंतील इतर मंडळीहून कांकणकर जास्तच त्याच्या मनां-तही बळावली होती. त्या भरांत तो देहभान विसरला आणि औत्सुक्यातिशयानें 'हो' म्हणून चुकला. मागाहून आपली चूक तो उमजला, पण ती उमज जरा उशीरां पडली, कारण तत्पूर्वींच इतरांचें लक्ष त्याचेकडे गेलें.

" मूर्खच आहे तो. " कारभारीसाहेबांनीं पुन्हां खलबताला सुरवात केली. " पण फैझी कोठें आहे तें मात्र आम्हांला समजलेंच पाहिजे."

" तें सांगतों, पण काबुली पठाणांचें काय ? "

" ते प्राणास मुकणार असा रंग दिसतो. "

" पण आमचें कोणाचें नांव फुटणार नाहीं अशी खबरदारी घेतली आहे ना ? " कारभारी साहेबांनीं विचारिलें.

" ती नको तुम्हांला काळजी " बदाउनी म्हणाले. " पण त्यांच्या बचावाची कांहीं युक्ति निघाली असती, तर बरें झालें असतें. कारण ते मारले गेले, तर काबूलचें आपलें कारस्थान फसणार. मिर्झा हकीमांनीं या लोकांना आपल्या जिवावर पाठविले आहेत. हें आपण विसरतों आहोंत "

" त्याला मी एक युक्ती काढली आहे. " आदमखान म्हणाला.

" काय बरं ती ? " बदाउनींनें विचारलें. सगळे जण ती युक्ति ऐकण्यास उत्सुक झाले होते.

" फैजी कुठं बरं आहे ? " बदाउनीला आदमखानानें खोंचीनें विचारलें. सर्वांनीं आनंदानें आदमखानाची पाठ थोपटली. फैजीची पुन्हां सर्वांना आठवण होतांच

बदाउनीनें उत्तर द्यावयाचें टाळलेला पूर्वोक्त प्रश्न पुन्हां पुढें आला. आणि बदाउनीचा नाइलाज झाला. त्याला आदमखानाची युक्ति ऐकावयाची होती. पण फैज़ी कुठें आहे हें सांगितल्याशिवाय त्याला आदमखानाची युक्ति कळणें अशक्य होतें. किंचित् विचार केल्यासारखें दाखवून तो पुन्हा एकदम म्हणाला,

" जवाहिरसिंगाची हकीगत आपल्याला कळली काय ? "

" उंः ! " निराशेनें मघांच्याच कारभारीसाहेबांच्या शिपायानें बाहेर म्हटलें. पण त्यानें आतां आपलें उद्गार आंतील ऐकूं न येण्याइतके हळू उच्चारण्याची खबरदारी घेतली होती.

" काय बरं ती ? " शिरहिंदींनें विचारलें.

" जवाहिरसिंग दिल्ली सोडून गेला. "

" अँ ? " कारभारीसाहेबांनीं म्हटलें.

" तो असें करील असे आम्ही पूर्वीं ताडलेंच होतें. " शिरहिंदी म्हणाले.

" पण रतनसिंग आहे ना ? " आदमखानानें विचारलें.

" रतनसिंग अद्याप आहे. जलालुद्दिनाच्या बळी घेऊन जवाहिरसिंग फरारी झाला. फार वाईट गोष्ट झाली. "

" तुम्ही कांहीं म्हणा. पण जलालुद्दिनाला बादशहानेंच मारविलें आहे असें मला वाटतें. " आदमखान म्हणाला.

" साफ खोटी गोष्ट " बदाउनी म्हणाला.

" अहो मारविलें म्हणजे तो मारला गेला असतां त्याची उपेक्षा डोळेझांक केली असा त्यांच्या बोलण्याचा भावार्थ आहे. खरं कीं नाहीं आदमखान ? " स्पष्टीकरण करीत शिरहिंदी म्हणाले.

" हां. " आदमखानानें प्रसन्न चित्तानें रुकार दिला.

" हं. हें म्हणणें कांहीं केवळ खोटें म्हणतां येणार नाहीं. जलालुद्दिनाच्या मृत्यूकडे बादशहानें काणाडोळा केला आहे. पण मी म्हणतों तुम्ही या गोष्टी आतां किती म्हणून सहन करून घेणार ? बादशहानें काय काय म्हणून करावयाचें शिल्लक ठेवलें आहे? नाण्यावरचा पूर्वींचा जो भाग पवित्र कलमामधून घेऊन शिक्क्यांत उठविलेला असे, तो काढून टाकून त्या ठिकाणीं " अल्ला हो अक्बर " आणि " जल्लाहु जलाहुहु " असा मजकूर कोरविला आहे. हा अधर्म नव्हे काय ? " बदाउनीच्या ह्या भाषणाचा सर्वांच्या मनावर फार परिणाम झाला. तो परिणाम टिकविण्याकरितांच बदाउनी पुढें म्हणाला—

" मित्र हो ! बादशहाची एकएक कृति वर्णावी तेवढी अधार्मिकपणाचीच होईल. सात दिवसाला सात रंगाचे पोषाख, गंगोदकसेवन, आंगाला गंध लावणें, सलीम खिस्ती आणि तो म्हातारा योगी यांच्याशीं रात्रौ गुजगोष्टी करणें अशा किती कथा सांगाव्या ? अशानें राज्य कायम टिकेल असें तुम्हांला वाटतें काय ? "

" बिलकूल नाहीं. आपण शहाजादा सेलीम यास तयार केला पाहिजे. आदम खान म्हणाला.

" तें धोरण समोर ठेवून सेलीमचें शिक्षण चालविलें आहे. " इत्मतुद्दौला म्हणाला.

" पण या शेखभावननें आपणां सर्वांना फसविलें. "

" त्याला पण आम्ही कामाला लावला आहेना ? " बदाउनी म्हणाला.

" कसल्या ? " आदमखानानें विचारलें.

" अल्लसूक्त रचण्याच्या. "

" खरंच कीं काय ? "

" हो तर. तयार झालें देखील. पुढील धर्म–सभेंत त्याचें प्रथम वाचन व्हावयाचें आहे. पण तें वाचन धर्मसभा संपल्यावर खास निवडक मुसलमान मंडळींतच फक्त व्हावयाचें आहे. "

" फार छान ! " सर्वजण म्हणाले.

" हें अल्लसूक्त आतां वेदांच्या भागांत देवतांच्या सूक्तांत मध्येंच घुसडून द्याव-याचें आहे. "

" फार छान !

सभा रंगांत आली होती. बदाउनीला वाटलें, आपल्यावरील फैझीचा ठावठिकाणा सांगण्याची पाळी चुकली.

" शिवशर्मा मात्र आतां पूर्वीसारखे ग्रंथ आणून देत नाहीं. शिरहिंदी म्हणाले.

" तो आतां मठाचा मालक बनला ना ? " बदाउनी म्हणाला.

" मठाचा मालक बनला खरा, पण या तुमच्या शब्दांवरून मला आणखी एक आठवण झाली. या आग्र्याच्या वाटेनें जाणारे कांहीं रजपूत शिपाई दिल्लीच्या रस्त्याला लागले णाणि ते इसम उदेपूरच्या बाजूचे असावेत असा माझा तर्क आहे. ते यात्रेकरू खरे नसावेत. यात्रेकरू लोक आणि स्वार दोघेही प्रवासांत घोड्यावर बसतात खरे, पण त्यांच्यांत फरक असतो असें आमचा बातमीदार म्हणत होता. " शिरहिंदी म्हणाले.

" तर मग दिल्लींत शिवशर्म्याच्या मठावर गस्त ठेविली पाहिजे. त्याचा उदेपूरशीं असलेला संबंध हें शेखभावनचें कारस्थान आहे असें बादशहासमोर मांडण्याइतका पुरावा मिळाला म्हणजे बस्स आहे. "

" सहज मिळूं शकेल. पण बादशहाचें लाहोरला जावयाचें लवकरच ठरणार म्हण-तात. तें खरं कां ? " कारभारीसाहेबांनीं विचारलें.

" कांहीं कळलं नाहीं, पण तुम्हाला कुठून मिळाली ही माहिती ? " बदाउनी म्हणाला.

" बातमी आली अशीच वाऱ्यावरून ? "

" तरी पण ? "

" **फैझी** कुठें आहे ? आणि काबुली पठाणाला बचावण्याची युक्ति काय आहे, हें जोपर्यंत तुमच्या दोघांकडून मला समजलं नाहीं, तोंपर्यंत ही खास गुप्त बातमी कुठून मला समजली तें ही पण मी तुम्हांला सांगणार नाहीं. " कारभारीसाहेब म्हणाले.

पुन्हां सगळेजण मोठ्यांदा हांसले.

" **फैझी** कुठें आहे ? सांगा तर खरें ? " **बदाउनीला** एकानें विचारलें.

" फैझी कुठें आहे ? " हाच प्रश्न बाहेर बसलेल्या शिपायाला देखील विचारावासा वाटत असावें असें त्याच्या चर्येवरून कोणालाही वाटलें असतें.

पण खरी गोष्ट काय आहे हें कोणालाच माहीत नव्हतें.

" **फैझी** काशींत आहे. " बदाउनीनें उत्तर दिलें.

" पण काशींत तरी कोणत्या ठिकाणीं ? "

या प्रश्नाला **बदाउनीला** उत्तर देतां येईना. कारण **फैझी** काशींत आहे, याच्याहून विशेष माहिती खुद्द त्यालादेखील नव्हती. तथापि आपल्या मुत्सद्देगिरीची फुशारकी मिरविण्याकरितां म्हणून थाप मारून त्यानें हा वेळेपावेतों सर्वांस झुलविलें होतें. परंतु आतां त्यांस मोठा पेंच पडला होता. वस्तुस्थिति आपणाला नक्की माहिती नाहीं, ही खरी गोष्ट कबूल करावी तर आपणाला कमीपणा येतो व शिवाय त्या म्हणण्यावर आतां कोणाचा विश्वासही बसला नसतां. बरं ही खरी गोष्ट नाकबूलच केली तर लोक बिथरतील अशी भीति होती.

" काबुली पठाणांवरची शिक्षेची पाळी कशी चुकणार तें तर आधीं कळूं द्या. " बदाउनी म्हणाला.

" सम्राट् लाहोरला लवकरच जाणार ही बातमी कशी आली तें तर आधीं समजू द्या." आदमखानानें म्हटलें.

एकंदरींत ही मालिका उलटी फिरत आली.

" कशी कळली तें सांगतों. " कारभारीसाहेब म्हणाले. " आमच्याकडची एक बाई मामानागाकडे जात येत असते. तिच्याकडून ही बातमी आम्हांला समजली. ही बातमी दरबारी नव्हे–झनानखान्यांतली आहे. "

" म्हणूनच त्यांत कांहीं तथ्य असलें पाहिजे." शिरहिंदी डोळे मिचकावून म्हणाले.

" कदाचित् त्याच्या उलटही असू शकेल." बदाउनी म्हणाला.

" पण खरंच सूतिकागृहाचा हा खेळ बादशहाचा विचित्रच नाहीं काय ? " **आदमखान** म्हणाला.

" विचित्र प्रकार केल्याशिवाय प्रख्याति कशी होईल ? " बदाउनीनें उत्तर दिलें.

" याचा परिणाम काय होणार ?"

" एक दोन वर्षांत सारेंच ॐफस् होईल झालें."

" सूतिकागृहांत बाळंत झालेल्या बायांच्या बारा मुलांपैकीं तीन चार मुलें मरून गेलीं असें म्हणतात." कारभारीसाहेब म्हणाले.

" आणि उरलेलीं तरी सारीं जगतील म्हणून कशावरून?"

" असंच कांहीं नाहीं."

" असंच आहे?"

" कसं?"

" जन्मतः मनुष्याची वाणी कोणत्या भाषेंत प्रगट होते, या प्रश्नाचा छेडा लावण्याकरितां बादशहाचा हा वेडा प्रयत्न आहे. वास्तविक या असल्या फंदांत बादशहा सारख्या माणसानें कधींच पडावयाचें नाहीं. असें असतां बाळंतिणींना एकत्र करून त्यांच्या मुलांस अशा रीतीनें वाढवावयाचें कीं मनुष्यवाणीच त्यांच्या कानीं पडूं नये. सर्व व्यवहार फक्त खुणांनीं व्हावयाचें. अशा स्थितींत त्या मुलांची प्रेमळ जोपासना कशी व्हावी? आणि कुराणांतील वचनांना खोटें ठरविण्याचा असला प्रयत्न यशस्वी कसा व्हावा?"

" त्यांतील एक तरी मूल बोलूं लागलें का?"

" मुलांच्या समक्ष कोणी अवाक्षर देखील उच्चारावयाचें नाहीं अशी बादशहाची सक्त ताकीत आहे. मुलांनां मनुष्यवाणी मुळीं कानांत पडूं द्यावयाचीच नाहीं असें तत्व आहे तें!" बदाउनी म्हणाला " ठीक त्या मुलानां दरबारांत आणण्याची तारीख लागली नाहीं वाटतं अझून?"

" मुदत ठरली आहे, पण नक्की तारीख जाहीर नाहीं झालेली"

" पण फैझी कुठें राहतो?"

" काबुली पठाण कसे निसटून जाणार?"

" हे काबुली पठाण आले" बाहेरील शिपाई आंत येऊन म्हणाला.

" ऑं. काबुली पठाण आले? तुरुंगांतून सुटले?"

" का फरारी झाले?"

" का बादशहांनीं मोकळे केले?"

" कीं नवीनच आणखी आले?"

" आणा त्यांना आंत"

एकेकाच्या तोंडून वरील उद्गार बाहेर पडत असतांच दोन पठाण आंत आले. त्याच्याबरोबर एक मोंगली दूत होता. त्यांनीं आदबीनें मुजरा केल्यावर त्यांच्याकडे पाहतांच या चौकडीला फार आश्चर्य वाटलें.

पण बाहेरचा शिपाई स्वतःशींच पुटपुटत होता—

" हे नवीन पठाण कुठून आले आणि तो फैझी काशींत कुठें दडी मारून बसला आहे?"

---

# प्रकरण अठ्ठाविसावें.

## रहस्य—स्फोट !

खरेंच पण फैजी कुठं आहे ?

आग्र्यांतील मुत्सद्यांची चौकडी फैजी कुठें आहे म्हणून शोध करीत आहे. कारभारीसाहेबांचा शिपाई फैजी कुठें आहे हें समजून घेण्यास अतिशय उतावीळ झाला आहे. फैजी कुठें आहे, हें आपणास मात्र ठाऊक आहे. तथापि काशीक्षेत्रांत ज्या ठिकाणीं आपण फैजीला पाहिला होता, त्या ठिकाणाहून निघून तो बेपत्ता झालेला आहे. अकबराला वाटत आहे फैझी कुठें आहे ? मुबारिक त्याचा बाप, त्यालाहि तीच काळजी आहे. बदाउनी शिरहिंदी प्रभृतींना तीच विवंचना आहे. कारभारीसाहेबांच्या शिपायाला तर तीच उत्कंठा आहे. आणखीही अनेक जणांना हाच प्रश्न पडला आहे. खुद्द त्याचे गुरुजी व गुरुकन्या काशी यानांही वाटत आहे कीं फैझी कुठें तरी गेला आहे. पण वाचक ! खरोखर फैझी कुठें आहे ? फैझीनें सर्वांस चकविलें आहे. फैझी गुरुगृहांतून निघून गेला आहे. तो निघून जाण्याच्यापूर्वी काय चमत्कार झाला तो तुम्हाला समजेल तर फैझीचा शोध करण्याचा मार्ग तुम्हाला तरी एखादा सुचूं लागेल असें वाटतें.

फैझीला गुरुगृहीं वास्तव्य करून दहा वर्षें झाली. वेदविद्येंत तो निष्णात झाला. पण तो अस्थिपंजर मात्र शिल्लक राहिला. विद्येचें तेज त्याच्या मुखावर झळकत होतें. पण तो शरीरानें अत्यंत कृश बनत चालला होता. तो दिवसेंदिवस चिडखोर, संशयी, कुढया मनाचा होत चालला आहे असें काशीला व त्याच्या गुरुजींना वाटूं लागलें होतें. एकदा गेल्यावर पंधरा पंधरा दिवस आश्रमांत यावयाचें नाहीं, असा त्याचा आचार बनत चालला होता.

पण तो अगदीं खंगत वाळत कां चालला हें मात्र या दोघांसही समजेना. त्यांनीं त्याला पुष्कळ खोदून खोदून विचारलें. पण तो तर आल्यावेळीं नवखा असतांना होता त्याच्याही पेक्षां जास्त मितभाषी, संकोची आणि घुम्या झाला. हा असा फरक त्याच्या स्वभावांत कां पडावा ? खरंच पण कां बरें पडावा ?

आणि आम्ही म्हणतों असा फरक त्याच्या स्वभावांत कां बरं पडूं नये ? असा फरक पडला नसता तरच मोठें आश्चर्य. त्यानें नांवरूप बदलून गुरुगृहीं प्रवेश केला. मिथ्या भाषण करावें लागेल व आपलें खरें रूप प्रकट होण्याचे प्रसंग येतील तें टाळावें, म्हणून तो फार दूर दूर राहूं लागला. संथा घ्यावयास व विशेष कार्यपरत्वेंच तो गुरुसंनिध जाऊं लागला. तथापि यावयाचा तो प्रसंग, जो कधीं येऊं नये असें **फैझीला** वाटे तो प्रसंग, जो विद्यासाधन करणाऱ्या कचदेवावर आला होता तोच विचित्र प्रसंग शेवटीं येऊन गुदरलाच.

गुरु-कन्यका काशी हिचें प्रेम कुमारावर बसलें होतें, याचा तर्क मागील एका देव-दर्शनाच्या प्रसंगावरून देखील करतां येण्यासारखा आहे. जितका जितका कुमार दूर राहूं लागला, तितकें तितकें त्याच्यावरचें काशीचें प्रेम अधिकाधिक वाढूं लागलें. हा कुमार तिला आपल्याला सर्वतोपरी अनुरूप पति आहे असें वाटत होतें. गुरुजींच्या मनांत फार उशीरां ही गोष्ट आली. त्यानांहि ती तिची निवड अनुचित वाटली नाहीं. तथापि त्यांनीं त्या गोष्टीचा विचार फारसा कधीं केलाच नाहीं. वेळ येईल तेव्हां पाहतां येईल असा त्यांचा हेतु होता. पण कालक्रमानें तो प्रसंग येऊन ठेपलाच.

विद्यासाधन होतांच **फैझीनें** ताबडतोब यावें असे गुप्तहेरांमार्फत मधून मधून **फझ्लीला** निरोप जात असत. याचा एक नमुना पूर्वी **रतनसिंग** फकीराचा वेष घेऊन आल्यावेळीं दिसलाच आहे. चार वेद विशेषतः ऋग्वेद तयार झाला तरी **फैझीनें** मागें परतावयास हरकत नाहीं असें अकबराचें सांगणें होतें. कारण अधिक दिवस घालवावे तितकें विद्यासाधनाच्या दृष्टीनें हितकर असलें तरी वेष प्रकटीकरणाच्या दृष्टीनें घातकारक होणार होतें. म्हणून बादशहा सारखी घाई करीत होता. शिवाय आपला डाव साधणार ही त्याला खात्री वाटत होती. त्रिकालज्ञानी योगिराजाच्या भविष्यकथनावरून त्याला तशी खात्री वाटत होती. तथापि भविष्य कथनांतील खोंचा आणि पळवाटा भविष्य ऐकणाराच्या कधींहि ध्यानींमनींदेखील येत नसतात. ते लोक भविष्यकालीन सुखसंपदेचे मनचे मांडे भाजण्यांत चूर होऊन बसतात आणि भविष्यघटना निराळ्याच गोष्टी घडवीत असते! बिचारा मानवप्राणी! राव असो कीं रंक असो. भविष्यकालाला तो सारखाच वाटतो.

कुमारानें अधीतविद्य होतांच आपल्या गुरूची परवानगी घेण्याचा दिवस ठरविला. पण त्याच्या हृदयाचा थरकांप होऊं लागला. आतां पुढें प्रसंग काय ओढवेल हें त्याला नक्की ठाऊक नसलें तरी अनुमान त्याला झालें होतें. काळीज फत्तरासारखें करण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता. पण लोण्याला फत्तराचे गुण कसे धारण करतां येतील? सात्विकतेची केवळ मूर्तीच असा कुमार गुरूसमोर जातांना लटलटां कापूं लागला. बादशहाच्या सांगण्यावरून त्यानें आचरलेलें कपट इतकीं वर्षें मूक जाचणी करीत होतें, पण तें कापट्य आतां मूर्त रूप धारण करून त्याच्या डोळ्यांसमोर थैमान घालूं लागलें! कुमार भेदरून गेला?

कुमार आपल्याकडून निघून जाईल अशी गुरूची किंवा गुरुकन्यकेची कल्पना देखील नव्हती. ना आई ना बाप. घर ना दार. गुरु आणि गुरुकन्या हींच काय ती दोन सांसर्गी माणसें. विद्याव्यासंग हाच केवळ व्यवसाय. ईश्वरचिंतन हेंच करमणूकीचें साधन. तत्वज्ञान हीच धनदौलत. कविताराधन हेंच मनोविनोदन. अशाप्रकारचा कुमार कीं ज्याच्या हृदयाचें बंधन जगाच्या पाठीवर दुसरीकडे कुठेंच नाहीं, तो आपल्याला सोडून जाईल तरी कुठें आणि कां म्हणून? अशा विचारांत प्रणयांकुराला

प्रीतिजलानें वाढविणाऱ्या काशीला—त्या प्रेमलतेला—कुमार आतां जाणार असें समजतांच केवढा आघात बसेल याची कल्पना होणें कठीण नाहीं. आणि कुमाराचें हृदय तर भावनामय. त्याला तेंही चित्र दिसूं लागलें. कुमाराची दशा खरोखरच केविलवाणी झाली. आणि कुमार जो कृश झाला होता तो याच दारुण चिंतेनें कृश झाला होता. सदसद्विवेक त्याला आंतून टोंचीत होता. बादशहा त्याला बाहेरून बोलावीत होता. मनाची द्विधा स्थिति झाली. कोणताच पूर्ण निश्चय त्याला करतां येईना. पण कांहींतरी एक निश्चय केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

"गुरुजी!" शेवटीं मनाचा घडा करून गुरूसमोर हात जोडून कुमार म्हणाला.

"कल्याण" गुरुजी आशिर्वादपर उत्तरले.

"या आपल्या नम्र शिष्याला आतां जाण्याला अनुज्ञा असावी." कुमाराचा कंठ भरून आला. पितृवत् प्रेम करणाऱ्या गुरुमाउलीच्या चरणांपासून आपण आतां दूर जाणार याचें त्याला वाईट वाटूं लागलें. आपला पिता मुबारिक व आपली आई यांची त्याला आठवण होऊं लागली. पण त्यांच्याच इतका त्याला आतां गुरुजींचा लळा लागला होता.

त्यानें यापूर्वी एक दोन वार आपला जाण्याचा विचार गुरुजींकडे बोलून दाखविला होता. काशीकडे देखील तसेंच बोलून त्यानें तिच्या मनाची चांचपणी केली होती. म्हणूनच त्याला हें काम फार बिकट वाटत होतें. काशीनें त्याच्या त्या शब्दाला थट्टेहून जास्त महत्त्वच दिलें नव्हतें. दोघांलाही कुमाराच्या या शब्दांत महत्त्व असेल असें वाटलें नव्हतें. त्याच्या तिरसट मनाची ती क्षणिक लहर आहे असें त्यांस वाटलें होतें. पण कुमार तर खरोखरचि जावयाची परवानगी मागत आहे हें पाहून त्यांस नवल वाटलें. कुमार पण जाणार कोठें हेंच त्यांना समजेना.

"कुठें जायचा तुझा विचार आहे कुमार?"

गुरुजींच्या या प्रश्नाला काय उत्तर द्यावयाचें?

कुमाराला पुन्हां पेंच पडला. आग्र्याला अकबर बादशहाकडे जावयाचें हें त्या प्रश्नाला द्यावयाचें खरें उत्तर. पण तें कसें देतां येणार? सोंगाची वतावणी इतकीं वर्षे करून आतां ऐन वेळीं बाजू घसरूं द्यावी कशी? नाहींतरी खोटें बोलावयाचें कसें?

"कां कुमार बोलत कां नाहीं? इथून निघून तूं दुसरीकडे कुठें जाणार आहेस?"

कुमाराला विचारमग्न पाहून गुरुजींनीं पुनः प्रश्न केला.

"जाणार एकांतवासाला." कुमारानें चट्‌कन सुचलें तें उत्तर देऊन टाकलें.

"एकांत वासाला?" गुरुजींनीं आश्चर्यानें विचारलें. त्यांनीं कुमाराच्या चेहऱ्याकडे सूक्ष्मपणें पाहिलें.

"एकांतवासाची तुझी इच्छा आहे व असेल, पण तुझ्याकडून एकांतवास घडणार नाहीं. तूं राजछत्राखालीं राहणारा माणूस दिसतोस. तूं संसारी आहेस. लग्नकार्य करून

संसार थाटणारा पण संसारांत राहून विरक्त असणारा असा तूं तत्वज्ञ संसारी आहेस ! तुला जांवई करण्याचा माझा विचार आहे. म्हातारपणांत ही एक कन्या, माझी काशी, एवढेंच माझें मृत्युलोकींचें अवशिष्ट निबंधन आहे. तें तुझ्या स्वाधीन करून बद्रिकेदारीं जावयाचा माझा संकल्प आहे. आणि तुम्हां दोघांच्या परिचयावरून तुमचे स्वभाव एकमेकांस मानवले असावेत असें माझें अनुमान आहे. ''

गुरुजी एकसारखे बोलत चालले होते. काशी आंतून ऐकत होती. आपल्या आशेचा मनोऱ्याला कळस चढणें अथवा तो मुळांतूनच उन्मळून पडणें या दोहोंतून एक काय तें आतां होणार म्हणून तिचा जीव आशेच्या बारीक धाग्यावर लोंबकळून राहिला होता. आणि आपण या दिव्यांतून आतां कसें पार पडावें याबद्दलच्या विचारकल्लोळांत कुमार भांबावून गेला होता. वृद्ध गुरुमाउलींच्या तोंडचे हे उद्गार ऐकतांच आपण जें उत्तर देणार त्यांच्या योगानें त्या दोघां पितापुत्रींची हृदयें कशीं शतशः विदीर्ण होतील याची कल्पना येतांच त्याचें स्वतःचेंच हृदय विरघळून गेलें व त्याच्या नेत्रांवाटे अश्रुधारा सुरू झाल्या. पितापुत्रींना त्याच्या अशा मनःस्थितीचें कारण समजण्यासारखें नव्हतें.

'' कां कुमार उत्तर कां देत नाहींस ? बेटा, असा रडकुंडीला कां आलास ? तुझ्या सारख्या पवित्र आचरणाच्या सरस्वतीसेवकाला चुकार मनाच्या अल्लड तरुणासारखा पश्चात्तापदर्शक शोक कां व्हावा ? जाण्याच्या कल्पनेनें डोळ्यांत पाणी येणें स्वाभाविक आहे. तसेलच हे अश्रु आहेत, कीं दुसरें कांहीं आहे ? बोल. रडूं नको, बोल. ''

हे ममतेचे शब्द कुमाराच्या कानीं पडतांच तो आविकच ओक्साबोक्सा तोंड दडवून रडूं लागला. कुटिकेंतून काशीच्या रडण्याचेही हुंदके बाहेर ऐकूं येण्याइतकें मोठ्यानें होऊं लागले. बिचाऱ्या काशीला कांहींच उमज पडेना. पण कांहींतरी वाईट प्रसंग आपल्यावर ओढवणार असली अंतःसंवेदना तिला होऊं लागली होती.

'' जाणार म्हणून निर्धार केला असलास तर तो कां केलास हें माझ्यापासून लपवून कां ठेवतोस ? गुरुपेक्षां श्रेष्ठ विश्रांतिस्थान दुसरें नाहीं हें तुला ठाऊक नाहीं काय ? गुरू-पासून लपवून ठेवण्याइतकें तुझें निघून जाण्याचें कारण वाईट आहे काय ? हें तर संभवतच नाहीं. मग आणखी काय बरें तर तुझ्या रडण्याचें कारण ? '' गुरुजी किंचित् काल विचारमग्न झाले.

'' बाळे ! जरा बाहेर ये. मला एकदमच काय तो निकाल करून टाकूं दे. तूं कुमाराला कांहीं बरें वाईट बोललीस तर नाहीं ना ? तुम्ही दोघांनीं कोणतेंही पापविचार कांहीं अनीतिकर्म केलें नाहीं ना ? ''

'' नाहीं, हो बाबा ! आपल्या चरणाची साक्ष तसलें कांहीं माझ्या हातून घडलेलें नाहीं. '' हुंदक्याचा उमाळा अनावर झालेला दाबण्याचा प्रयत्न करीत काशी म्हणाली.

'' तर मग तूं देखील कां रडतेस ?

" उगीच-हो—उगीच! " असें म्हणून फिरून आंत जातांना तिनें एक कारुण्यपूर्ण नजर कुमाराकडे फेंकली. पण कुमाराला ती अगदींच असह्य झाली. त्याची विचारशक्ति लुप्त झाली. त्याचें हृदय पश्चात्तापदग्ध झालें. सहजासहजीं निघालेले गुरुमुखांतले ते शब्द त्याला मर्मस्थानीं लागले. खरोखरच त्यानें आपल्या गुरुशीं प्रतारणा केली होती.

इतकीं पवित्र, इतकीं साधीं दोन अंतःकरणें आपण फसविलीं या पापाचें प्रायश्चित्त आपण केव्हां तरी घेतलेंच पाहिजे. तें आतांच घेऊन, खरी गोष्ट कबूल करून, उर्वरित आयुष्य हिमाचलाच्या आश्रयानें परमेश्वरचिंतनांत कां घालवूं नये ? असा विचार त्याच्या मनांत आला. त्याला दुसरा तिसरा आणखी कसलाच उपाय सुचेना.

" भगवन् ! "

" कुमार ! "

" भगवन् ! "

" हां. "

" भगवन् ! मी-म्-म्- "

" कां ? असा दचकतोस कां ? "

" मी-मी-आप "

" हां, बोल-स्पष्ट बोल. तुझ्या मनांत पापी विचार, वाईट विचार लपून राहणें शक्य नाहीं. मग तूं घाबरतोस कां ? मन ज्याचें शुद्ध आहे, त्याला काळिकाळाचाहि डर बाळगावयास नको. स्पष्ट बोल. "

" मी शुद्ध नाहीं. माझें मन शुद्ध नाहीं—"

" कसें ? " आश्चर्यानें गुरुजींनीं विचारलें. पण त्यांच्या त्या आश्चर्योद्गारानें कुमार अधिकच घाबरला. हिंदु पुराणांतील कथा देखील त्याला ठाऊक झाल्या होत्या. हिमाल्यांतील तापसी पुरुषांचें दिव्य तपः सामर्थ्य चक्षुर्वैसत्यं पाहण्याचा योग त्याला आला होता. तपस्वी पुरुषांना अन्यायाची चीड कशी येते, ते कोपाविष्ट कसे होतात व तात्काळ शाप कसे देतात, हेंही त्याला ठाऊक नव्हतें असें नाहीं. आपल्याला आतां काय प्रायश्चित्त भोगावें लागणार हें त्याला समजेना. पण मनाच्या विवेकांच्या डिंवचणींत आयुष्य कंठण्यापेक्षां असत्याचें परिमार्जन करण्याकरितां तापसाच्या शापानें दग्ध झालेलें बरें असेंच त्याला वाटलें.

" **काशी** ! " किंचित चढ्या आवाजांत गुरुजींनीं हांक मारली. उत्तरादाखल एक हुंदका त्यांच्या कानीं आला.

" तूं तरी शुद्ध आहेस कां ? "

" बाबा ! मी शुद्ध आहें आणि कुमारदेखील शुद्ध आहेत. "

" खुळे ! या मर्त्य लोकांच्या पापी जगांत स्वतःच्या मनाची स्वतःला-ज्याची

त्यालाच खात्री देतां येत नाहीं. आणि तूं लोकांच्या मनाची खात्री द्यावयाला तयार होतेस अं-? "

या शब्दांतील मार्मिक खोंच कुमाराला लागू पडत होती. कुमारानें हें ताडलें. त्याला त्या शब्दांनीं मरणप्राय दुःख झालें. दोन्हीं हातांनीं आपलें तोंड त्यानें झांकून घेतलें होतें.

" भगवन् ! मला शब्दांनीं टोंचूं नका. माझ्या चुकीबद्दल, मी आपली प्रतारणा केली आहे तिच्याबद्दल, आपण द्याल तें प्रायश्चित्त भोगावयास मी तयार आहे—"

गुरुजी फारच बुचकळ्यांत पडले. **काशीला** अर्धवट मूर्च्छनाच येऊं लागली होती. कुमार काय बोलत आहे व तो आतां पुढें काय सांगणार आहे हें तिला मुळींच कळेना व यापुढें आपलें श्रवणेंद्रियच लुप्त होईल तर बरें असेंहि तिला वाटूं लागलें. पण जागेवरून तिचे पायच हलेनात.

" पण, कुमार तूं केलेंस काय तें कां अद्याप मला सांगत नाहींस? आणि हा असा आज काय खेळ मांडला आहेस? मी समजूं तरी काय? तुला माझी काशी त्याज्य कां वाटली याचें कारण सांगितल्याशिवाय तुमच्या दोघांच्या आचरणाविषयीं माझें मन शांत होणार नाहीं. "

कुमाराच्या हृदयावर हा दारुण आघात झाला !

गुरुजींचा आवाज आस्ते आस्ते चढूं लागला. त्यांचे डोळे थोडे थोड आरक्त होऊं लागले. त्यांच्या गळ्यांतील रुद्राक्षमाला कंपित होऊं लागल्या. आणि या दोघांचे पाय, पायच कां सर्वांग, लटलटां कांपूं लागलें.

" महाराज ! मी आपणाला फसविलें आहे—"

" होय-पण काय तो मजकूर सगळा एकदम सांगून टांक ना ? " गुरुजी रागावून म्हणाले, " काय तो सोक्ष मोक्ष एकदाचा करून टाक. असा छळवाद करूं नकोस."

" भगवन् ! माझ्या तोंडातून शब्द निघत नाहीं. माझा अपराध फारच मोठा आहे-मी—"

" हं ! " गुरुजींचे आतां तर ओंठ देखील कांपूं लागले.

" मी मुसलमान आहें. "

" काय, तूं मुसलमान आहेस ? " क्रोधायमान झालेले गुरुजी मोठ्यानें गर्जून म्हणाले. पाय गळून पडलेल्या शरीराचा धाड्कन् आवाज पर्णकुटिकेंतून आला.

" तूं मुसलमान आहेस हें सांगण्याची बुद्धि तुला आज झाली आणि याच्यापूर्वी तुला तोंडच नव्हतें का बोलायला ? " डोळ्यांतून ठिणग्या पडतात कीं काय असें भासण्याइतके त्यांचे नेत्र आरक्त झाले होते. गुरुजी आतां आपणाला भयंकर शिक्षा करणार हें कुमार समजून चुकला.

" बोल-कुमार ! कुमार नव्हे कोण-असशील, तो बोल-तुझें नांव काय ? "

" फैझी. "

" फैझी ?—मुसलमान ? वेदपाठ शिकून तयार झाल्यावर जातांना आतां तूं हें सांगतोस ? प्रत्यक्ष आपल्या गुरुशीं प्रतारणा ? आणि ती इतके दिवस ? पोटच्या पोरा प्रमाणें जवळ घेऊन विद्या शिकविणाऱ्या गुरुशीं फसवणूक ! धिःकार ! धिःकार तुला आणि तुझ्या त्या विद्यासंपादनाला—"

पुढें त्यांच्यानेंही बोलवेना. त्यांचा क्रोध संताप पाहण्याला धजेल कोण? शाप देऊन टाकावा असें त्यांना वाटलें.

" कुमार—नव्हे फैझी—छे ! नको तें नांव— शठा ! " गुरुजी मोठ्यानें गर्जना करून म्हणाले.

" भगवन् ! क्षमा करा. मी आपल्यासमोर क्षणभरही राहणार नाहीं. क्षमा केली असें म्हणा आणि मग वाटेल तें करा मी शरण आहें. "

" शठा ! तूं स्वबुद्धीनें हें कृत्य केलें नाहींस-खात्रीनेंच नाहींस. सांग-तुला कोणी प्रवृत्त केलें या कार्याला ? "

" सांगतों-भगवन् ! सर्व सांगतों. "

" अथवा नको ! तुला योग्य प्रायश्चित्तच देतों. " असें म्हणून क्रोधाविष्ट झालेले गुरुजी वर उठले; तोंच त्यांच्या पायांला विळखा पडला.

" पोरी सोड मला. " मुलीला लोटून गुरुजी म्हणाले.

" अगोदर मला मारा—बाबा ! अगोदर माझा शेवट करा. त्यांना नको. " बापाच्या डोळ्याकडे नजर लावून काकुळतीनें काशी म्हणाली. फैझीचा चेहरा लज्जेनें आरक्त झाला. कसाबालाही लाजविणारी आपली कृति होती असें त्याला वाटूं लागलें.

कन्येच्या चेहऱ्याकडे पाहतांच गुरुजींचा क्रोध थोडथोडा कमी होऊं लागला.

" सोड—सोड मला, " गुरुजी म्हणाले " काय करूं हें मला समजत नाहीं. तुला तो वांचला पाहिजे-आणि-आणि ठीक—" ते इकडे तिकडे पहात असतां याज्ञिकीचीं उपकरणें तासण्याचें शस्त्र होतें त्याच्यावर त्यांची नजर गेली. धांवत जाऊन त्यांनीं तें हातांत घेतलें. पण हें त्यांनीं इतक्या जलदीनें केलें कीं तें त्या दोघांच्याही लक्षांत आलें नाहीं. त्यांनीं तें शस्त्र तात्काळ आपल्याच पोटांत खुपसलें !

# प्रकरण एकोणतिसावें.

## कारभारीसाहेबाच्या दिवाणखान्यांत.

त्यांनीं तें शस्त्र पोटांत खुपसलें पण तें आंत रिघण्यापूर्वींच फैझीनें झट्‌कन्‌ धांवून त्याचा हात ओढून धरला व काशीनें त्यांच्या कंबरेला मिठी घातली.

गुरुजी स्तंभितच झाले. आपल्या अविचाराचें त्यानांच नवल वाटलें व विषादही झाला. तथापि त्यांना दुसरा इलाज कांहीं सुचेना. फैझीनें त्यांचा हात अझूनही सोडला नव्हता.

" माझा हात कां धरला आहेस ? "

" आपण असें करूं नये. "

" मी असें करूं नये; म्हणतोस ! "

" नये. "

" मग मी तुला सांगतों तें ऐकावें लागेल. "

" ऐकेन. "

" पण तुझ्या बोलण्यावर आतां विश्वास कसा ठेवावयाचा ? "

" सांगाल ती शपथ घेऊन सांगतों. "

" वचन दे. "

" देतों "

" घे तर शपथ. "

" कोणती शपथ घेऊं भगवन्‌ ! " गुरुजींचा हात सोडीत फैझी म्हणाला.

" माझ्याकडून शिकून घेतलेली वेदविद्या दुसऱ्यास देणार नाहीं अथवा ती दुसऱ्याला मिळेल असें कोणतेंही कृत्य अथवा साधन निर्माण करणार नाहीं. ती तुझ्याकडेच राहील. अशी शपथ घे. "

झालें, आजपर्यंतची तपश्चर्या व्यर्थ जाण्याची वेळ आली. ज्या कार्याकरितां अकबरानें आपणाला पाठविला तें हातीं येऊन दूर गेलें. घात झाला. शपथ घेण्याचें कबूल केलें. आतां ही अट पाळणें भाग होतें. आणि ही अट पाळणें म्हणजेच अकबर बादशहाच्या कार्याचा नाश होता. या विचारांत फैझी पडला आहे तोंच गुरुजींनीं फिरून विचारलें.—

" कां आतां आणखी कोणती पळवाट काढण्याची दगलबाजी करतो आहेस ? "

" नाहीं. भगवन्‌ ! मी शपथ घ्यावयास कबूल आहें "

" घे तर, मग वेळ कां ? "

**फैझीनें** तशी शपथ घेतली. आणि आपल्या गुरुजींना व गुरुकन्येला शेवटचा प्रणाम करून तो तिथून विद्युत्वेगानें निघून गेला. तीं दोघेंही पितापुत्र त्याच्याकडे चित्रा-

सारखीं टकमक पहात होतीं. त्यांच्या डोळ्यादेखत, परंतु डोळ्यांचें पातें लवतें न लवतें इतक्या वेळांत तो निघून गेला. आणि निघून गेला तो गेलाच. कायमचा त्याचा पत्ता कोणालाही लागला नाहीं.

इकडे दिल्लींत सूतिकागृहांत कोणत्याही धर्मांत जन्मलेलें मूल पूर्वी कोणत्याही प्रकारचा वाक्संस्कार नसतां कोणती भाषा बोलतें हें पाहण्याकरितां जो प्रयोग चालविला होता. त्याची मुदत भरली. ही मुदत दुसऱ्या खेपेची होती. पहिल्या खेपेस मुलें तीन वर्षांची होतांच एकदा त्यांना बोलविण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण एकही मूल कोणताच शब्द बोललें नाहीं. म्हणून त्यांना फिरून पूर्ववत् पूर्वस्थळींच ठेविलीं व आतां आणखी दोन वर्षांनीं म्हणजे फिरून पांच वर्षांनीं दरबारांत आणावयाचीं होतीं.

धर्मसभेचे इतर विषय झाल्यावर ह्या मुलांना समोर आणण्यांत आलें. पांच वर्षांचीं मुलें आपल्या वयाप्रमाणें इतर सर्व व्यवहार करीत होतीं. त्यांना त्यांच्या वयोमानाप्रमाणें बुद्धिही आली होती तथापि बोलण्याची शक्ति मात्र मुळींच नव्हती. मानुषी वाणी त्यांच्या कानांतच मुळीं पडली नव्हती. त्यांचे सर्व व्यवहार खुणांनीं होत असत त्यामुळें कितीही प्रयत्न केले तरी त्यांना एकही वर्ण उच्चारतां येईना, अथवा उच्चारलेलाही समजेना. खुणा मात्र उत्तम समजत. एकंदरींत या प्रयोगामुळें इतकीं चालतीं बोलतीं माणसें मात्र मुकीं बनलीं ! दुर्दैव विचाऱ्यांचें ! अकबराची निराशा झाली. पहिली भाषा कोणती ? या प्रश्नाला उत्तर या प्रयोगानें मिळावयाचें होतें तें मिळालें नाहीं. अर्थात् तो प्रश्न तसाच अनिर्णीतच राहिला.

या सभेंत जे नवीन ग्रंथ संस्कृत व इंग्लिश वगैरे भाषांतून फारशींत आले होते, त्यांचें प्रदर्शन झालें. या शिवाय नेहमींच्या आठवड्याच्या सभांहून या सभेंत मोठी अशी कोणती गोष्ट कांहीं घडली नाहीं.

बादशहाचें मन आतांशा अधिकाधिक व्यग्र होऊं लागलें होतें. आपल्या शयनमंदिरांत गेल्यावर त्याला सेलीम वाट पाहात असलेला दिसला. आपणच त्याला यावेळीं येथें बोलवून आणविला याचें त्याला आतां स्मरण झालें.

" सेलीम मी तुला आज या ठिकाणीं एका बाजूस मुद्दामच बोलावला आहे. "

शहाजादा स्तब्धच होता. आपले आज कान उपटले जाणार अशा अंदाजानें तो आरंभापासूनच घुश्शांत होता त्याचें मेहरुन्निसा ऊर्फ भावी नूरजहान हिच्याशीं फारच संघट्टण होऊं लागलें होतें; पण तें बादशहास प्रिय नव्हतें. शिवाय ख्यालीखुशाली चैनबाजकडे त्याच्या मनाचा होणारा वाढता कल बादशाहाच्या नजरेस येऊं लागला होता. त्याच्याभोंवतीं आस्ते आस्ते हलके लोक जमूं लागणार असें चिन्ह दिसूं लागलें होतें. यावेळीं आपण दोन मात्रेचें वळसे दिले नाहींत तर सेलीम अधिकच बहकत जाईल असा तर्क बादशाहानें केला होता.

" सेलीम, राज्यकारभाराच्या गोष्टींत तूं आतां मन घालूं लागणार कीं नाहीं ?"

" होय–तर ? " उपरोधिक स्वरानें सेलीम म्हणाला.

" मग असल्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून ज्यांत लक्ष घालूं नये त्यांत तूं कां लक्ष घालतोस ? "

" अशा कोणत्या गोष्टी ? "रागानेंच त्यानें विचारलें.

" त्या हसनसारख्या क्षुल्लक शिपायांशीं तुझी दोस्ती कां एवढी ?"

" तो फार इमानी माणूस दिसतो."

" त्याचें इमान तूं कसें पारखलेंस ? "

सेलीम निरुत्तर झाला. मेहेरुन्निसाच्या बापानें शहाजाद्याकडे त्याची वर्णी लावलेली होती. मेहेरुन्निसाची फुलती कळी या तारुण्यावस्थेंत प्रवेश करणाऱ्या युवकाला भूल घालीत होती. हसन मेहेरुन्निसाचा आवडता नोकर होता. मग तो सेलीमचा आवडता झाल्याशिवाय कसा राहील? पण बापाच्या प्रश्नांतली खोंच मुलाच्या ध्यानांत लगेच आली. अगदीं नाजूक विषयाला उद्देशून तो प्रश्न होता. त्यामुळें शहाजाद्याला वाईट वाटलें.

" सेलीम, आतां तुला आपल्या शिरावरची जबाबदारी समजूं लागली पाहिजे. राज्यकारभाराकडे विशेष बारकाईनें तूं लक्ष घातलें पाहिजेस. शिवाय तुझ्या लग्नाबद्दलचेही विचार माझ्या व तुझ्या आईच्या मनांत येऊं लागले आहेत. तेव्हां या सर्व बाबींचा पुरता विचार करून तूं आपल्या वर्तनाची दिशा बदल."

बादशहा इतकें बोलून सेलीमकडे पाहूं लागला. आपल्या बोलण्याचा परिणाम शहाजाद्याच्या अंतःकरणावर कितपत झाला आहे, हें त्याला अजमावून पहावयाचें होतें. सेलीम अधोमुख होऊन उभा होता. पण त्याच्या स्वाभिमानाला जखम झाली होती. आपल्या प्रणयलीलांच्या आड बापानें कां यावें ? हें त्याला समजेना. अकबराचा जनानखाना सेलीमच्या नजरेसमोर होता. आपण काय वाईट व अयोग्य करतों हें त्याला उमजेना. त्याच्या मनांत दुराग्रहानें पेट घेतला. तो पाऊल न वाजवितां निमूटपणें चालता झाला. तो आपल्या शयनमंदिराकडे जाणार होता. भडकलेलें मस्तक शांत करण्याकरितां तो बगीच्यांतून मंद पावलांनीं चालूं लागला. बराच दूर गेल्यावर आपल्याला खूण करून कोणी बोलावीत आहे असें त्याला वाटलें. म्हणून तो पुढें गेला. परंतु बोलवणारी व्यक्ति अद्याप बरीच दूर आहे असें त्याला दिसलें. तो आणखी पुढें गेला तरी त्याला तें अंतर तितकेंच असल्याचें दिसून फारच नवल वाटलें. अशाप्रकारें ती खूण करणारी व्यक्ति पाठीमागें मागें सरकत होती ? शहाजादा पुढें पुढें सरकत होता. शेवटीं ती मागें सरकणारी व्यक्ति स्थिर झाली व तिनें त्याच्या कानांत कांहीं सांगितलें.

त्या दोघांची कुजबुज बराच वेळ चालली होती.शेवटीं शहाजादा त्या माणसाच्या मागून दोरी लावलेल्या गुराप्रमाणें चालूं लागला. इतक्यांत एक शिपाई पहारेकरी त्यांना

दिसला, पण तो पहारेकरी त्यांच्या मागोमाग चालूं लागला. तेव्हां या दोघांना संशय आला. ते दोघे पुढें आणि शिपाई मागें ! शेवटीं त्या दोघांना मध्येंच थांबणें भाग पडलें.

" कोणरे तूं ? " शहाजाद्यानें विचारलें.

" मालिकचा बंदा नोकर " जमिनीपर्यंत लवून शिपायानें उत्तर केलें.

" आमच्या मागून कशाला येतो आहेस ? "

" आपल्या रक्षणासाठीं. "

" म्हणजे ? मला कांहीं कोणी मारायला टपला आहे कीं काय ? "

" वेळ प्रसंग सांगून येत नाहीं; मालिक ! "

" पण आज आणि आतांच कसा तूं माझ्या रक्षणासाठीं निर्माण झालास ? आजवर कधीं नाहीं आलास तो मागून ?"

आजवर शहाजाद्यांना रात्रीं एकटेच फिरण्याची अवश्यकता वाटत नव्हती. "

शहाजाद्याच्या स्वतंत्र वृत्तीवर व स्वाभिमानावर हा दुसरा वार झाला. या विशिष्ट खोंचीच्या उत्तरानें शहाजादा मनांत उमगला.

" मी बादशहाच्या नजरकैदेंत आहे असें समजूं काय ? " त्यानें रागानेंच विचारलें.

" नजरकैद आणखी निराळी कशी असावयाची ? " **शहाजाद्याच्या** बरोबरच्या माणसानें हटकलें.

" बस्स. जा, चल, मागें परत. माझ्या रक्षणासाठीं तुझी मला गरज नाहीं. चालता हो. फीर मागें. "

" नाहीं, खाविंद, मला मागें फिरतां यावयाचें नाहीं. "

" वा ! माझ्यामागून फिरावयाचा तुला कोणी हुकूम केला आहे काय ? "

" पण इतकें कशाला, खाविंद, आपण माझ्याबरोबर येऊंच नका. आपण मागेंच परतून जा ना ? " **सेलीमच्या** बरोबरच्या माणसानें म्हटलें. पण त्यामुळें उलटाच परिणाम झाला. त्याबरोबरच्या माणसास तरी तसाच परिणाम झालेला हवा होता. सेलीम हट्टास पेटून क्रोधानें म्हणाला.

" जाव. मागें फिरतोस कीं नाहीं ? "

" नाहीं. "

" नाहीं, फिरत ? तर मग हा मी स्वतःचा शिरच्छेद करून घेतों. " इतकें म्हणून **सेलीमनें** आपली तरवार उपसली. पण त्याचा तो हात दोघांनीं दाबून धरलेला होता. एक त्याच्याबरोबरचा माणूस होता व दुसरा तो शिपाई होता.

" हुजूर ! इतका प्रसंग यायला नको. हा मी मागें चाललों. " असें म्हणून तो शिपाई चालता झाला.

" पण थांब ! तुला माझ्यामागें कोणी पाठविला होता—? " **सेलीमनें** दरडावून विचारलें.

" शहान्शहानीं."

" असं ! "

" मी सांगितलेली गोष्ट आतां तरी पटली ना? " बरोबरच्या माणसानें विचारलें.

तो शिपाई निघून गेल्यावर सेलीमनें बरोबरच्या माणसास विचारलें.

" हसन, तूं मला घेऊन कुठें चालला आहेस ? "

" कां ? आतां माझी संगत आपण सोडणार ना ? "

हा प्रश्न ऐकतांच **सेलीम** चरकला. बापानें केलेली आपली कानउघाडणी चालली असतां त्यांतील थोडासा तरी भाग याच्या कानावर आला हें चांगलें झालें नाहीं असें त्याच्या अभिमानी मनास वाटलें. आणि म्हणून त्याच अभिमानाच्या इर्षेंत तो चट्कन बोलून गेला.

" **हसन** हा, **शहाजादा** तुला सांगतो आहे, ध्यानांत ठेव. मी तुला दूर करणार नाहीं. मी तुला अंतर देणार नाहीं. माझ्या राज्यांत तूं निर्भय राहशील. तोंपर्यंतचे दिवस असेच काढ. "

**हसनला** हें आश्वासन ऐकून ब्रम्हानंद झाला. **सेलीमचें** वचन खोटें होणार नाहीं अशी त्याला खात्री होती. आणि प्रिय वाचक ! सेलीमनें आपलें वचन पाळलें व **हसननें** आपला सूडही उगवला. म्हणजे त्यानें पुढेंपुढें सेलिमच्या जिवावर शिरजोर होऊन कदाचित् त्याच्याच चिथावणीनें अबुल फाजलचा खूनही केला. पण तें कथानक आपल्या या कथानकांत यावयाचें नसल्यामुळें येथेंच सांगून टाकावें लागलें. **फाजलच्या** खुनामुळें **अकबरशहाच्या** अंतःकरणास जबरदस्त धक्का बसला. पण त्या खुनाचें मूळ रहस्य आणि बीज या कारस्थानांतील दुफळीच्या मूळांत होतें, हें पुष्कळांस ठाऊक नाहीं. दैववशात् फैझी मात्र त्याच्याहातून वांचला. त्यानें फैझीचा मोबदला फाजलवर काढला.

बोलत बोलत ते दोघे कारभारीसाहेबांच्या वाड्याच्या दारांत आले. दरवाजावरच्या माणसानें म्हटलें—

" चला सर्व मंडळी आपलीच वाट पहात तिष्ठत आहेत. "

ते दोघेही दादर चढून एकदम वरच्या माडीवरील शृंगारलेल्या दिवाणखान्यांत गेले. हसन आदबीनें बाहेरच उभा राहिला. सेलीमनें दिवाणखान्यांत पाऊल टाकतांच तेथें जमलेल्या साऱ्या मंडळीनें उठून खडी ताजीम दिली व शहाजाद्याला कुर्निसात केला. पण सेलीमची नजर दुसरीकडेच आकर्षिली गेली होती. पडद्याआडून नवयौवनवती एक सुकुमार सुंदर बालिका **शहाजाद्याकडे** पहात होती. **सेलीमच्या** नजरेला नजर मिळतांच तिनें पुन्हा आपलें मुखकमल पडद्याच्या आड घेतलें.

**मेहेरुन्निसा** आतां गोषा घेऊं लागली असावी ही कल्पना शाहाजाद्याला आली. आतां तिचें दर्शन आपणाला दुर्लभ होणार हेंही त्याला समजून चुकलें. आतां या गोषांतल्या सुंदर तरुणीला असें कारभारीसाहेबांच्या घरीं पाहुणचाराला येऊन चोरून भेटल्याशिवाय दुसरा उपायच नव्हता. आणि तसें करणें दर्जाला शोभणारें नव्हतें, तसेंच अकबरशहाला पसंत पडणारें नव्हतें. हे सारे विचार मनांत येऊन शहाजादा विषण्ण अंतःकरणानें त्या दिवाणखान्यांतील उच्चासनावर बसला.

# प्रकरण तिसावें.

## खान-खानन साहेब जखमी !

कारभारीसाहेबांच्या दिवाणखान्यांत त्या रात्रीं खूप खलबतें झालीं. **फाझल व फैझी** आणि त्यांचा बाप शेख मुबारिक यांच्याविरुद्ध पुढें कसकसे डाव रचावयाचे त्यांचीहि आंखणी झाली. जनानखान्यांतून सहाय्य मिळावयाची कशी तजवीज करावी व मामानागाला कशी वश करावी याचाहि खल झाला. आपल्या मुलाला निदान **शहाजाद्याकडे** तरी मोठी असामी मिळेल अशी आशा उत्पन्न होतांच त्या वृद्ध बाईच्या तोंडास पाणी सुटून ती ही कधींमधीं यां कारस्थानाच्या गोष्टींत लक्ष घालूं लागली. तथापि **अकबरवरचें** तिचें अपत्यप्रेम मात्र कमी झालें नव्हतें. **सेलीमला** खुष करण्याचे प्रयत्नही मंडळी अगदीं अटोकाट करीत होती; व सेलीमही हळूहळू बापाला जुमानीनासा होऊं लागल्याचें चिन्ह दिसूं लागत होतें. ठराविक कार्यक्रम पार पडल्यावर **शहाजादा** उठून गेला. तो गेल्यावर पुन्हा उरलेल्या मंडळींचीं खास खलबतें सुरू झालीं. मंडळी नेहमींचीच होती व विषय देखील नेहमींचेच होते.

" या चार दिवसानंतर बादशहाचा वाढदिवस येत आहे. नेहमींप्रमाणें मोठ्या प्रमाणावर तयारी चाललेली आहे. तर या वेळेला आपल्या काबुली पठाणाला मेहेर-नजर बादशहाकडून करवून घ्यावयाची असा माझा इरादा आहे. " अदमखानानें सांगितलें.

" वाहवा ! वाहवा ! छान युक्ती; " असें म्हणून सर्वांनीं **अदमखानाची** पाठ थोपटली. सर्वांस निरतिशय आनंद झाला. कारण जन्मदिवसाच्या प्रसंगीं **अकबरशहा** कैद्यांस जीवदान देत असे व सोडूनहि देत असे. तो प्रसंग आयताच चालून आला होता. अशाप्रसंगीं हें आपलें कारस्थान साधण्याची युक्ति आदमखानासारख्या साध्या गृहस्थाच्या डोक्यांतून निघाल्यावर ह्याच्या मुत्सद्दीपणाचें कौतुक मोठमोठ्या मुत्स-द्यांसहि वाटल्याशिवाय कसें राहील !

**अकबरशहाचा** वाढदिवससमारंभ मोठ्या थाटानें होत असे. त्या थाटमाटाचें आणि त्या वेळच्या दरबारचें समग्र वर्णन देणें या स्थळीं पाल्हाळाचें होणार आहे. हा समारंभ फारच खर्चाचा व दौलतीच्या प्रदर्शनाचा होत असे. या दिवशींचा मोठा विधी म्हणचे बादशहाचा तुळाभार हा होय. तिसऱ्या प्रहरीं बादशहाचा तुळाभार होत असे. एक मोठा प्रचंड तराजू सोन्याचा केलेला असे. एका सोन्याच्या पारड्यांत बादशहानें बसावयाचें व दुसऱ्या पारड्यांत बादशहाच्या वजनाइतकें सोनें घालावयाचें व त्याचें दान करावयाचें आणि गरीबांस वांटून द्यावयाचें असा बादशहाचा वार्षिक प्रघात असे. हा बादशहाचा तुळाभार वर्षांतून दोनदां होत असे. एकदां

वाढदिवसाच्या वेळीं आणि दुसऱ्यांदा रजब महिन्यांत. पण पहिल्या दिवसाच्या म्हणजे वाढदिवसाच्या वेळचें महत्व मोठें असें. वाढदिवसाच्या वेळचा तुळाभार बारा वेळ होत असे; आणि रजब महिन्यांतला आठ वेळ होत असे. वाढदिवसाचा वेळचा तुळभार सोनें, चांदी, पारा, रेशीम, अत्तरें, सुगंधी तैलें, औषधें, लोखंड, तूप, तांदूळ, मीठ, व अष्टधान्यें या वस्तूशीं निरनिराळा बारा वेळ होत असे. याशिवाय शेळ्या, बकरे, व पशु-पक्षीही दान देण्यांत येत असत. यांची संख्या बादशहाच्यां वयाच्या वर्षांइतकी असे. याच दिवशीं पिंजऱ्यांत बाळगलेले पक्षीही मोकळे सोडून देण्यांत येत असत, आणि याच दिवशीं कैदीही सोडून देण्यांत असत.

अर्थात् सुसंधि साधण्याचें अदमखानास सुचलें कसें याचें बाकीच्या मुत्सद्यांस मोठें नवल वाटलें. त्यांनीं आदमखानास शाबासकी दिली. त्यानंतर गंभीर मुद्रा धारण करून बदाउनीनें एक गोष्ट आपल्या मित्रांस सांगण्यास प्रारंभ केला.

“ यार हो, ” बदाउनी म्हणाला “ आज तुम्हाला एक मला समजलेली महत्वाची गोष्ट सांगायची आहे. माझ्या हेरांकडून मला असें समजलें आहे कीं काशींतील पंडिताच्या घरून फरारी झालेला **फैझी** एका गुहेंत ध्यानमग्न होऊन बसलेला आहे. तो बादशहाकडे यायला भीत आहे.”

“ रास्तच आहे. बादशहाची कामगिरी त्याच्याहातून यथासांग निभली नाहीं, तर त्याला आतां या बाजूस यायलाच नको, “ शिरहिंदी म्हणाले.

“ आतां बादशहाचा कोप त्याच्यावर झाल्याशिवाय राहणार नाहीं.” आदम-खान म्हणाला.

“ तसेंच मात्र नक्की कांहीं म्हणतां येणार नाहीं. बादशहाच्या कृतीचा कोणाला थांग लावतां येईल असें मला तरी वाटत नाहीं. कोणी म्हणतात, बादशहाला पाहिजे ती वेदविद्या या पठ्यानें न पटकावितां त्या पंडिताच्या छोकरीशीं हा फैझी प्रेमविलास करीत बसला.” कारभारीसाहेब म्हणाले.

“ मलाही कळली ती बातमी तशीच आहे. ” बदाउनी म्हणाला “ तो **फैझी** त्या पंडिताच्या छोकरीशीं प्रेमरंग करीत बसला आणि वेदविद्येच्या अध्ययनाकडे त्यानें दुर्लक्ष केलें. आणि शेवटीं बादशहा आपणाला आतां शिक्षा करील या भीतीनें मोठ्या साळसूदपणानें फकीरी घेऊन बसला आहे. बाकी, यांत झालें हें सर्वतोपरी ठीकच झालें असें मला वाटतें” आपलें बोलणें इतरानां कितपत मानवतें हें पहाण्याकरितां त्यानें सर्वांच्याकडे नजर फेंकली. सर्वजण आतां तो काय बोलतो हें ऐकण्यासच फार उत्सुक झाले होते.

“ कसें तें पहाः—” तो पुढें म्हणाला “ **फैझी** वेदविद्येला मुकला हें आपल्या प्रयत्नांच्या दृष्टीनें फारच चांगलें झालें. कारण आतां बादशहाची मर्जी संपादून आमच्या डोकीवर तो चढेल असें मानण्याची भीति राहिलेली नाहीं. आतां तो त्या पंडिताच्या पोरीशीं प्रेमचेष्टा करूं लागला असेल, तर त्यांत तरी वावगें काय झालें?

असें घडलेंच पाहिजे होतें. खुद्द बादशहानें जर रजपुतांच्या पोरींशीं विवाह लावले आहेत तर फैझीनें एका हिंदूच्या पोरीशीं प्रेमलीला केल्या तर त्यांत काय बिघडलें ? उलट मी तर म्हणतों कीं तें छानच झालें. "

" पण तो इकडे कधींच न आला तर अधिक बरें नाहीं कां ? " आदमखान म्हणाला.

" आतां तो इकडे कशाला येईल ? त्याची येण्याची छातीच नाहीं व्हायची " शिरहिंदी म्हणाले.

" तो नेम कोणी सांगावा ? बादशहा त्याला बोलावून देखील आणील. " कारभारीसाहेब म्हणाले.

" होय, तेंही खरेंच. बादशहाची त्याच्यावर मोठीच मर्जी आहे. कदाचित् त्याला बोलावून राजधानींत आणणेंही कांहीं अशक्य नाहीं." बदाउनी कपाळावरून हात फिरवीत म्हणाला.

" मी त्यासाठीं एक इलाज करून पहायचा ठरवून एक मनुष्यही फैझीच्या तलासावर पाठविला आहे. त्यानें इकडे येऊं नये अशीच तजवीज तो माणूस करील अशा तऱ्हेनें पढवून मी त्याला पाठविला आहे. काय घडतें तें लवकरच आपणाला समजेल. " कारभारी साहेब म्हणाले.

" काय–काय इलाज तो ? " बदाउनीसाहेब फार उत्सुकतेनें म्हणाले. त्यांच्या जड चेहऱ्यावर किंचित् तजेला चढला.

" काय तो मी एव्हांशींच सांगत नाहीं. पण फैझीनें दिल्ली आग्रा याबाजूस पुन्हां येऊं नये असा प्रयत्न मी चालविला आहे. इतकेंच सध्यां सांगतों. परंतु आपल्या काबुली पठाणाला अकबर बादशहाकडून क्षमा कशी मिळेल याची कांहीं तजवीज तुम्हांला करतां येणें शक्य आहे काय ? "

" कां शक्य होऊं नये ? " शिरहिंदींनीं विचारलें.

" कसें शक्य होईल ? " कारभारीसाहेबांनीं प्रश्न केला.

" हो, कसें शक्य होईल ? " बदाउनी म्हणाले.

" कां शक्य होऊं नये ? " शिरहिंदी म्हणाले, " तुम्हांला ती बादशहाच्या दयाळू स्वभावावर प्रकाश पाडणारी गोष्ट ठाऊक नाहीं काय?—"

" कोणती–कोणती ? " दोघांनींही उतावीळपणानेंच विचारलें.

" कोणती ? इतके मुत्सद्दी म्हणवितां, आणि बादशहाच्या स्वभावांतलि महत्वाच्या गोष्टी तुम्हाला ठाऊक असूं नयेत, म्हणजे काय ? " शिरहिंदी पुढें बोलले— " बहिरामखानच्या अमदानींत हेमूबरोबर झालेल्या लढाईंत हेमू पराभूत होऊन पडला; हें तुम्हांला ठाऊक नाहीं काय ? "

" आहे. ठाऊक नाहीं असें कसें होईल ? " बदाउनी म्हणाले.

" त्यावेळीं बहिरामखाननें शहाला काय सांगितलें ? "

" काय-सांगितलें-बरें ? " बदाउनी विचार करूं लागले. आणि कांहीं तरी अचानक आठवल्यासारखें करून एकदम म्हणाले. " हं. आलें ध्यानांत. "

" काय आलें ध्यानांत ? सांगा. "

" पण आतां मी समजलोंच सगळें. तुमचें धोरण बरोबर आहे. "

" होय ना ? "

" होय. अगदीं बरोबर. "

त्या दोघांना काय ती गोम समजली. पण आमचे कारभारीसाहेब त्या दोघांच्या तोंडाकडे आळीपाळीनें चकित होऊन पाहातच राहिले. कारण त्यांच्या आपसांतील बोलण्याचा त्यांना कांहींच अर्थबोध होईना.

" पण मी नाहीं समजलों काय तें ? " ते शेवटीं म्हणाले.

" अहो हिमू रणांगणांत पडल्यावर, त्याचें डोकें छाटून टाकण्याविषयीं बहिरामखाननें **अकबरशहाला** सल्ला दिला होता. पण शाहानें त्यावेळीं अगदीं निराळें वर्तन केलें. "

" आँ ? "

" हो तर. अकबरशाहानें म्यानांतून तरवार काढली. बहिरामखानाला वाटलें आपल्या सांगण्याप्रमाणें शहा आतां शत्रूची गर्दन उडविणार, पण शहानें जें वर्तन केलें त्यामुळें बहिरामखानाला आश्चर्य वाटलें, वाईट वाटलें, आणि अपमान कारकही वाटलें. अकबरशहा त्यावेळीं तरुण मुलगा केवळ पंधरासोळा वर्षांचा होता. राज्यकारभार **बहिरामखानच** पहात होता. तथापि आपली आज्ञा अकबरानें मानली नाहीं याचें त्याला फार वाईट वाटलें. अपमानकारक वाटलें आणि त्याला रागही पण आला. "

" आँ ! पण शहांनीं केलं तरी काय त्यावेळीं ? "

" अहो त्यांनीं तरवार बाहेर काढली, पण तरवार बाहेर काढीत असतांच शहांच्या डोळ्यांतून अश्रुपात सुरू झाला. त्यांचा चेहरा उतरला. त्यांनीं आपल्या तरवारीच्या टोंकानें हिमूच्या मस्तकास फक्त स्पर्श केला आणि तरवार पुन्हां म्यान केली ! आणि मग शहा खालीं मान घालून स्तब्ध राहिले ! रणांगणांत आसन्नमरण पडलेल्या शत्रूला तरवारीनें तोडण्याचें कर्म वीराला शोभण्यासारखें नाहीं असें त्यांचें मत आहे, हें आतां आपणाला कळतेंच आहे. पण तेंच मत त्यांचें त्यावेळीं देखील होतें. "

" मग बहिरामखानांनीं काय केलें ? "

" **बहिराम**खानाला क्रोध आला होता. त्यांनीं स्वतः आपली तरवार उपसली आणि हिमूचे तुकडे तुकडे केले ! "

" आपल्या धर्माप्रमाणें हा अधर्म होत नव्हता. " कारभारीसाहेब म्हणाले.

" पण शहांला तो अधर्म वाटत होता ना ? " **शिरहिंदींनी** म्हटलें. " तेव्हां मला असें वाटतें कीं उद्यां उत्साहाच्या दिवशीं काबुली पठाणांला शरण जावयास सांगून यांना क्षमा करण्याविषयींची वकिली बदाउनीसाहेबांनीं करावी कीं काम फत्ते ! "

" युक्ति आहे खरी ! " कारभारीसाहेब आनंदानें म्हणाले.

" युक्ति आहे खरी, पण मांजराच्या गळ्यांत घांट बांधणारा उंदीर मी होऊं काय ? खाशी युक्ति ! " बदाउनी म्हणाले.

" तुम्ही घांटीला अडकवलेला व गळ्यांत बांधावयाचा दोर फक्त हातांत धरून पुढें व्हा. घांटीला हात आम्ही लावतोंच आहोंत. "

" ठीक, तसें करूं या !–अरे पण ऐका–ऐका हें काय ? "

सर्वजण भयभीत होऊन चोहींकडे पहात ऐकूं लागले व उठून खिडकीपाशीं गेले. काळ्याकुट्ट अंधरात कांहीं दिसत नव्हतें. पण तो जवळच शेजारपास प्रचंड वृक्ष मोडून पडल्याचा मोठा आवाज होता. तो इतका जवळून आला होता कीं, त्यांना आपण ज्या इमारतींत बसलों आहोंत ती इमारतच मोडून जमीनदोस्त होते कीं काय अशी भीति पडली व म्हणूनच त्यांच्या तोंडचें पाणी पळालें होतें. आपण सुरक्षित आहोंत असें पाहून त्यांना थोडासा धीर आला. पण लवकरच पुन्हा ते एकमेकांच्या तोंडाकडे भयचकित मुद्रेनें पाहूं लागले.

" हें काय हो ? "

" मला नीट ऐकूं येत नाहीं या गलबल्यांत. " कारभारीसाहेब म्हणाले. कारण इतक्यांतच कारभारीसाहेबांच्या कुटुंबांतील इतर मंडळी जागी होऊन त्यांची धांदल उडाली होती; व तीं माणसें वरदेखील आलीं असतीं, पण अद्याप परकी पुरुषमंडळीं वरतीं आहेत असें पाहून कोणी वर आलें नाहीं. तथापि नोकरमंडळींची वर ये जा चाल्लीच होती. कारभारीसाहेबांनीं आपल्या एका नोकरास हांक मारून काय प्रकार आहे तो पाहून यावयास सांगितलें. एक दोन नोकर धांवतच तिकडे निघाले.

" ऐका–नीट कान देऊन ऐका. " बदाउनी म्हणाले.

" होय, कसला आवाज हा ? "

" आवाज ? कसला तरी ध्वनि आहे म्हणा ना ? " **शिरहिंदींनीं** कारभारीसाहेबांची चूक सुधारली.

" बरं ध्वनि. पण हा विव्हळण्यासारखा येतो नाहीं का ? "

" होय. कोणी तरी कण्हत आहे. पण ऐका. आतां मोडून पडलेल्या वृक्षापाशींच कोणी तरी कण्हत आहे. "

" होय !. त्या वृक्षापाशींच कोणी तरी कण्हत आहे खास, " व कारभारीसाहेब लक्ष देत विचार करीत म्हणाले, " चला आपण तिथवर जाऊन पाहूं. "

" पण पुढें पाठविलेले नोकर इतक्यांत येतीलच ना फिरून ? ते काय सांगतात तें ऐकून मग जाऊं. " शिरहिंदी म्हणाले.

त्यांचें इतकें संभाषण होत आहे तोंच पुष्कळशा लोकांचा मोठा घोळका मशाली, हिलाली, चंद्रजोती वगैरे घेऊन धांवत असलेला त्यांना दिसला. ते लोक

शहरांतून जिकडेतिकडे सारखे धांवत सुटले होते. त्यांच्या आरडाओरडीनें शहरांतील माणसें गाढ झोपेंतून जागीं होऊन घरोघर भयचकित होऊन घराबाहेर येऊन अर्धवट झोपेंत डोळे पुशीत बघत होतीं. अर्ध्या तासापूर्वी चोहोंकडे सामसूम होतें, तर आतांच चोहोंकडे एकच गडबड उडून राहिली. अकबरशहाच्या राज्यांत आणि बादशहा खुद्द राजधानींत असतांना असला बंडाळीचा प्रकार व्हावा म्हणजे काय? आग्राशहरांत त्या रात्रीं असा धुमाकूळ कसा उडाला?

आमच्या तिघां मुत्सद्यांचें तर्कवितर्क सुरू आहेत तोंच गेलेल्या दोघां नोकरांपैकीं एक परतून येऊन तो आणखी कांहीं जणांस घेऊन गेला. आणि थोडक्याच वेळांत त्यांनीं छबिन्यांतून त्या विव्हळणाऱ्या व्यक्तीस उचलून बंगल्यांत आणले. त्या विव्हळणाऱ्या व्यक्तीकडे आमच्या मुत्सद्दीत्रिकुटाचें लक्ष जाणार तोंच जिकडून तिकडून गलबला सुरू झाला व "अल्लाहो अकबर!" अशी एकच आरोळी उठली. ही आरोळी कारभारीसाहेबांच्या बंगल्याच्या इतकी नजीक आली कीं, या तिघांही मुत्सद्यांना आपण आतां काय करावें याची भ्रांत पडली. कारण या मंडळींत अकबरशहा स्वतः असले पाहिजेत अशी त्यांची खात्री झाली. तेव्हां हें सारें प्रकरण याच बंगल्याकडे येतें कीं काय? आणि तसें असेल तर बदाउनी आणि शिरहिंदी हे कारभारीसाहेबांच्या घरीं एवढ्या रात्रीं कशाला आले अशी शंका धूर्त बादशहाच्या मनांत आल्याशिवाय कशी राहील?

"शहान्शहा अकबरबादशहाकी जय" अशा अर्थाच्या आरोळ्यावर आरोळ्या उठत होत्या. होतां होतां ती गर्दी अगदींच जवळ आली आणि या मुत्सद्दीत्रयीची बरीच गाळण उडाली. एवढ्या अवधींत बरेच मोठमोठे लोक त्यागर्दीत सामील होत होते असें त्यानां आढळून आलें. विशेष लक्षपूर्वक पाहिल्यावर व नोकरांकरवीं मिळेल तसतशी माहिती गोळा केल्यावर त्यानां सारा खरा प्रकार आढळून आला. त्यांनीं नंतर छबिन्यांतून आणलेल्या विव्हळणाऱ्या असामीकडे पाहिलें व ते फारच आश्चर्यचकित झाले. लगेच आश्चर्याचें स्थान करुणेनें घेतलें आणि तेवढयाही गर्दीत त्या बड्या असामीस औषधोपचार करण्याच्या ते तयारीस लागले.

"**मिर्झाखान**! काय ही आपली अवस्था!" **शिरहिंदी** म्हणाले.

"खान–खाननसाहेब! आपल्या बरगडीला बरीच इजा झालेली दिसते आहे. फार दुखतें काय?" बदाउनींनीं विचारलें.

तो बडा असामी कह्रण्याशिवाय कांहींच करूं शकत नव्हता. तथापि विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें हावभावांनीं व खुणांनीं मधूनमधून व्यक्त करीत होता. वरील प्रश्नांवरून त्या बड्या असामीचें नांव आपणाला समजलें आहे, पण त्याचा खरा परिचय अद्याप आपणाला झालेला नाहीं. तो बडा असामी आजूबाजूस पहात होता. त्याच्या आजूबाजूस पहाण्यावरून आमच्या तिघां मुत्सद्यांस संशय आला व तेही आजूबाजूस पाहूं

लागले. आतांपर्यंतच्या धांदलींत एक गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नव्हती आणि ती म्हणजे **आदमखानाचें** गुप्त बहिर्गमन हें होय. आदमखानाची स्वारी त्या बैठकींतून उठून केव्हां गेली याचें त्यांना भानच नव्हतें. **आदमखान** असा एकाएकीं कुठें निघून गेला हें त्यांना समजेना. **आदमखानाचें** नाहींसें होणें, त्या बड्या असामीची बावरलेली चौक समुद्रा, नुकतांच उठलेला चमत्कारिक गलका यांचा परस्परांशीं कांहीं संबंध होता कीं काय ?

# प्रकरण एकतिसावें.

## बादशहासमोर !

या अनेक गोष्टींचा परस्परसंबंध होता कीं काय हें एव्हांच सांगवत नाहीं. पण त्या बव्या असामीच्या येण्यापूर्वी आदमखानाचें एकाएकीं निघून जाणें यांचा कांहीं परस्परसंबंध असावा असें आमच्या मुत्सद्यांस वाटलेंच.

थोड्याच वेळांत हकीम येऊन दाखल झाले. त्यांनीं त्या बव्या असामीची प्रकृति तपासून पाहिली व औषधयोजनाही केली. रोग्यास चांगली विश्रांति मिळून झोंप आली पाहिजे असें सांगून हकीमसाहेब निघून गेले व पुन्हां त्या बंगल्यांत लौंच सामसूम झालें.

तास-पाऊणतास वेळ गेला असेल नसेल तोंच कोणीतरी काळोखांत अस्पष्ट शब्दांत बोलत आहे असा भास कारभारीसाहेबांस झाला. त्यांची झोंप हलकी होती. बदाउनी व शिरहिंदी निघून गेले होते.

" तुला मी नाहींसा करतों कीं मला तूं करतोस पाहूं तर खरें ! "

हें वाक्य कारभारीसाहेबांच्या कानांवर स्पष्टच आलें. त्याबरोबर कारभारीसाहेब दचकून आपल्या आंथरुणांतच जागे होऊन बसले.

इकडे काशी क्षेत्राच्या उत्तरेकडच्या एका दूरच्या बाजूस याच वेळीं अगदीं निर्जन स्थलीं एक तरुण तापसी एका वृक्षाच्या आसऱ्यानें जाळ पेटवून बसला होता आणि त्याच्यासमोर दुसरा एक तितकाच तरुण फकीर त्याच्याशीं संवाद करीत बसला होता. त्या दोघांचा धर्मविषयक वाद चालला होता. हिंदुधर्मांतील व मुसलमानी धर्मांतील महंत चमत्कार करून कसे दाखवतात याविषयीं त्यांचा संवाद चालला असून तो तरुण तापसी त्या तरुण फकीरास आपण स्वतः पाहिलेली एक गोष्ट सांगत होता. तो तापसी म्हणाला.—

"नंतर ते लोक गंगानदीच्या कांठावर गेले. तो मठपति पुढें होता. त्याच्याबरोबर त्याचे ३०० शिष्य होते. आणि काशीक्षेत्रांतील असंख्य पंडित त्यांच्याबरोबर होते. ती पोथी त्यांनीं रागारागानें गंगानदीच्या पाण्यांत फेंकून दिली. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत ती पोथी वरच्यावर राहून कोरडीच्या कोरडीच पुन्हा घाटाकडे आली. कोणी वृद्ध भाविक म्हणत होते कीं गंगादेवीनें आपल्या हातानें ती पोथी उचलून धरली. मला तसा कांहीं प्रकार दिसला नाहीं. पण ती पोथी तीराला भिजल्याशिवाय कोरडीच्याकोरडीच तरंगत आलेली दिसली. ती आल्यावर सर्वांनीं " एकनाथमहाराज की जय " अशी गर्जना केली. "

" मोठें आश्चर्यच म्हणावयाचें. " तो फकीर म्हणाला.

" आतां तुम्हीच पहा. नंतर त्या लोकांनीं दक्षिणेकडून आलेल्या त्या ग्रंथका-

राची एकनाथाची हत्तीवरून मिरवणूक काढली. सगळे पंडित त्या ग्रंथकार्त्याला शरण गेले. आणि तो मराठी-भाषेचा ग्रंथ त्या संस्कृत भाषेच्या अभिमान्यांस आदरणीय मानणें भाग पडलें. म्हणून म्हणतों कीं धर्माला आणि देवाला भाषा, पंथ, जाति ही कांहीं नकोत. एक धर्मभावना, पवित्र धर्मभावना पाहिजे. पंथांचें तंटे माजवून शत्रुत्व जोडणें या पासून धर्म दुरावतो. ''

'' पण माझा या आपल्या गोष्टीवर विश्वास बसत नाहीं. '' तो फकीर म्हणाला, '' पाण्याच्या लाटांनीं तो ग्रंथ कागदाचा असल्यामुळें तरंगत तरंगत आला असेल. भिज-ल्याशिवाय कसा राहिला हा एक प्रश्न उरतो खरा. पण एवढ्याच कारणास्तव त्या पंडितांनीं त्या ग्रंथकाराचें एवढें स्तोम कां माजवावें ? ''

'' ती त्यांच्या भावनेची गोष्ट आहे. त्यांनीं त्या ग्रंथकाराचा अपूर्व सन्मान केला. त्या ग्रंथाचाहि सत्कार केला. त्या ग्रंथाचीं पारायणें केलीं. आणि आतां तो ग्रंथकार '' रुक्मिणी स्वयंवर '' नांवाचा दुसरा एक ग्रंथ बसून लिहित आहे. ''

त्या तापसाचें हें सर्व भाषण चाललें असतां त्या फकीराला मोठा राग आणि अत्यंत कंटाळा येत होता, तर त्या तापसाला वर्णीत असलेले प्रसंग जणुं आपल्या डोळ्या समोर घडत आहेत असें भासून त्याची प्रवृत्ति तन्मय झाली होती.

'' आपणाला तो ग्रंथकार फार पूज्य वाटला असेल नाहीं ?'' त्या फकीरानें व्यंग भावानें विचारलें.

'' धर्मांच्या नांवांत जरी फरक असला, तरी धर्मनिष्ठ तो धर्मनिष्ठच. तो स्व-धर्मीयांप्रमाणेंच परधर्मीयांनादेखिल पूज्य झालाच पाहिजे.''

'' तुमची इस्लामी धर्मावरची निष्ठा थोडथोडी ढळूं लागली असेल नाहीं बरें ?''

'' बिलकूल नाहीं. पण तुम्ही कोण आणि कुठून आलांत, तें मला अद्याप सांगितलेंच नाहींत. ''

'' मी मक्केहून आलों. येतांना प्रवास करीत शहरें फिरत फिरत येत असतां दिल्ली आग्रा पाहून आलों. आग्रा शहरांत मात्र मोठी गंमत ऐकली. ''

'' काय गंमत ऐकलीत आपण ? '' शांत मुद्रेनें **तापसानें** विचारलें.

'' अहो गंमत कसली ? बोलायलाच चुकलों मी. गमती म्हणायच्या. पहिली गंमत अशी कीं, **अकबर** बादशहा मुसलमानी धर्मांत जन्म घेतलेला. पण तो ना हिंदु, ना मुसलमान. त्यानें म्हणे कोणता नवीनच धर्म स्थापन केला आहे. पण खरें बोलायचें तर त्याला मुळीं धर्मच नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं. ''

'' कां बरें ? असें कां म्हणतां आपण ? '' हे शब्द असे निघाले कीं जणूं काय बोलणारा **अकबर**शहाचा पक्षपाती वकीलच होता असें ऐकणारास भासावें.

'' असें कां म्हणतों ? मी विचारतों—असें कां म्हणूं नये ? '' तितक्याच जोरानें फकिरानें म्हटलें, '' आरंभापासून पवित्र हिजरी शक-चांद्रमास बदलून नवा वर्षारंभ सुरुं करून बादशहानें पवित्र धर्मांत ढवळाढवळ केली असें सच्चा मुसलमानांनीं कां मानूं

नये ? अकबरशहाच्या कारकीर्दींत अरबी भाषेची पायमल्ली चालली आहे. असल्या धर्मभ्रष्ट राजाच्या राज्यांत कोणीहि मुसलमानी धर्मावर निष्ठा असणारा मनुष्य पाऊल टाकणार नाहीं. ''

'' तर मग अकबरबादशहाच्या राज्यांतील सारेच मुसलमान धर्मभ्रष्ट आहेत कीं काय ? धर्मभ्रष्ट नसतील तर त्यांनीं याच्यापूर्वींच राज्यांतून निघून जावयास पाहिजे होतें. ''

'' माझ्या बोलण्याची तुम्ही थट्टाच चालविली आहे असें दिसतें. '' तो फकीर चिडून म्हणाला. त्याच्या मुठीहि वळल्या होत्या व त्याचा हात कशासाठीं तरी कंबरेकडे वळला होता. तो मोठ्या प्रयासानें आत्मसंयमन करून बोलत होता. '' मुसलमानी धर्माची केवळ खूणच अशी ही दाढी '' इतकें बोलून त्यानें आपल्या दाढीवरून आपला उजवा हात फिरविला व तापसाच्या दाढीरहित हनुवटीकडे तुच्छतादर्शक मुद्रेनें पाहिलें, '' तो बादशहा स्वतः राखीत नाहीं, आणि दुसऱ्यांनीं राखलेली त्याला पहावत नाहीं. हा सारा धर्मनिष्ठपणाच कां ? ''

'' कां धर्म फक्त दाढींतच दडी मारून बसला आहे वाटतें ? '' तापसाच्या या वाक्यानें फकीराच्या अंगाचा अंगार झाला. तथापि तो आपला संताप गिळून पुढें बोलूं लागला.

'' बादशहाला कुर्निसात करतांना जमिनीपर्यंत मस्तक नमविला पाहिजे असें निघालेलें बादशाही फर्मान दौलतींच्या जुन्या नव्या नोकरांना सारखेंच मानहानिकारक झालें आहे. बादशहाचा हा उन्मत्तपणा नव्हे काय ? ''

'' कां ? आतां नाहीं कांहीं आपण बोललांत ? लढाईत पाडाव केलेले कैदी गुलाम म्हणुन आणण्याची संवयी मोडून टाकणें, विधर्मीयावरच्या कराची बंदी करणें या अकबरबादशहाच्या सुधारणा म्हणावयाच्या कीं कुधारणा ? नागोरचा एक मुबारिक म्हणून येतो. आग्र्याच्या पाठशाळेंत मुलांना शिकवण्याचें काम करतो. मूळचा सुनी असून मग शिया होतो ! आणि शेवटीं धर्मभ्रष्ट नास्तिक बनून बडबड करूं लागतांच लोकांकडून झालेला छळ सोसवेना म्हणून घरदार टाकून निघून जातो !''

हें वाक्य पुरें व्हावयाच्या पूर्वींच तो तापसी घाबरून गेलेला दिसला. फकीराच्या मनाला समाधान झालें. आपल्या शब्दांचा इष्ट परिणाम झालेला पाहून त्याला फार आनंद झाला.

'' म्हणतां काय हें आपण ? शेख मुबारिक आग्र्याहून परागंदा झाले ? '' डोळे विस्फारित करून कांपणाऱ्या ओंठांनीं तापसानें विचारलें.

'' झाले-झाले-परागंदा झाले, तोंड काळें केलें त्यांनीं ! '' तो फकीर म्हणाला, व रागावलेल्या स्थितींतही किंचित् समाधानानें हांसत असल्यासारखा चेहरा करून बोलला. '' तो गेला म्हणून तुमचें काय झालें ? आपण कां असे गांगरलांत ?''

यावर तो तापसी कांहींच बोलला नाहीं. पण त्या फकीराचें काम झालें. तो तापसी कोण होता हेंच त्याला पहावयाचें होतें. तो तापसी कोण हें चांचपण्याचें त्याचें काम पुरें झालें. ज्याच्या शोधांत आपण आहोंत तोच हा माणूस इतकी त्याची खात्री पटतांच त्यानें तापसाच्या दुःखमग्न शरीरावर चाल केली, आणि त्याची मानगुटी धरली!

" बोल, तुझें नांव काय ? " त्याची मान गदगदा हालवीत फकीरानें विचारलें.

तापसी विचारा मूर्च्छितच होऊन गेला होता. त्याला उत्तर देण्याचें देखील भान राहिलें नव्हतें. पण फकीर पुढें बोलतच होता.

" पागल ! हराम ! ढोंगी ! मुसलमानी धर्माचें चिन्ह तुझ्या चेहऱ्यावर स्पष्ट जर दिसत नाहीं, तर तो चेहरा या जगांतून नाहींसाच झाला पाहिजे." असें म्हणून त्यानें कंबरेची कट्यार उपसली आणि वार करणार तोंच त्याच्या कंबरेला बळकट विळखा पडला.

" हं ! खबरदार ! माझा माल आहे तो. त्याला नाहींसा करावयाचा अधिकार तुझा नाहीं. दे ती कट्यार मुकाट्यानें माझ्या हातांत." असें म्हणून त्यानें कंबरेचा विळखा सोडून कट्यारीच्या हातास हात घातला.

इतका प्रकार होईतों फकीरानें विळखा घालणाऱ्यास ओळखलें. क्षणमात्र नवीन आलेल्या दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. आणि शेवटीं वादविवादांत वेळ घालविण्यानें विनाकारण संधि निघून जाईल असा पोक्त विचार करून त्यानें ती कट्यार विळखा घालणाऱ्याकडेच स्वखुषीनें राहूं दिली.

" चल. जा तर बजाव आपली कामगिरी" फकीर म्हणाला. अर्थात् यावेळीं दोघेही त्या तापसाकडे पहात उभे होते. तापसानें शेकण्याकरितां पेटविलेला जाळ आतां साफ विझून गेला होता. अर्थात् पुन्हां दाट काळोख सर्वत्र पसरला. फक्त थोडेसे निखारे त्याठिकाणीं लालसर दिसत होते. थंडी तर मी म्हणत होती. जवळच्या झाडींतून सरसरल्याचा आवाज झाला आणि एक श्वापद तेथून निघून गेल्यासारखें त्या दोघांस वाटलें. त्या श्वापदाकडे ते डोळे फाडून पहात आहेत, तोंच त्या दोघांच्याही जांघांवर एकाच तरवारीचा सफाईचा वार झाला. झाडींत पुनां सरसरल्याचा आवाज एकवार झाला. पण त्या वाराबरोबर दोघेही जण जमिनीवरविव्हळत पडले.

त्या गडद काळोखांत कोणीतरी आलें आणि त्या मूर्च्छित तापसास पाठीवर उचलून घेऊन गेलें.

विव्हळत पडलेले ते दोघेही जण हें डोळ्यांनीं पाहत होते, पण त्यांच्यानें वर उठवत नव्हतें.

मागील प्रकरणांत **मिर्झाखान** नामक बड्या असामीला छाबिन्यांतून आणून कारभारीसाहेबांच्या घरीं पोंचविल्याचें सांगितलेंच आहे. हे **मिर्झाखान**, ऊर्फ-खान—खानन म्हणजे **बहिरामखानाचे** चिरंजीव होत. ह्यांचे खरें नांव अबदुल-रहीम असें होतें. पण पुढें ह्यानां खान—खानन असा किताब मिळाला होता. बहिराम

खान यात्रेला निघाल्यानंतर त्याचा वाटेंतच खून करण्यांत आला ही हकीगत इतिहासज्ञास विदित आहेच. त्यानंतर **मिर्झाखानाला** आपल्या बापाचा खून करविण्यांत **अकबराचा** हात असावा असा संशय येऊन त्यानें मनांत बादशहाविषयीं डूखही धरला होता. पण नंतर बादशहाकडूनच त्याचा सन्मान करण्यांत आला व त्याला मोठी असामीची कामगिरी देण्यांत आली व त्याच्यावर शहाचा मोठा विश्वास असल्याचें इतर सरदार मंडळीस दिसून येऊं लागले. तसतसा तो इतरांस अप्रिय होऊं लागला. वृद्ध **मामानागाचा** मुलगा **आदमखान** याची कोणती महत्वाकांक्षा होती व त्या महत्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं त्या दोघांचें काय प्रयत्न चालले होते. यासंबंधीं माहिती पूर्वी येऊन गेलीच आहे. अर्थात् आदमखानाच्या वाटेंत **मिर्झाखान** हा मोठाच प्रतिस्पर्धी होता.

त्या रात्रीं जो गलबला उडाला तो एका मदोन्मत्त हत्तीचा प्रताप होता. इराणहून अकबरशहाला कांहीं दिवसापूर्वीं नजराणा आला होता. त्यात पांच हत्ती होते. त्यांतील प्रचंड हत्ती मदोन्मत्त झाला होता. तो सुटला आणि शहरांतून वाटेंत सांपडेल त्याची नासधूस करीत सुटला. कारभारीसाहेबांच्या घराजवळील झाड त्यानेंच गंडस्थळाच्या धडाक्यांनीं, टकरांनीं आणि सोंडेनें पिळवटून पाडलें होतें. एक दोन घरेंही त्यानें चालतां चालतां धुळीस मिळविलीं होती. त्या रात्रीं त्यानें आणखीही बराच प्रताप गाजविला असता. पण इतक्यांत अकस्मात् महा वगैरे जागे होऊन त्याचा पाठलाग करीत सुटले आणि लोकांचा घोळका जमला. पण एकाच्यानेंही त्या हत्तीच्या समोर जाववेना. इतक्यांत त्या मंडळीमधून एक दोन जण पुढें येत होते. त्यांत एक मिर्झाखान हा होता. पण ऐनवेळीं मिर्झाखान किंचित् मागें सरकला. पण तेवढ्याचा फारच चमत्कारिक परिणाम झाला. कारण मागाहून काळोखांतून एक बाण सूंसूं करीत आला. तो वास्तविकपणें थेट **मिर्झाखानाच्या** पाठींत शिरून पोटांतून बाहेर पडावयाचा. पण **मिर्झाखान** मागें सरकल्यामुळें तो नेम चुकून दुसऱ्याच इसमास गुडघ्याखालीं डाव्या पायास लागला. कारण तो इसम हत्तीवर स्वार होण्याकरितां जमिनीच्या उंचवटयावर चढत होता. हातांत अंकुश नाहीं या फिकीरींत तो शूर निधडा पुरुष आहे तोंच तो बाण त्याच्या पायांत घुसला. पण दैवाची खैर अशी कीं तो बाण मधोमध न घुसतां एका बाजूची कातडी खरचटून तोडून बसला. तोंच बाण त्या वीरानें उपसला आणि हत्तीच्या मानेवर उडी मारली. हत्ती वर सोंड करून त्याला खालीं लोळण्याचा आतां प्रयत्न करणार तोंच त्या वीरानें हातांतला बाण हत्तीच्या गंडस्थळांत खुपसला. त्याबरोबर हत्ती तेथल्यातेथेंच वरमला. तेवढयांत इतर महात सभोंवार जमून त्यांनीं हत्तीला पायबंद घातले आणि पहातात तों हत्तीला वरमावयास लावून नरम आणणारा शूर पुरुष कोण हें त्यांनीं ओळखिलें आणि सर्वांनीं मिळून त्या वीर पुरुषास वंदन केलें आणि त्याच्या नांवाचा जयघोष केला. तो वीर पुरुष खुद्द **अकबरबादशहाच** होता.

दरम्यानच्या वेळांत आपणावर नेम धरलेला बाण कुठून आला हें पाहण्याकरितां

मिर्झाखान मागें सरला व पाहूं लागला तों दुसरा एक बाण त्याच्या पायाला लागला. आणि नुकतेंच एक झाड चवताळलेल्या हत्तीनें मोडून पाडलें होतें त्याच्या फांद्यांत अडकून पडला. लोकांची गर्दी हत्तीवरील बादशहाच्या पाठीमागून चालली होती. पुढें घडलेला प्रकार मागील प्रकरणांत आलाच आहे.

त्या रात्रीं कारभारीसाहेबानां भेटण्याकरितां **मिर्झाखान** चालले होते. ते त्या रात्रीं तेथें येणार हें आदमखानाला ठाऊक होतें. पण **अदमखानाला** महत्वाच्या खलबतासाठीं त्या ठिकाणीं हजर रहावयाचेंच होतें. त्यानें आपला माणूस मिर्झाखानाच्या पाळतीवर ठेवलाच होता. त्याच्याकडून विशिष्टप्रकारची खूण ऐकूं येतांच अदमखान कोणाला नकळत तेथून नाहींसा झाला होता.

अकबरबादशहास रात्री फिरण्याची सवय असे हें सर्वांना ठाऊकच आहे. त्या रात्रीं **अकबरबादशहा** बाहेर पडला असतां चवताळलेल्या हत्तीच्या अत्याचाराचे प्रकार त्याच्या दृष्टीस पडले. पण त्यापूर्वीं आपल्या राजवटींतल्या मुत्सद्यांचे प्रकारही त्याच्या कानावर व दृष्टीस पडल्याशिवाय राहिले नव्हते.

आदमखानाची नालायकी सम्राटाच्या नजरेस कधींच आली होती. पण आपल्या मातृतुल्य दाईचा तो मुलगा असल्यामुळें त्याच्यावर दोषारोप शाबीत झाल्याशिवाय त्याच्याविरुद्ध त्याला बोलतां येत नव्हतें. तशी संधि आज आयती आली होती. मिर्झाखानाची ऐपत वाढवावयाचें बादशहाच्या मनांत होतें व त्या बढतीला तो खरोखर पात्रच होता.

त्या रात्रीं रात्रौ झोंपी गेल्यानंतर कारभारीसाहेबांना जे शब्द ऐकावयाला आले ते **मिर्झाखानानें** स्वप्नांत उच्चारले होते. पण कारभारीसाहेबांच्या मनांत त्या वाक्यामुळें निरनिराळे विचार तरंग उत्पन्न होऊं लागले. वास्तविकपणें ते शब्द खान–खाननें **आदमखानाला** उद्देशूनच स्वप्नांत उच्चारले होते.

तेही दिवस गेले. आणि बादशहाच्या तुळाभाराचा उत्साहदिन आला. याच दिवसाची वाट कित्येक लोक पहात होते. गरीबानां द्रव्य, भुकेलेल्यांनां अन्न, उघड्या दीनदुबळ्यांनां वस्त्र–प्रावरण, बद्धांना मुक्तता, सत्पात्रांना गौरव आज मिळावयाचा होता. म्हणून हा दिवस कधीं उजाडतो अशी वाट अनेक माणसें अनेक कारणांस्तव पहात असत. अकबरशहाच्या राज्यांत या दिवसाचें महत्व फार असे. साम्राज्यांतील मुत्सद्दी आपले मनांतले डाव साधण्याची संधि सांपडते कीं काय हेंही ह्याच वेळीं पहात असत. ते त्यांचे डावपेंच बादशहाला पूर्णपणें कळलेले असत; व तो आपल्या मतानें योग्य ठरेल तेंच करीत असे.

हा उत्साह अनेक दिवस चालत असे. या अवधींत अनेक मिरवणुकी, मोठमोठ्या जत्रा व बाजार, आणि देखावे रोज पहावयास मिळत. या उत्साहांत सम्राट राजवाड्यांत न राहतां बाहेर रहात असे, आणि रात्रौ थोड्यावेळापुरतांच राजवाड्यांत जाई. बाहेर एक मोठा भव्य व सुंदर शामियाना उभारण्यांत येत असे. आणि या मुख्य

शामियान्याच्या भोंवतालीं निरनिराळ्या अमीर उमरावांचे शामियाने व शोभिवंत तंबू उभारलेले असत. खुद्द सम्राटाच्या शामियान्यास दोन एकर जमीन लागत असे. पायाखालीं रेशमी व जरतारी रुजामे शामियान्यांत आंथरलेले असत. शामियान्याच्या झालरी जाळीच्या असून त्यांत सुवर्ण, मोतीं, आणि अनेकप्रकारचीं रत्नें गुंफलेलीं असत. सभोंवतालचे तंबूदेखील वरीलप्रमाणें कमजास्ती प्रमाणांत शृंगारलेले असत. कारण त्यांना एकमेकांस भेटावयास जावयाचें असे. तर क्वचित् प्रसंगीं खुद्द सम्राटच लहर लागेल त्या तंबूंत अवाचित प्रवेश करीत असे. या समारंभाच्या दिवसांत उमरावांस सरकारकडून–बादशहाकडून हत्ती, घोडे, रत्नें, पोषाख बक्षीस देण्यांत येत असत. शेवटच्या दिवशीं बादशहाचा तुळाभार होई आणि तीं द्रव्यें गोरगरिबांस व प्रेक्षकांस वाटून देण्यांत येत असत. जिकडेतिकडे आनंदीआनंद खेळत असे.

शामियान्यांत भव्य असें रत्नजडित सिंहासन मांडलेलें असे. पण अकबर बादशहाची नेहमींच संवय अशी असे कीं सिंहासनावरील उच्चासनाच्या किंचित् खालीं तसेंच दुसरें एक आसन करवून घेतलेलें असे व त्या ठिकाणीं बादशहा बसत असे. बादशहाचा पोषाख उंची पण साधा असे. त्यांत डामडौल बिलकूल नसे. आपल्या राजवाड्यांत व स्वारीशिकारींत **तो स्वतःच्या राज्यांत तयार झालेल्या जिनसा वापरण्याचा नियम बाळगीत असे.** झालरी रुजामे व इतर उंची कापडमाल **हिंदुस्थानांतच तयार झालेला घेण्याचा त्याचा बाणा असे.** त्याचा नेहमींचाच स्वभाव गोड असला तरी या समारंभाच्या दिवसांत तर बालस्वभावांतील मोकळेपणा त्याच्याठिकाणीं दिसून येई. या तुळाभाराच्या दिवशीं तर कोणाही गरीब प्रजाजनानें कितीहि अल्पमोलीं वस्तु प्रेमानें नजर केली तरी तिचा तो तितक्याच प्रेमानें स्वीकार करी. अर्थात् हिंदुस्थानच्या राजनिष्ठ जनतेस तो ईश्वराप्रमाणें भासे. दिवसांतून कांहीं ठराविक अल्पकाल तो **हस्तकौशल्याचीं कामें स्वतःच्या हातानें करण्यांत घालवी.** त्याची झोंप तर अगदींच अल्प म्हणजे जवळजवळ चारच तासांची असे. कधींकधीं तीन तासांची झोंपच त्यास पुरेशीं होत असे. त्याचा आहार तर कमालीचा अल्प असे. त्याच्याठिकाणीं "भोजननिद्रादिकांत परिमितता" अशाप्रकारची कशी बाणली असावी हें मोठेंच गूढ आहे.

याच त्याच्या गुणांमुळें तो प्रजेस प्रिय झाला होता, तर याच गुणांमुळें तो कांहीं व्यक्तींस अप्रिय झाला होता. तुळाभार ज्या दिवशीं व्हावयाचा होता त्या दिवशीं दरबारी गवय्यांनीं सकाळींच गावयास सुरवात केली—

**अकबराच्या** दरबारांत अनेक गवई होते. पण त्यांत देखिल तानसेन, सुरतसेन, रामदास, गोपालनायक, मदनराय, लालादेवी, चांदखान, सुरजखान, तानतरंगखान, बैजुबेगबावरा, मिर्झाआकेला व **झुल्फिकार** फिरंगी हे बारा गवई फार नामांकित होते. जशी दरबारच्या मुत्सद्यांत तशींच दरबारच्या गवयांत देखील आपापसांत फार चुरस असे. एकमेकांवर चढाई करून बादशहाची मर्जी संपादन करण्यासाठीं ते झटत असत. तथापि

तानसेनचें मूर्धस्थान अढळच राहिलें.इतरांस मात्र चुरशीनें चढउतार होई. पण तानसेनाचा हा वरचष्मा पुष्कळांस सहन होत नसे.

तानसेनाची गायनाची तयारी इतर गवय्यांसारखीच होती. या द्वादश गवय्यांपैकीं एकादा गवई शास्त्रीयगायनाच्या दृष्टीनें कदाचित् अधिक जाणता असेल; दुसरा एकादा गवई स्वरमाधुर्यानें श्रेष्ठही कदाचित् असेल. पण समयोचितता व प्रसंगानुरूप तत्क्षणींच चीज बनवणें हा गुण एकट्या तानसेनामध्येंच होता. तानसेन गानकुशल होता; पण त्याच्याठिकाणीं शीघ्रकवित्वशक्ति व प्रसंगोचितता हा गुण असल्यामुळें त्याच्या गायनावर बादशाहा बहाल खुष असे व त्यामुळें त्याच्यासमोर दुसऱ्या कोणत्याहि गवयाचें तेज पडत नसे.

आजच्याच प्रसंगीं कोण गवई काय चिजा गायले ते जरी पाहिलें, तरी देखील त्यांच्या गायनांतील तफावत दिसून येण्यासारखी आहे. तानतरंगखान गवयांनीं पुढील चीज ताना छेडछेडून म्हटली.—

**"सगरा बिगारा जोबनवा मोरा रे ॥स०॥ जावोजी जाव बालम हमसे ना बोलो, मेरा जीरा क्युं जलाया । जोबनवा मोरा रे ॥स० ॥१॥**

ही चीज इतकी सुंदर वठली कीं रसिकांनीं मानच डोलवावी. तानतरंगखान हें नांव अगदीं सार्थ आहे असेंच त्या गवयाविषयीं सर्वांस वाटे.

सुरतसेनानें पुढील चीज गाइली—

**कहां जो र हे तुम रात हो नंदसूत ॥ कहां ॥**

**सगरी रैन मोहे तलपत बीती, तुम जो आये प्रभात,हो नंदसूत कहां ॥**

या गायनांत रंग भरून सुरतखाननें देखील आपलें नांव सार्थ केलें.

तर याच दिवशीं सकाळच्या वेळीं तानसेनानें खालील पद म्हटलें—

( ताल ध्रुपद )

**हे राजा जहां जहां जावे वहां वहां सुनियत तेरोहि नाम॥धृ०॥ ज्यो है नरनरेंद्र नारी पोहरे प्रताप ओभी तरे दरसनकी लालसा आस करे, और तू स्तुती श्रवन सुन पावे विश्राम ॥ हे० ॥ ज्यों है गुनी गंधर्व कुशल विद्याधर ओभी जपत है तेरोहि धाम, श्रीराग गावत तानसेनके प्रभु दीनबंधु राजाराम ॥ हे० ॥**

त्याच दिवशीं दरबारच्या वेळी तानसेननें पुढील पद म्हटलें होतें.

(आसावरी–चौताल.)

**है देखी इंद्रलीला इंद्रको सो दरबार, तख्त बैठे है अतल मानी ॥ है० ॥ दीपनाम जंबुदीप दीपनाम सिंहलदीप, ऐसो दीप है जैसो कनक हीरा ॥ १ ॥ येकनको दान देत येकनको बुलाय लेत, येकनको बक्षत घर जर कसचीरा ॥ २ ॥ तानसेन कहे प्रभु तेहारे राजनमें, गुनीजन गंधर्व करत क्रीडा ॥ ३ ॥**

तानसेनाच्या वरील दोन्ही चिजा किती प्रसंगोचित आहेत, त्या रसिक वाचकांनींच ठरवाव्या. मग बादशहाची मर्जी तानसेनावर विशेष प्रसन्न कां बरें होणार नाहीं ? तानसेनाच्या या प्रसंगोचिततेचा मासला पुढेंहि एखादे खेपेस दाखवून देण्याचा विचार आहे. पण तानसेनाच्या चलतीमुळें दरबारीमंडळी विशेषतः धर्मसभेंत भाग घेणारी दरबारी मंडळी कुचकुचुं लागली होती. त्यांच्या द्वेषाची मजल इथवर गेली कीं, गायन हा विषयच वाईट आहे असा सवाल धर्मशास्त्रांत आधार सांपडल्यास धर्मसभेंत बादशहासमोर वादाकरितां टाकावा. पण आज मात्र तानसेनावर बादशहा बहाल खूष होता.

बादशहा तानसेनाच्या गाण्यावर नेहमीं खूष असे. सकाळींच बाहेर येतांच बादशहानें तानसेनाला योग्य पारितोषक दिलें.

पूर्वी ठरविल्याप्रमाणें कैद्यांच्या मुक्ततेचा प्रश्न निघतांच काबूलच्या पठाणांस बंधमुक्त करण्याची परवानगी आमच्या दरबारीं मुत्सद्यांनीं मिळविण्याचा प्रयत्न केला. बादशहानें याच सुमारास गुजराथ प्रांत जिंकून हमरिवर शस्त्र उपसलें होतें. म्हणून ह्या सालच्या उत्साहांत फारच आनंद दिसून येत होता, याच उत्साहाच्या निमित्तानें सम्राटानें मिर्झाखानाला थोडक्याच मुदतींत दक्षिणेंतील स्वारीवर पाठविण्याचा आपला मनोदय जाहीर केला. शिवशर्मा हे या समारंभास हजर होते व त्यांनाही पारितोषक मिळालें. पण त्यांचा विचार मठपतीचा अधिकार सोडून काशीवास पतकरावयाचा होता.

**शेख भावन** दरबारास होतेच. दोन तीन दिवसांतच पुन्हा धर्मसभेची बैठक भरावयाची होती. म्हणून सर्व धर्मांचें पंडितही या उत्साहास जमले होते.

तुळाभाराचा दिवस गर्दीच्या कार्यकामांत केव्हां कसा गेला हें कोणासच समजलें नाहीं. रात्र पडली. पण बादशहाचें लक्ष आज मुळींच लागत नव्हतें. **फैझीच्या** वर्तनाबद्दलच्या अनेक बातम्या त्याला ऐकूं येत होत्या. पण खरी हकीकत त्याला समजत नव्हती. **फैझीनें** ताबडतोब यावें अशी त्याची इच्छा होती पण **फैझी** काशीक्षेत्रांतून कुठें नाहींसा झाल्याचें चमत्कारिक वर्तमान बादशहाला समजलें होतें. शिवाय कारभारी साहेबांकडचा हसनदेखील इतक्याच सुमारास आग्र्यांतून नाहींसा झाला होता. पण खुद्द कारभारीसाहेब आपल्या एका दूताचा कुठें मागमूस नाहीं म्हणून घोरांत पडले होते. आपल्याला न कळवितां मुबारिकसाहेब नागोरास जातों म्हणून सांगून निघून गेले याचें बादशहाला वाईट वाटत होतें. फाझलची समजूत करतां करतां बादशाहाला पुरे पुरे होत होतें. तशांत **फैझीही** नाहींसा झाल्याची वार्ता ऐकून बादशहाचा धीर खचला होता. पण पहाणारास तसें मुळींच दिसून आलें नसतें. **शेख मुबारिक** निघून गेल्यामुळें आपल्या राजकारणाचा विजय झाला असें आमच्या मुत्सद्दी मंडळांस वाटलें होतें. **फैझीला** नाहींसा झालेला ऐकून तर त्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला होता. पण त्याला जगांतून अजीबातच नाहींसा करण्याचे त्यांचे आणखीही प्रयत्न चालूच होते. शिवाय **फाजल** अद्याप स्थानभ्रष्ट झाला नव्हता. तो आहे तोंपर्यंत आपलें तेज पडणार नाहीं हें ते जाणून होते.

परंतु त्यांच्या दुसऱ्या कारस्थानास जोर येत चालला होता. सेलीम आतां वयांत येत असून त्याला **नूरजहान** फार आवडूं लागली होती. बापाचा बोध त्याला विषासारखा कटु वाटत असे. त्या उपदेशाची प्रतिक्रियाच झाल्यामुळें जणूं काय त्याचा कल कारभारीसाहेब व त्यांचें मुत्सद्दीमंडळ यांच्याकडे तोलूं लागला होता. कारभारीसाहेबांस आश्रय द्यावयाचें त्याच्या मनानें पक्कें ठरविलें होतें. अदमखानाला विशेषशी आशा करण्यास जागा नसल्यामुळें तोही या मुत्सद्दीकंपूसच मिळाला होता. त्याची आई मामानागा अर्थातच असंतुष्ट होत होती. या सर्व गोष्टींचा विचार करीत बादशहा बसला होता. बादशहाचें मन व्यग्र झालें होतें. रोजचे व्यवहार व आजच्या दिवसाचे विशिष्टविधीही तो करीत होता. पण त्याचें मन उतरल्यासारखें झालें होतें.

रात्र बरीच झाली. बादशहा आपल्या विचारांतच गर्क होता. मध्यरात्र उलटून गेली पहांटचा वेळ होत आला. तानसेनचे आलाप ऐकूं येऊं लागले. देवडीवरील पहारेकऱ्यांशीं कोणी बोलत असल्याचा ध्वनि ऐकूं आला. थोड्याचवेळांत आपल्या ओळखीचा अबदुल्लाखान हेर बादशहाच्या समोर कुर्निसात करून अदबीनें उभा राहिला.

बादशहाच्या डोळ्यांत विलक्षण तेज चमकलें. अधीरतेनें सम्राटांनीं विचारलें—

" काय आहे हाल हवाल ? "

" ठीक ! " हा शब्द पण खिन्नतेनेंच आला होता.

" ठीक म्हणजे काय ! "

" आतां समक्षच समजेल. "

" कोणाकडून ? "

" फैझीं कडून ! "

" फैझी आले आहेत ? "

" आले आहेत नव्हे, त्यानां आणले आहेत ! "

" म्हणजे ? "

# प्रकरण बत्तिसावें.

## फैझीच्या मनाचा निश्चय.

बादशहाच्या प्रश्नाला अबदुल्लाखानानें उत्तर दिलें तें बरेंच लांबलचक होतें. गंगा-कांठावर घडलेली सर्व हकीगत त्यानें बादशहास सांगितली. फैझीला आणण्याकरितांच एकादोघांस बरोबर घेऊन जाण्यासाठीं बादशहानें फर्माविलें होतें व त्यांचीच तो इतक्या उत्सुकतेनें वाट पहात होता. फैझीचा शोध करावयास अबदुल्लाखानास बराच त्रास पडला. त्याला त्यानें शेवटीं ओळखला. पण त्याच्या सोबत्यांचीं आणि त्याची चुकामूक झाल्यामुळें फैझीच्या मागोमाग जावयास त्यास विलंब लागला. तेवढ्यांत फैझी मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें जाळ पेटवून एकटाच शेकत बसला होता. पण अबदुल्लाखान तेथें यावयाच्या पूर्वींच आणखी दुसरेच दोघेजण तेथें येऊन ठेपले होते.

कारभारीसाहेबांनीं आपल्या मित्रांस फैझी आम्याला आतां मुळींच येणार नाहीं अशी व्यवस्था आपण करीत असल्याचें जें सांगितलें होतें. तें आमच्या वाचकांना आठवत असेलच. त्यानें आपला हस्तक पढवून काशीकडे पाठवून दिला होता. त्याच्या मदतीस म्हणून आपल्या धन्याची परवानगी काढून हसन देखील गेला होता. फैझीला ठार मारण्याची प्रतिज्ञा हसनची होती. तेव्हां त्यासाठींच हसन गेला होता. ही कामगिरी महत्वाची आहे असें जाणून कारभारीसाहेबांचा हस्तक बक्षिस उपटण्याकरितां तें काम हसनला चुकवून आपण एकटाच करूं पहात होता. आणि हसनचाहि बेत तें काम आपण स्वतः एकट्यानेंच करावें असा होता. मात्र तें बक्षिसाच्या लालचीनें नव्हे तर केवळ सूड उगविण्याकरितां. हसनचा डोळा चुकवून कारभारीसाहेबांचा हस्तक तें काम करणार तोंच हसननें येऊन त्याच्या कमरेस विळखा घातला.

परंतु इतक्यांत अबदुल्लाखान येऊन ठेपला व पुढें कोणतें अघोर कृत्य घडणार तें ओळखून त्यानें कशी सावधगिरी राखली हें मागें आलेंच आहे. ते दोघे असामी थोडें बरें वाटल्यावर व लोकांची मदत मिळाल्यावर दांत ओंठ खात अपेश घेऊन आपल्या धन्याकडे लाजिरवाणे होऊन कांहीं दिवसांनीं गेले हें सांगावयास नकोच. याच हसननें पुढें फाजलचा खून करण्यांत यश मिळविलें हें इतिहासज्ञांस ठाऊकच आहे मात्र फैझी त्याच्या हातून मरावयाचा नव्हता म्हणून तसा योगायोग कधींच आला नाहीं. तथापि फाझलला मारल्यावर हसन तो मुलुख सोडून निघूनच गेला. कारण फाझलचा बळी घेण्याकरितांच त्याला अनेक वर्षें काढावीं लागलीं. पण ती गोष्ट स्वतंत्र आहे. ती आजच्या प्रस्तुत कथानकांत येऊं शकत नाहीं. प्रस्तुत कथानक सरासरी १६७० पासून १६८२ पर्यंतच्या दरम्यानचें आहे. आणि तेंही वेदसाधनाच्या पुरतेंच आहे. त्यामुळें या दहा बारा वर्षांच्या अवधींतील अनेक घडामोडींचा परामर्श घेतां आलेला नाहीं.

**अबदुल्लाखानानें** त्या तापसाला उचलून नेऊन एका निवांत स्थळीं ठेविलें आणि त्याला उपचार केले तापसी म्हणजे तो आपला फैझीच होय. आणि कारभारी-साहेबांचा जो हस्तक तोच तो फकीर. फकीरानें सांगितलेल्या गोष्टीचा फारच भयंकर परिणाम **फैझीच्या** कोमल मनावर व मेंदूवरही झाला. प्रत्यक्ष विद्यादात्या गुरूशीं कपटाचार केल्याचा त्याला पश्चात्ताप होत होता. तशांत आपल्या बापाला शत्रु-छळामुळें परागंदा व्हावें लागलें हें ऐकून तर त्यास अतिशयच वाईट वाटलें. शत्रुछलांतून आपल्या पित्याचें रक्षण करावयास बादशहा काय असमर्थ होता? अशा विचारानें **फैझीला** बादशहाचाही फार वीट आला. पण ईश्वरत्वाच्या संशोधनांत गर्क झालेल्या व ऐहिक जगास कंटाळलेल्या शेख मुबारिकानें बादशहास खरोखरच चकविलें होतें. त्यानें आपल्या मूळ गांवास नागोरास जातों म्हणून बादशहास सांगितलें आणि वैतागून तो कोठल्याकोठेंच निघून गेला. त्याच्याबरोबर त्याची बायकोहि गेली. **फाझलला** कित्येक दिवस ही वार्ता कळली नव्हती. पण जेव्हां ती बातमी कळली तेव्हां मात्र त्यानें आपल्याला एकांतांत कोंडून घेतलें, तो कित्येक दिवस बाहेर दिसलाच नाहीं.

फैझीच्या मनावरही तसाच परिणाम व्हावा यांत कांहीं नवल नाहीं. शेख मुबारिकाला देखील **हसननेंच** मारिलें असेल असें खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. त्यानें स्वहस्तांनीं तरी तें कृत्य केलें नसावें.

**अबदुल्लाखाना**बरोबर पुन्हा आग्र्याला यावयास फैझी कबूल नव्हता. **फैझीनें** सावध झाल्यावर आपलें सर्व मनोगत अबदुल्लाखानास सांगितलें होतें. पण शेख मुबा-रिकचा शोध बादशहांनीं चालविला असून लवकरच त्यांचा पत्ता लागावयाचा संभव आहे अशा कांहीं समाधानाच्या गोष्टी त्यानें फैझीला सांगून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. पुष्कळशा विचारानंतर **फैझी** अबदुल्लाखानाबरोबर आग्र्याला यावयाला कबूल झाला. अबदुल्लाखानाला वाटलें, आपल्या युक्तीला यश मिळालें. पण खरा प्रकार तर अगदींच निराळा होता. **फैझीचा** बेत आपल्या बापाप्रमाणेंच जगावर लाथ मारून यात्रेला जावयाचा होता. तथापि असल्या बादशहाच्या तोंडावर निर्भीडपणें त्याच्या अपकृत्याचा पाढा वाचून मग निघून जावें असें त्याच्या मनानें घेतलें आणि म्हणूनच तो अबदुल्लाखानाबरोबर आग्र्याला परत आला होता. परंतु अबदुल्लाखानाला याविषयीं कांहींच माहिती नव्हती.

आपण मनांत वांछिल्याप्रमाणेंच घडून आलें असतां होणारा आनंद कांहीं निरा-ळाच असतो. फैझी बादशहासमोर येऊन उभा राहिला पण त्याच्यासमोर तो मुळींच वांकला नाहीं. बादशहाच्या आनंदावर थोडेंसें विरजण पडलें. **फैझीची** गांठ रात्री-च्या एकांत समयींच पडावी अशी इच्छा **अकबराची** होती. तो आपल्याला भेटण्या-पूर्वी दुसऱ्या कोणाच्याच नजरेस पडूं नये अशी त्याची इच्छा होती. **शेख भावन व बादशहा** यांचें याविषयीं पूर्वीं बोलणेंही झालें होतें. त्या आपल्या हेतूप्रमाणें अबदुल्ला-खानानें फैझीला योग्य वेळींच आणलें म्हणून बादशहा फार खूष झाला. तथापि प्रथम

दर्शनींच त्यानें संबंध आयुष्यांत पूर्वी कधींहि न केलेला असा अपमान आज केलेला पाहून बादशहाला वाईट वाटलें. तथापि तो फार शहाणा होता. दुसऱ्याची मनःस्थिती पारखणारा तो राजा होता. त्याच्या बापाच्या बाबतींत आपल्या हातून अन्याय घडला अशी त्याची भावना झाली असल्यास त्याला राग येणें साहजिक होतें हें जाणून त्यानें त्यास बसावयास सांगितलें. तथापि तो बसला नाहीं. फैझी वेदविद्या शिकून पारंगत होऊन आल्यामुळें आतां आपली आजपर्यंतची इच्छा सफल होणार अशा कल्पनेनें त्याला धन्यता वाटत होती. पण खरा प्रकार काय होता ?

खरा प्रकार कांहींही असो, पण **फैझीची** शरीरयष्टि लटलटां हालत होती. त्याला अत्यंत कोप आला असावा असें बादशहाला वाटूं लागलें. त्याचे डोळे मोठे मोठे होत जाऊन ते वटारल्यासारखे दिसूं लागले. त्याचा उजवा हात वरवर वर उचलला जाऊं लागला. तो आपली मान वांकविण्याचा प्रयत्न करीत असावा असें वाटूं लागलें. **अकबर** बादशहा हा प्रकार स्तिमित नेत्रांनीं पहात होता. पण इतक्यांत धाड्कन् फैझीचें शरीर कोसळलें आणि त्याचें मस्तक **अकबराच्या** पायापाशीं पडलें !

* * * *

त्याच रात्रीं शेख भावनाच्या बिन्हाडीं पुढें जी धर्मसभा होणार होती त्या विषयींचे बेत चालले होते. शेख भावन, बदाउनी, शिरहिंदी व एक पाद्री इतकी मंडळी त्या ठिकाणीं जमलेली होती.

" पण **फैझी** इतक्यांत यावयाचा आहे असें म्हणतात, ती गोष्ट खरी आहे काय ? "

" खरी असेल किंवा नसेल, आपणाला काय त्याचें ?" शेखभावननीं बदाउनीच्या प्रश्नास उत्तर दिलें. " त्याला वेदसाधनासाठीं पाठविला होता ना ?"

" कोणी पाठविला ? "

" सम्राटांनीं. "

" तसले लपंडाव आम्हांला नकोत." **शिरहिंदी** म्हणाले. " आपण मठपति असतांना बादशहाच्या कारस्थानांत आपण सामील होतां ना ?"

" बरं तसंही समजा. पण त्यांत वाईट काय झालं ? आतां हिंदूंचे चारी वेद तुमच्या हातांत येऊन पडतील ते ?"

" हो वाईटांतून तेवढं एक चांगलं होईल. पण वेदविद्या संपादन करून तरी फैझी येतो आहे ना ?"

" फैझीविषयीं तुमच्या मनांत अशी शंका कां यावी ? तो बुद्धिमान् शिष्य नाहीं काय ?"

" अहो पण, जगांत असे कांहीं विषय आहेत कीं, त्या ठिकाणीं बुद्धिवानांची बुद्धि मंदावते ! " डोळे मिचकावीत बदाउनी म्हणाले.

" म्हणजे काय ? मी नाहीं समजलों." शेख भावननीं म्हटलें.

" तें आम्हाला सारें समजतें. तुम्हांला ठाऊक असून तुम्ही न कळल्याचें सोंग उत्तम आणतां. बादशहाच्या विश्वासांतले तुम्ही; आणि तुम्हांला या गोष्टी ठाऊक नसाव्यात म्हणजे आश्चर्यच आहे."

" माझी अशी समजूत आहे कीं इतकीं वर्षें काशीक्षेत्रांत राहिला तो नुसता हात हालवीत परत येण्याकरितां नव्हे. वेदविद्या संपादन करून तो तयार झालाच असेल."

" काय ? **फैझी** आले वेद पढून ?" **पाद्रींनीं** विचारलें.

" हो. **पाद्री**साहेब ! फैझीनीं वेदविद्या संपादिली अशी बातमी हे सांगतात. मलाहि तसेंच वाटतें. आणि तशी गोष्ट खरीखुरीच घडली असेल तर आतां तुम्हाला देखील वेद इंग्रजींत व इतर युरोपच्या भाषांत लिहावयाची सुसंधि मिळणार आहे."

" आः ! उत्तम ! " पाद्री आनंदून उद्गारले. " मी आशा करतों कीं तशी गोष्ट घडते ! "

" घडेल, घडेल ! " शेख भावन म्हणाले.

**शिरहिंदी** आणि बदाउनी बुचकळ्यांत पडले होते. वेदविद्या आपल्या हातांत यावी अशी त्यांची इच्छा बादशहाच्या इच्छेइतकीच तीव्र होती. पण तें कार्य साध्य केल्याचें यश फैझीला मिळूं नये असें त्या सर्वांस रात्रंदिवस वाटत होतें. ते अजमास काढण्याकरितां शेख भावनच्याकडे मुद्दाम आले होते. पण शेख भावन कसला खमंग, तो त्यांस मुळींच दाद लागूं देईना. ते उठून जाण्याच्या बेतांत आहेतसें पाहून सहज शेख भावननीं त्यांस विचारलें.

" समजा कीं, फैझी वेदविद्या संपादन करून आला असला, तर तुम्हाला कसें वाटेल ? बरें वाटेल कीं वाईट ? "

चमत्कारिकच प्रश्न ! काय उत्तर द्यावें हें त्या दोघांसही सुचेना. ते जरासे घुटमळलेच. पण प्रसंगावधानानें बदाउनी म्हणाले.

" केव्हांही बरेंच वाटेल. पण आपण असा प्रश्न कां करावा बरें ? "

" माझ्या प्रश्नानें आपणाला वाईट वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. पण आपणाला कोणत्या कारणांस्तव बरें वाटेल हें सांगाल काय ? "

" कारणें कसलीं ? वेदविद्येंत काय आहे हें पहावयास सांपडेल ना ? "

" वेदविद्येंत काय आहे हें पहावयास मिळेल. पण त्या वेदांतील विचारांची इतर धर्मांतील विचारांशीं तुलना करावयाला सांपडणार हा नाहीं कां आणखी एक मोठा फायदा ? "

" तो तर आहेच " दोघेही म्हणाले. त्यांना तीच कल्पना पटली होती. पण ती ते बोलून दाखवावयास तयार नव्हते. पण त्यांचें मनोगत **शेख भावननें** बाहेर काढलें.

" वेदांतलि उच्च विचार तुम्ही कोणत्याही धर्मातील विचारांशीं ताडून पाहिलेत, तरी ते यत्किंचित्‌ही कमी ठरणार नाहींत. कांकणभर सरसच ठरतील. पण धर्माधर्मांची तुलना करून अमुक धर्म श्रेष्ठ आणि अमुक धर्म कनिष्ठ असें ठरविण्याचा प्रयत्न करणें हेंच मुळीं चुकीचें आहे. सर्व धर्म खरे आहेत. सर्व धर्म श्रेष्ठ आहेत. सर्व धर्मांचीं मूलतत्वें उदात्तच आहेत. ज्या ज्या कालीं जो जो धर्मप्रवर्तक झाला, त्या त्या कालच्या परिस्थितीस अनुसरून त्याला कांहीं नियम करणें व आचार रूढ करणें योग्य वाटलें असलें, तरी उदात्त तत्वें कायम ठेवून, आचारांत परिस्थित्यनुरूप फरक करणें इष्ट आहे. ही सारी गोष्ट आपल्या अनुयायांस कित्येक शतकानंतर कळणार नाहीं असें जर त्या त्या आद्य धर्मप्रवर्तकांस वाटलें असतें, तर त्यांनीं तसाही एक मोठ्या ठळक अक्षरांचा नियम अगदीं आरंभीं पहिल्याच सुरवातीस घालून ठेवला असता. पण—" आपण जवळजवळ व्याख्यान दिल्यासारखेंच बोलत चाललों आहोंत हें ओळखून आपल्या भाषणाचा ओघ बदलून पुनरपि मुद्द्यावर येण्यासाठीं **शेखभावन** म्हणाले, " पण आजचें कालमान पाहिल्यास मला तर असें वाटतें कीं, **फैझीला** वेदविद्या संपादन करणें फार कठीण गेलें असेल, कदाचित् वेद त्याला साध्य झालेही नसतील—"

" बोला–ना ? असें थांबलांत कां ? " शिरहिंदीनें विचारलें.

" कशाला ? बोला कशाला ? माझे विचार तुम्हांला पटत नाहींत, हें तुमच्या मुद्रेवरून मला स्पष्ट समजत असतां, उगीच बोला कशाला ? "

" हें आपण भलतेंच विधान करतां आहांत. धर्माधर्मांची तुलना करण्याचा प्रयत्न जर आपणाला पसंत नसेल, तर त्याबद्दल तुम्हीं आम्हांला दूषण देणें योग्य नाहीं. त्याबद्दल तुम्ही बादशहालाच जबाबदार धरावयास नको काय ? दुसरी गोष्ट या तुलनेंत व धर्मसभेच्या वाद विवादांत तुम्ही स्वतःच भाग घेत नाहीं काय ? " बदाउनीनें विचारलें.

" आणि तिसरी गोष्ट—" शिरहिंदी म्हणाले, " कांहीं जुन्या पोथ्या अप्रत्यक्षपणें तुमच्याच हस्तकांकडून आम्हांस मिळाल्या ना ? "

" होय, पण माझ्यावरून तुम्ही हिंदुधर्माची परीक्षा करूं नये. मी खरा हिंदु असतों, तर परधर्मांत कशाला शिरलों असतों ? आतां बादशहाच्या धर्मसभेंत जो मी भाग घेतों, तो इतराप्रमाणें आपलाच धर्म श्रेष्ठ धरावा अशा अनुदार भावनेनें नव्हे. तर बादशहाचा जो उच्च हेतू या गोष्टीच्या मुळाशीं आहे तो मलाही पटलेला आहे म्हणून घेतों. मी हिंदु होतों, आतां मुसलमान आहे. उद्यां यहुदी, पारशी, किंवा ख्रिश्चन नाहींतर बौद्ध होईन. पण इतक्यांही धर्मांत फिरलों तरी हिंदीच राहीन. हिन्दुस्थानचे आपण रहिवासी झालों आहोंत. हिंदमाता ही आपणां सर्वांची माता आहे. आपणां सर्वांना एकत्र रहावयाचें आहे, तर सर्वांना सलोख्यानें रहातां येईल अशी समानभूमिका आपणांला निर्माण केली पाहिजे. बादशहाचाही हाच हेतू आहे. बारीक सारीक आंगें–उपांगें पाहिल्यास तीं कुठल्या धर्मांत नाहींत ? भुतेंखेतें आणि विलक्षण समजुती सर्व धर्मांत

कमीजास्त प्रमाणांत आहेतच. शेख सेलीम चिस्ती आणि बादशहा यांचा संबंध आपणांला ठाऊक असेलच. "

" काय. काय तो ? " पाद्रीसाहेब मध्येंच म्हणाले.

" आहे कांहीं. " बदाउनी म्हणाले. पाद्रीसाहेबांना वाईट वाटलें.

" कशाला चोरून ठेवायला पाहिजे ? " शेख भावन म्हणाले; " टाळाटाळीनें शंका दुणावतात. हें पहा पाद्रीसाहेब, अकबर बादशहांना पुष्कळ दिवस पुत्रसंतान होईना. तेव्हां त्यांनीं शेख सेलीम चिस्ती यांचेकडे जाऊन उपाय विचारला. सेलीम चिस्ती हे एक अवालिया महंत आहेत. त्यांनीं बादशहाला कांहीं सेवा सपत्नीक करावयास सांगितली. आपल्या गुरुसंनिध राहून सम्राट्-सम्राज्ञीनें मनोभावानें शुद्धांतःकरणानें सांगितल्याप्रमाणें सेवा केल्यावर युवराज सेलीम जन्माला आले. अर्थात् आतां शेख सेलीम सम्राटांना अत्यंत पूज्य वाटतात. हा भावनेचा प्रश्न आहे. बादशहा कांहीं वेडसर नाहींत. म्हणूनच बादशहांनीं आपल्या सर्व प्रजेला संमत होईल अशी सर्व धर्मांचीं समान धर्मतत्वें काढून दीनेइलाही धर्माचा पाया रचला आहे. आणि आतां मी आपणां सर्वांना स्पष्टच सांगतों कीं मी बादशहाचा—म्हणजे दीनेइलाही धर्माचा अनुयायी आहें. पण आमचे कांहीं विद्वान् लोक आपापल्या पक्षाचा दुरभिमान धरून बहुमत करण्यासाठीं परदेशाहून देखील लोकांना बोलावीत आहेत. "

आतां मात्र **शिरहिंदी** व **बदाउनी** जावयास उठलेच. कारण शेवटचा टोमणा बाणासारखा त्यांच्या मर्मीं बसला. फैझी येणार अशी वदंता उठतांच या मुत्सद्दीमंडळीनें इराण, अरबस्तान, काबूल कंदाहारकडून निवडक विद्वानांस आमंत्रण करून धर्मसभेस हजर राहण्यासाठीं बोलाविलें होतें व त्याप्रमाणें कांहीं लोक येऊन ठेपले होते व कांहीं यावयाचे होते. मिळून यानंतर होणाऱ्या धर्मसभेस फारच निराळें स्वरूप यावयाचें होतें.

❀ * * ❀

कांहीं उपचार केल्यानंतर **फैझी** शुद्धीवर आला आणि त्यानें खरोखरीच बादशहाचे पाय धरले. त्यानें पहिल्याच वाक्यांत सांगून टाकलें कीं, ' मी अपराधी आहें. मला यात्रेला जाण्यास परवानगी द्यावी. "

" पण असें वाटण्याचें कारण काय ? " बादशहानें विचारलें.

" आपण मला वेदसाधन करण्यासाठीं पाठविलें. "

" बरें मग ? "

" तें मी केलें ! "

" वः ! मग आणखी काय पाहिजे ? याच्यासारखी खुषीची बात दुसरी कोणती आहे ? "

" पण माझें बोलणें संपलें नव्हतें. " फैझी म्हणाला, " मी वेदसाधन केलें पण तें गमावलें ! "

" असें कसें होईल ? "

यावर फैझीनें मागील सर्व इतिहास—दिल्लीहून निघून काशीस गेल्यापासून तों यावेळपर्यंतचा-सांगितला.

" तर मग तुम्हांला त्या चारी वेदांची विशेषतः ऋग्वेदाची माहिती झाली आहे ना ? "

" मला झाली असली तरी मी गुरुजींला वचन देऊन चुकलों ना ? "

" काय वचन दिलें ? "

" कीं मी ही विद्या कोणालाच सांगणार नाहीं म्हणून ! "

" धिःकार असो तुझ्या विद्येला आणि जिण्याला. आज इतकीं वर्षें मी ज्या आशेवर राहिलों ती माझी आशा, माझी महत्त्वाकांक्षा तूं धुळीला मिळविलीस ! जा. तोंड नकोस दाखवूं. " बादशहा वैतागानें म्हणाला.

" आणि मी तरी दुसरें काय मागतों आहें ? आपण एवढेंच मला सांगावें अशी माझी इच्छा होती. गुरुदेवांशीं कपटाचरण मला तुमच्याच सांगण्यावरून करावें लागलें. त्याचें प्रायश्चित्त मला भोगावयाचें आहे. त्याशिवाय माझ्या जिवाला चैन पडणार नाहीं."

हे शब्द ऐकून बादशहाला मोठा पेंच पडला. **फैझीनें** वेदसाधन केलें आहे, ही गोष्ट तर खरीच होती. तेव्हां आतांच घाई न करतां वेळ येईल तसें वागण्याचा पोक्त विचार बादशहानें केला. वेदविद्येला आधार असा फैझी आपल्यापासून दूर न घालवणेंच योग्य असें त्यास वाटलें. त्याला जवळ ठेवल्यानेंच होईल तितका आपला कार्यभाग साधून घ्यावा असा त्याचा विचार ठरला. पण फैझी राहण्यास कबूल नव्हता. मुबारिकनें जातांना आपल्या दोन्हीं मुलांना आसरा देण्याविषयींची विनंति बादशहाला पत्रिकाद्वारें केली होती. फैझीची अनेक प्रकारें समजूत आणि मनधरणी बादशहानें केली. बादशहाचा या कपटाचरणाच्या मुळाशीं कोणता उदात्त हेतू होता हें फैझीला माहीत होतें. ज्याचा हेतू उदात्त तें आचरण हीन मानतां येणार नाहीं. तेव्हां फैझीनें मोठ्या मुष्किलीनें सम्राटाच्या इच्छेस आपली अनुमति दिली. त्या दोघांचें बोलणें चाललें असतां पहाटचा वेळ झाला होता आणि इतक्यांत नौबदही झडूं लागली होती. ही नौबद झडलेली ऐकतांच फैझीला आनंद झाला व तो तल्लीन झालेला दिसूं लागला. त्यांनीं खिडकींतून बाहेर पाहिलें, तो पहाटेस स्नान करून राणी जोधबाई श्रीकृष्णमंदिरांत पूजेस चालली होती. जोधबाई मुसलमान बादशहाची हिंदु राणी होती. तथापि तिला आपल्या धर्मानुसार वागण्याची पूर्ण मोकळीक होती. तिच्यासाठीं तिच्या आराध्य दैवताचें-श्रीकृष्णाचें सुंदर मंदिर उभाण्यांत आलें होतें. याठिकाणीं ती रोज प्रातःकाळीं पूजनास जात असे. तिला भाविक अंतःकरणानें पूजेला जात असलेली पाहून तिच्याकडे पहाणाऱ्या या दोघांच्या मनांत अनेक धर्मविषयक विचार येत होते.

तोंच पुढील मधुरालाप बादशहाच्या कानीं आले—

**बेनी बेनी मृगनयनीकी अंग ते कंचन, खंवपर नागन कागन काली** ॥ बेनी० ॥ **गरहपर कपोत वारू, नयनपर सावग सारू, नासिकापर करिवारू, दसन चोंप उजारी** ॥ बेनी० ॥

चांदखान या ढंगदार गवय्याचे कंठांतून निघालेले हे आलाप होते. पण ते सूर संपतांच बादशहाचे कानीं आणखी एका गाण्याचे सूर आले—

[ टोडी—धृपद ]

**शुभकर चंद्रवदनी मृगलोचनी, हंस गमनी चली पूजन महादेव** ॥ शुभ० ॥ **करलिये अग्रथाल फुलनको गुथे हार, एक पाये पूजा करे संग ज्युगतसे** ॥ **कहत मिया तानसेन सुनो महादेव, दीजे मोकु ग्यान अटल दान** ॥ शुभ० ॥

हें पद तानसेनाच्या कंठांतून निघालेलें होतें. पण या गायनांचा परिणाम अगदीं निराळाच झाला. पूजा करावयास निघालेली राणी आणि तिच्याकडे दुरून न्याहळणारा बादशहा या दोघांचीही अंतर्वृत्ति या दुसऱ्या गायनाच्या श्रवणानें सारखीच प्रसन्न आणि प्रफुल्लित झाली. हें गाणें प्रासादिक होतें तसेंच समयोचित म्हणून प्रासंगिकही होतें.

कांहीं वेळानें अकबर आणि फैझी या दोघांमध्यें गुप्त बोलणें पुनः सुरू झालें. फैझीची इच्छा अकबरशाहाच्या पदरीं न राहतां निघून जाण्याची होती. तथापि त्यावेळीं तो फक्त बादशहाचें बोलणें संथपणें ऐकून घेत होता. बोलणें ऐकून घ्यावयास कोणती हरकत? आपणास काय करावयाचें तें आपण करणारच, असाच कदाचित् त्याच्या मनाचा इरादा असावा. पण त्या दोघांचा शेवटीं समेट होऊन तावडतोब कार्यास हात घालावयाचें टरलें. तें कार्य कोणतें?

———

# प्रकरण तेहतिसावें

## कोण बरें या दोन व्यक्ती ?

बाकीच्या गोष्टी तात्काल घडून येण्यासारख्या नाहींत तर नाहींत. निदान भगवद्गीतेचें भाषांतर ताबडतोब करून घ्यावयास हरकत नाहीं; असें बादशहानें ठरविलें. भगवद्गीता हा ग्रंथ फैझीला मुखोद्गत झालेला होता. आपल्या स्मरणांतून त्यानें तो उतरून काढण्याचें ठरविलें. त्या ग्रंथाचें महत्व अकबरास ठाऊक होतें. पण फैझकिडून त्याला त्याचें महत्त्व विशेषच कळून आलें. ऋग्वेदाचें आतां आपणास अक्षरही फैझीकडून निदान सध्यां तरी लाभत नाहीं याविषयीं बादशाची खात्री होऊन गेली होती. तेव्हां हातास लागेल तेवढें तरी साधून घ्यावें अशा इरायानें भगवद्गीता पदरांत घ्यावयास बादशहा तयार झाला.

फैझीला देखील आपली प्रतिज्ञा न मोडतां बादशहाच्या ऋणांतून मोकळें होतां येत आहे याबद्दल आनंद वाटला. वास्तविक पहांता भगवद्गीता हा ग्रंथ हिंदूंना वेदाइतकाच पूज्य व प्रिय आहे, वेदांचा सर्वांसच अर्थ कळतो असें नाहीं पण साधारण संस्कृत शिकलेल्या त्यावेळच्या शिक्षितांस भगवद्गीता समजत असे. भगवद्गीता हें हिंदूंचें तत्वज्ञान आहे. भगवद्गीता हा ग्रंथ म्हणजे हिंदूंच्या सर्व धर्मग्रंथांचें सार आहे. भगवद्गीता म्हणजे हिंदुधर्माचा आधारभूत ग्रंथ आहे व तो हिंदुमात्राला परमेश्वराइतकाच प्यार आहे. फैझी देखील हें भगवद्गीतेचें महत्व बादशाहास पटवून देऊं लागला आणि भगवद्गीताही कागदावर उतरूं लागली. उतरून झालेला भाग अकबर बादशहा, जितका होईल तितका वाचून व अर्थ करून घेत असे. एकेक अध्याय चालूं लागला तसतसा अकबर अधिकाधिक प्रसन्न होत चालला. बादशहानें जेव्हां गीता समजून घेत घेत पंधरावा अध्याय पुरा केला, तेव्हां तर त्याला वेदांचें वेडच लागलें. त्याच्या मनानें पुन्हा उचल खाल्ली. वेद-विशेषतः ऋग्वेद आपणांस पुन्हां साध्य होणें शक्य होणार नाहीं काय ? असा प्रश्न तो आपल्या मनास वारंवार विचारूं लागला. **फैझीकडे** आतां त्याविषयीं गोष्ट काढणें तर व्यर्थच होतें. त्याला हिंदुधर्माच्या आदिग्रंथाचें महत्त्व पटलें. तसेंच हिंदुधर्माचेंहि महत्त्व पटलें. आणि तें कां पटलें, तर इतर धर्मांतल्याप्रमाणें हिंदुधर्माच्या आद्यग्रंथांत इतर धर्मास तुच्छ लेखण्यांत आलेलें नव्हतें. इतका उदारपणा, इतकी सहिष्णुता त्यास इतर धर्मांत आढळून आली नाहीं. उच्च तत्त्वज्ञानाच्या जोडीला औदार्य, आत्मौपम्य आणि सहिष्णुता हीं देखील हिंदुधर्मांत असल्यामुळें **अकबर**बादशहाच्या तत्वजिज्ञासू आणि न्यायीबुद्धीला हिंदुधर्माचें महत्त्व समजून आलें.

ऋग्वेदाशिवाय इतर ग्रंथ **फैझीच्या** सहाय्यानें बादशहास फारशी भाषेंत उत-

रून घ्यावयाचें होतें. यासाठीं **फैझीला** कोणत्या ना कोणत्या मिषानें आपल्याकडे ठेवून घ्यावयाचा अकबराचा बेत होता. फैझी तर रहावयास बिलकूल तयार नव्हता. त्यामुळें अकबर त्याला अधिकाधिक जपूं लागला. त्याचें मन आपल्या दरबारांत कसें रमेल, आपण अनुदार असल्याबद्दल त्याची झालेली कल्पना कशी निर्मूल होईल, आपल्याविषयीं त्याची आदरबुद्धि कशी वाढेल, व तो आपल्याबरोबर कसा कायम राहील, याबद्दल त्याचे प्रयत्न सुरू झाले. **अकबर** अशा हेतूनें त्याचा मानमरातब वाढवूं लागला.

पण या गोष्टीचा उलटाच परिणाम **फैझीचें** अनिष्ट चिंतणाऱ्या मुत्सद्दी-मंडळावर झाला. फैझीवर सोंपविलेली कामगिरी न साधतां तो हात हालवीत आल्या-मुळें त्याच्यावर बादशहाची इतराजी होणार असा त्यांचा स्वाभाविक कयास होता. त्याच धोरणानें त्यांनीं मिळेल त्या संधीचा फायदा घेऊन फैझीविरुद्ध बादशहाचें मन कलुषित करण्याचा त्यांचा प्रयत्न सारखा चालू ठेविला होता. ते मुत्सद्दी होते खरे, पण अकबर बादशहा मुत्सद्द्यांचाही मुत्सद्दी होता. तो कानपिसा राजा नव्हता. ज्याच्या-वर ज्यावेळीं मर्जी असेल, त्यावेळीं तो सांगेल तें खरें मानणारा एककल्ली लहरी राजा अकबर बादशहा नव्हता. बादशहाला बदसल्ला देणाराला तर वाटावें कीं, आपल्या सांग-ण्याचा, आपल्या कान मंत्राचा परिणाम बादशहावर झाला आहे. पण बादशहानें त्याच्या मनाचा ठाव घेऊन ज्या त्या माणसाची खरी योग्यता पारखून खऱ्या वस्तु स्थितीचा तलास लावावा आणि पडताळा घेऊन आपल्या मनाची खात्री करून घेऊन स्वस्थ बसावें. अकबर बादशहाचें मन अशाप्रकारें महासागरासारखें गंभीर आणि अथांग होतें. त्याचा थांग लागणें अशक्य होतें.

वाढ दिवसाचा तुळाभार वगैरे मंगलसमारंभ पार पडल्यावर योग्य इसमास बक्षिसें, बढत्या वगैरे देण्यांत यावयाच्या होत्या. त्यांचा विचार चालू असतां अनुकूल संधि पाहून शिरहिंदीनें काबुली पठाणांना बंधमुक्त करण्याच्या प्रश्नाची बादशहाकडे हळूच कावेबाजी युक्तीनें सुनावणी केली ही गोष्ट मागें सांगितलीच आहे.

बादशहानें ती गोष्ट ऐकून घेऊन तो थोडा वेळ आपल्या बसण्याच्या जागीं गेला. त्यानें एका शरीर रक्षकास फक्त आपल्याबरोबर घेतलें होतें. दरवाजा बंद करून घेतल्यावर अकबरानें शरीररक्षकास बुरखा घ्यावयास सांगितलें. त्यानें त्याप्रमाणें केल्यावर **अकबरानें** उजव्या पायाच्या आंगठ्यानें एका विवक्षितजागीं दाबलें. त्याबरोबर खालीं उतरण्यास चांगला जिना झाला. त्या जिन्यांतून त्यानें आपल्या शरीर रक्षकास आपल्या मागोमाग यावयास सांगितलें. दोघेहि खालीं उतरल्यावर जिन्याच्या शेवटच्या पायरीशींच त्यास रहावयास सांगून व त्याच्या कानांत आणखी कांहीं सांगून बादशहा शेजारच्या दालनांत गेला. तों त्याठिकाणीं त्याला एका इसमानें लष्करी थाटाचा कुर्निसात केला !

" झट्कन् बोल—काय बातमी आहे ती " बादशहा एका आसनावर बसून म्हणाले.

त्या इसमानें एक लिफाफा काढून बादशहासमोर ठेवला.

त्याच्यावरून नजर फिरविल्यावर बादशहा आस्ते आस्ते अधिकाधिक साचेंत झालेला दिसला. वाढदिवसाचा त्याचा सगळा दिवस अत्यानंदांत गेला होता. पण आतां मात्र फार वाईट बातमी त्याला मिळाली. पण तो कोणत्याही प्रसंगानें डगमगणारा नव्हता.

" बिकानेरची फौज **प्रतापसिंहाच्या** मदतीला निघाली कीं काय?" बादशहानें विचारलें.

" अद्याप निघाली नसावी, पण निघण्याच्या तयारींत आहे."

" राज-**सुरजन** काल किंवा आज इथें येऊन पोंचावयाचे होते. तें अद्याप कसें नाहीं आले ?"

" उद्यां-किंवा फार तर परवां येतील. कामगिरी फत्ते झालीच, पण बिकानेरच्या सैन्याच्या तलासावर ते मागें राहिले आहेत. मला मुद्दाम पुढें पाठविला."

" आमची फौज जाऊन तिनें प्रतापावर अद्याप नवा हल्ला केला नाहीं तर अझून-अं ?"

"नाहीं. तें सैन्य सावकाश-सावकाश चाललें आहे असें वाटतें ?"

" कां बरें ?"

" कुणास ठाऊक ?"

" कोणी फितूर तर नाहीं ?"

" तसाच प्रकार बहुधा असेल."

" बरें जा. तूं आतां रात्रौ मला भेट."

तो इसम निघून गेला. बादशहाच्या हातांत दोन कागद होते. पैकीं एक **सुरजननें** पाठविलेलें पत्र व दुसरा कागद म्हणजे बिकानेरहून उदेपुरास गेलेल्या पत्राची नक्कल होती; बिकानेरचा **पृथ्वीराज** हा आंतून **प्रतापसिंहाला** सामील होऊं लागला होता. आतांपर्यंत असें होत होतें कीं एखादा रजपूत वीर प्रतापसिंहाला अनुकूल व्हावा, कांहीं दिवसांनीं तें वर्तमान बादशहास कळावें आणि त्याच्यावर बादशाही सैन्याची संक्रांत पडावी आणि प्रतापसिंह पुन्हा एकटा उघडा पडावा ! एकंदरींत प्रतापसिंहाचे ग्रहच अनिष्ट असल्यास त्याला कोण काय करणार ? त्याची स्वातंत्र्याची धडपड चाललीच होती.

आरंभीं प्रतापचा भाऊ सागरजी मोंगलांस मिळाला. नंतर त्याचा दुसरा भाऊ **शक्तिसिंह** हाही अकबराच्या बाजूस सरला ! त्याचा वडीलभाऊ **जगमल** हा मात्र मोंगलास मिळाला नव्हता. पण त्याला मिळवून घेण्याचे प्रयत्न दिल्ली दरबारकडून सारखे चालू होते. वास्तविकपणें पाहतां मोंगलांच्या बाजूस जावयास जगमलला महत्वाचें कारण होतें. कारण उदेसिंहाच्या मागून गादीवर त्याचा हक्क असता लोकांनीं प्रतापाला तक्तनशीन केलें होतें. तरी पण हा स्वाभिमानी पुरुष अकबराच्या बाजूस वळला नाहींच.

मनांत पक्का स्वाभिमान असूनहि उघडपणें प्रतापास स्वातंत्र्ययुद्धांत मदत करावयास ज्यांना कोणत्या ना कोणत्या कारणामुळें शक्य झालें नाहीं, अशांचा एक वर्गच पाडतां येण्यासारखा आहे. **अकबराशीं** उघड शत्रुत्व केल्यास आपला चुराडा होईल अशी भीति हें त्यांपैकीं एक प्रमुख कारण गणावयास मुळींच हरकत नाहीं. हा वर्ग तटस्थ राहिला होता. मारवाडचा **चंद्रसेन** हा एक या तटस्थ वर्गांतला म्हणजे जगमल सारखाच होता.

तो हेर गेल्यावर अकबर गेल्या वाटेनें पुन्हा वर आला. त्या ठिकाणीं **शेख-फाजल** येऊन तयार होताच. कारण त्याला आगाऊ सूचना मिळाली होती. फाझलाशीं अकबरबादशहाचें बरेंच बोलणें झालें. वेळ थोडा होता व कांहीं प्रश्नांचा तडकाफडकी निकाल करावयाचा होता. थोड्याशा गोष्टीचा परिणामी जरा कुठें चुकलें तर मोठा अनर्थ होतो. काबुली पठाणांस सोडून द्यावें कीं, देऊं नये या प्रश्नाचा निर्णय बादशहाला लगोलग करावयाचा होता. या घटकेपर्यंत त्याचें मत पठाणांचा शिरच्छेद करावयाचा असेंच होतें. शिरच्छेदच करावयाचा तर त्याला कांहीं आज घाई नव्हती. पण त्यांना सोडून द्यावयाचें असल्यास मात्र तें आजच करणें योग्य व प्रासंगिक व म्हणून परिणामकारक ठरणारें होतें. शिरहिंदीनें प्रश्न पुढें केला असला तरी तो केवळ निमित्तमात्र होता. अकबराच्या मनांत तो प्रश्न सारखा घोळत राहिला होता. त्याला कोणी आठवण करण्याची जरूरीच नव्हती.

**राज-सुरजन** हा एक सामान्य अधिकारी होता. पण आतां त्यानें गोंडवणांतील गड-कंटक काबीज करून तो सारामुलूख अकबरच्या अमलाखालीं आणला. हें वर्तमान आनंददायक होतें. राजसुरजन **अकबराचा** अंकित असला, तरी हिंदुधर्माचा खरा अनुयायी होता. शिवाय त्याच्या आंगची शिस्त वाखाणण्यासारखी होती. अकबराला पुष्कळ धोरणें सांभाळावयाची होतीं. काश्मीर पायाखालीं ओढावयाचा तर आपल्या दूरच्या नातलगास दुखवणें योग्य नव्हतें. कारण तो काबुलांत सत्ताधारी होता. अर्थात् त्याच्या हेरांस ठार केल्यास तो एक नवा शत्रु उत्पन्न केल्यासारखें होत होतें. इकडे तर प्रताप हटत नव्हता. तेव्हां अशाप्रसंगीं जपूनच वागलें पाहिजे हें त्यानें जाणलें. आपण रजपुतांशीं शरीरसंबंध जुळविल्यामुळें आपला एकपरी कावा साधला असला तरी त्यामुळें आपणाला गुप्त शत्रु बरेच उत्पन्न झाले आहेत हें त्याच्या दूरदर्शी नजरेंत आल्याशिवाय राहिलें नव्हतें. शिवाय आपल्या राजकीय धोरणामुळें आकुंचित बुद्धीचे मुसलमान दिवसें दिवस आपणावर असंतुष्ट होत चालले आहेत हेंही तो जाणून होता. त्यामुळें त्यानें आपला निश्चय पोक्त विचार करून कायम केला.

थोड्या वेळानें बादशहाची स्वारी बाहेर आली आणि सिंहासनावर विराजमान झाली. शिरहिंदीची नजर बादशहाच्या मुखाकडे लागली होती. त्याचे मित्रही त्याच्या सुनावणीचा परिणाम काय होतो तें ऐकावयास उत्सुक झाले होते आदमखानांची मूळ कल्पना **शिरहिंदी** अमलांत आणावयास सरसावले. तेव्हां ठराविक वेळीं एकंदर

कारस्थानाचा परिपाक काय होतो हें ऐकावयास त्या पक्षांचे मुत्सद्दी अधीर झालें होतें. कारण **अकबरानें** पठाणांस ठार करावयाचा निकाल दिल्यास त्याचा परिणाम अकबरास कधीं भोगावयास लागेल तो लागेल; पण तत्पूर्वी या पक्षाच्या पुढाऱ्यांवर काबूलवाल्याचा रोष होणार होता. त्यासाठीं त्यांच्या मनांत सारखी धाकधूक होत होती.

शेवटीं योग्य वेळीं दरबारांत जाहीर पुकारणी होऊन त्यांत **राज सुरजन** यांस बनारसच्या सुभ्याचा सुभेदार केल्याचें व काबूलच्या पठाणांस जीवदान देऊन त्यांस पोषाख देऊन बहुमनानें परत पाठविण्याचें घोषित करण्यांत आलें. बादशहाच्या औदार्याचें व राजकारण कुशलतेचें सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. शिरहिंदीच्या मुखावर ऐट दिसूं लागली. आदमखान कुऱ्यांत बसून इकडे तिकडे पाहूं लागला. मुसलमान सभासदांस आनंद झाला. तसाच हिंदु उमरावांसही आनंद झाला.

हर्षातिरेकाच्या भरांत तो आनंदाचा दिवस निघून गेला. एका व्यक्तीस आजच्या दिवशीं दुःख झालें होतें, व दुसरी एक व्यक्ती सुखदुःखातीत होती ! कोण बरें या दोन व्यक्ती ?

# प्रकरण चौतिसावें.

## तिकडे जायची वेळ झाली !

हर्ष–शोक, सुख–दुःख वगैरे द्वंद्वांपासून मुक्त असणारी व्यक्ति परमहंस योगीकोटींतीलच असावयाची. तत्त्वज्ञानी **फैझी** ही ती व्यक्ति होय. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांत परमानंद होत असल्यामुळें व निराश झालेल्या बादशहास थोडें फार सुखी करून त्याच्या मनास समाधान द्यावें अशा उद्देशानें **फैझीनें** गीता वगैरे हिंदु धर्मग्रंथ फारशींत उतरण्याचें काम चालविलें होतें. त्याची योग्यता बादशहा जाणून होता.

काबुली पठाणांस बंधमुक्त करून बहुमानपूर्वक त्यांची रवानगी केल्यामुळें त्यांच्याही मनावर **अकबराच्या** थोर वागणुकीचा अनुकूल परिणाम झाला. पण इकडे शिरहिंदी व आदमखान हे दोघेही आपल्याच पाठी थोपटून घेऊं लागले होते. आपलें कारस्थान यशस्वी झाल्यामुळें त्यांना मनस्वी आनंद झाला होता. याच सुमारास बादशहानें खानखानन साहेबांनाही आपल्या सलगींत घ्यावयास प्रारंभ केला होता. आणि आदमखानालाही उच्च पदास चढवावें अशी इच्छा बादशहाची असल्याचें वर्तमान मुत्सद्दीमंडळांत फैलावलें होतें. शिवाय **इन्मतुद्दौळा** साहेबांनाही बढती मिळाली होती.

या सर्व धोरणामुळें विरोधीपक्ष बादशहास पुन्हा सानुकूल झाला, व त्यांनीं तापल्या तव्यावर पोळी घालण्याकारितां याच सुमारास धर्मसभा बोलावण्याचा घाट घातला. हा घाट शेख भावन जाणून होते. शेख भावन यांना फैझीचें साह्य होत होतें. धर्मसभेंत हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व स्थापन करण्यास झटणारे हे दोघेच वीर सरसावण्यास तयार झाले होते.

साऱ्या मुत्सद्यांस अशा रीतीनें झुलत ठेवलें तरी बादशहाच्या मनास आंतून निश्चिंतता नव्हती. मोंगलबादशहाच्या दरबारांत **शहाजी** बरोबर **शिवाजी** बालवयांत गेले असतां त्यांनीं बादशहास मुजरा केला नाहीं ही पुढील गोष्ट सर्वांस परिचित आहे. पण तशीच एक गोष्ट अकबराच्या कारकीर्दींत देखील घडलेली होती, ती मात्र पुष्कळांस माहीत नसेल. ती गोष्ट अकबर बादशहाच्या मनांत मूळ धरून बसली होती–नव्हे रुजून आली होती.

जोधपूरचा **मालदेव** स्वातंत्र्यप्रिय असूनही त्याला नाइलाजानें अकबरापुढें वचकून रहावें लागत असे. बादशहाच्या आज्ञेनें मालदेवानें आपला पुत्र **चंद्रसेन** यास मोंगल दरबारीं पाठवून दिलें. चंद्रसेन दरबारांत आला. पण तो अकबराच्या पुढें नम्र झाला नाहीं. दरबारांत खळबळ उडाली. चंद्रसेनाला नजर कैदेंत ठेवण्यांत आलें. मालदेवानें माफी मागून शरण यावें नाहींतर युद्धास तयार व्हावें असा निरोप अकबराकडून मालदेवास गेला.

त्याचबरोबर त्याला असेंहि कळविण्यांत आलें होतें कीं, निरोपाप्रमाणें तजवीज पंधरा दिवसाच्या आंत न झाल्यास चंद्रसेनास कारागृहांत टाकण्यांत येईल.

**मालदेव** या प्रकारानें घाबरून गेला. कारण त्याला या प्रकरणांत आणखी एक गुप्त बातमी समजली. ती अशी कीं, आपलें राज्य अकबरशहा बिकानेरच्या **रामसिंगाला** देऊं पहात आहे. हा रामसिंग अकबराचा मित्र होता. ताबडतोब मालदेवानें आपला दुसरा मुलगा उदेसिंग यास मोंगलदरबारीं आपल्यातर्फेनें रवाना केलें. मालदेव स्वतः आजारी असल्याचा बहाणा करून राहिला. **उदेसिंग** फार लाघवी होता. त्यानें आपल्या आंगच्या नम्रतेनें बादशहास खूष करून घेतलें. चंद्रसेनाची सुटका झाली. तो आपल्या बापाकडे गेला आणि उदेसिंग मोंगल दरबारींच राहिला. हा चंद्रसेन प्रतापास सहाय्य करीत आहे हें अकबरास ठाऊक असल्यामुळें त्याला थोडी काळजी वाटत होती. वरील सारा प्रकार सन १५६९ सालीं घडला होता. त्याला कांहीं फार वर्षे लोटलीं नव्हतीं. तथापि तो काळ मोठा चमत्कारिक होता. कारण बऱ्याचशा रजपूत राज्यांत म्हणजे राजघराण्यांत अशा प्रकारची दुफळी झाली होती. बाप मोंगलाच्या बाजूला तर मुलगा प्रतापाच्या बाजूला; एक भाऊ मोंगलांचा मदतगार तर दुसरा भाऊ प्रतापसिंहाचा पक्षपाती. अशी स्थिति असल्यामुळें अकबराच्या मनास फार काळजी लागून राहिलेली होती.

प्रस्तुतचा प्रसंग आनंदीआनंदाचा असूनही अकबराच्या मनाला निर्भेळ आनंद होत नव्हता. शिवाय सकाळीं घडलेल्या प्रकाराचा बादशहाला शहानिशा करून घ्यावयाचा होताच. रात्रौ सर्व स्थिरस्थावर झाल्यावर त्यानें गुप्तस्थळीं जाऊन **अबदुल्लाखानास** बोलाविलें.अबदुल्लाखान तयार होताच.पण तो भयभीत झालेला दिसत होता.

" सकाळचा हेर गारद झाला म्हणून ऐकतों तें खरें काय ? "

" जी हुजूर " **अबदुल्ला** कांपत म्हणाला.

" राज सुरजनच्या त्या हेरावर कोण टपला असेल असें तुला वाटतं ? "

" माझा तर्क कांहीं चालत नाहीं; पण—"

" हंऽहं—" त्यानें आपलें बोलणें पुढें चालवावें अशा परवानगीच्या अर्थानें तो हुंकार होता.

" पण **जवाहिरसिंग** व **रतनसिंग** हे दोघेहि कोठें दिसेनातसे झाले आहेत. त्यांना आपण स्वतः कोठें कांहीं कामगिरीवर पाठविलें असल्यास नकळे.

" नाहीं—मी त्या दोघांना कुठेंहि पाठविलेलें नाहीं. "

" तर मग त्यांतील एकानेंच सुरजनच्या हेरास ठार मारलें आहे. "

" कशावरून ? "

" दुपारीं तो हेर आपल्या भेटीस आला होता त्यावेळीं त्याच्या आंगावर एक लहानसा झालेला वार सरकारच्या नजरेंत आलाच असेल—"

" हूं ! "

" तो वार **रतनसिंगानेंच** केला होता असें मला मागाहून मयताकडून समजलें होतें.

# प्रकरण चौतिसावें.

## तिकडे जायची वेळ झाली !

हर्ष-शोक, सुख-दुःख वगैरे द्वंद्वांपासून मुक्त असणारी व्यक्ति परमहंस योगीकोटींतीलच असावयाची. तत्त्वज्ञानी **फैझी** ही ती व्यक्ति होय. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांत परमानंद होत असल्यामुळें व निराश झालेल्या बादशहास थोडें फार सुखी करून त्याच्या मनास समाधान यावें अशा उद्देशानें **फैझीनें** गीता वगैरे हिंदु धर्मग्रंथ फारशींत उतरण्याचें काम चालविलें होतें. त्याची योग्यता बादशहा जाणून होता.

काबुली पठाणांस बंधमुक्त करून बहुमानपूर्वक त्यांची रवानगी केल्यामुळें त्यांच्याही मनावर **अकबराच्या** थोर वागणुकीचा अनुकूल परिणाम झाला. पण इकडे शिरहिंदी व आदमखान हे दोघेही आपल्याच पाठी थोपटून घेऊं लागले होते. आपलें कारस्थान यशस्वी झाल्यामुळें त्यांना मनस्वी आनंद झाला होता. याच सुमारास बादशहानें खान-खानन साहेबांनाही आपल्या सलगींत घ्यावयास प्रारंभ केला होता. आणि आदमखानालाही उच्च पदास चढवावें अशी इच्छा बादशहाची असल्याचें वर्तमान मुत्सद्दीमंडळांत फैलावलें होतें. शिवाय **इन्मतुद्दौला** साहेबांनाही बढती मिळाली होती.

या सर्व धोरणामुळें विरोधीपक्ष बादशहास पुन्हा सानुकूल झाला, व त्यांनीं तापल्या तव्यावर पोळी घालण्याकरितां याच सुमारास धर्मसभा बोलावण्याचा घाट घातला. हा घाट शेख भावन जाणून होते. शेख भावन यांना फैझीचें साह्य होत होतें. धर्मसभेंत हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व स्थापन करण्यास झटणारे हे दोघेच वीर सरसावण्यास तयार झाले होते.

साऱ्या मुत्सद्यांस अशा रीतीनें झुलत ठेवलें तरी बादशहाच्या मनास आंतून निश्चिंतता नव्हती. मोंगलबादशहाच्या दरबारांत **शहाजी** बरोबर **शिवाजी** बालवयांत गेले असतां त्यांनीं बादशहास मुजरा केला नाहीं ही पुढील गोष्ट सर्वांस परिचित आहे. पण तशीच एक गोष्ट अकबराच्या कारकीर्दींत देखील घडलेली होती, ती मात्र पुष्कळांस माहीत नसेल. ती गोष्ट अकबर बादशहाच्या मनांत मूळ धरून बसली होती-नव्हे रुजून आली होती.

जोधपूरचा **मालदेव** स्वातंत्र्यप्रिय असूनही त्याला नाइलाजानें अकबरापुढें वचकून रहावें लागत असे. बादशहाच्या आज्ञेनें मालदेवानें आपला पुत्र **चंद्रसेन** यास मोंगल दरबारीं पाठवून दिलें. चंद्रसेन दरबारांत आला. पण तो अकबराच्या पुढें नम्र झाला नाहीं. दरबारांत खळबळ उडाली. चंद्रसेनाला नजर कैदेंत ठेवण्यांत आलें. मालदेवानें माफी मागून शरण यावें नाहींतर युद्धास तयार व्हावें असा निरोप अकबराकडून मालदेवास गेला.

त्याचबरोबर त्याला असेंहि कळविण्यांत आलें होतें कीं, निरोपाप्रमाणें तजवीज पंधरा दिवसाच्या आंत न झाल्यास चंद्रसेनास कारागृहांत टाकण्यांत येईल.

**मालदेव** या प्रकारानें घाबरून गेला. कारण त्याला या प्रकरणांत आणखी एक गुप्त बातमी समजली. ती अशी कीं, आपलें राज्य अकबरशहा बिकानेरच्या **रामसिंगाला** देऊं पहात आहे. हा रामसिंग अकबराचा मित्र होता. तावडतोब मालदेवानें आपला दुसरा मुलगा उदेसिंग यास मोगलदरबारीं आपल्यातर्फे रवाना केलें. मालदेव स्वत: आजारी असल्याचा बहाणा करून राहिला. **उदेसिंग** फार लाघवी होता. त्यानें आपल्या आंगच्या नम्रतेनें बादशहास खूष करून घेतलें. चंद्रसेनाची सुटका झाली. तो आपल्या बापाकडे गेला आणि उदेसिंग मोंगल दरबारींच राहिला. हा चंद्रसेन प्रतापास सहाय्य करीत आहे हें अकबरास ठाऊक असल्यामुळें त्याला थोडी काळजी वाटत होती. वरील सारा प्रकार सन १५६९ सालीं घडला होता. त्याला कांहीं फार वर्षे लोटलीं नव्हतीं. तथापि तो काळ मोठा चमत्कारिक होता. कारण बऱ्याचशा रजपूत राज्यांत म्हणजे राजघराण्यांत अशा प्रकारची दुफळी झाली होती. बाप मोंगलाच्या बाजूला तर मुलगा प्रतापाच्या बाजूला; एक भाऊ मोंगलांचा मदतगार तर दुसरा भाऊ प्रतापसिंहाचा पक्षपाती. अशी स्थिति असल्यामुळें अकबराच्या मनास फार काळजी लागून राहिलेली होती.

प्रस्तुतचा प्रसंग आनंदीआनंदाचा असूनही अकबराच्या मनाला निर्भेळ आनंद होत नव्हता. शिवाय सकाळीं घडलेल्या प्रकाराचा बादशहाला शहानिशा करून घ्यावयाचा होताच. रात्रौ सर्व स्थिरस्थावर झाल्यावर त्यानें गुप्तस्थळीं जाऊन **अबदुल्लाखानास** बोलाविलें.अबदुल्लाखान तयार होताच.पण तो भयभीत झालेला दिसत होता.

" सकाळचा हेर गारद झाला म्हणून ऐकतों तें खरें काय ? "

" जी हुजूर " **अबदुल्ला** कांपत म्हणाला.

" राज सुरजनच्या त्या हेरावर कोण टपला असेल असें तुला वाटतं ? "

" माझा तर्क कांहीं चालत नाहीं; पण—"

" हंऽहं—" त्यानें आपलें बोलणें पुढें चालवावें अशा परवानगीच्या अर्थानें तो हुंकार होता.

" पण **जवाहिरसिंग** व **रतनसिंग** हे दोघेहि कोठें दिसेनातसे झाले आहेत. त्यांना आपण स्वत: कोठें कांहीं कामगिरीवर पाठविलें असल्यास नकळे.

" नाहीं—मी त्या दोघांना कुठेंहि पाठविलेलें नाहीं. "

" तर मग त्यांतील एकानेंच सुरजनच्या हेरास ठार मारलें आहे. "

" कशावरून ? "

" दुपारीं तो हेर आपल्या भेटीस आला होता त्यावेळीं त्याच्या आंगावर एक लहानसा झालेला वार सरकारच्या नजरेंत आलाच असेल—"

" हूं ! "

" तो वार **रतनसिंगानेंच** केला होता असें मला मागाहून मयताकडून समजलें होतें.

" बरें! हसन कुठें आहे ? "

" हसन सध्यां येथेंच घुटमळत आहे. फैजी आणि फाजल या दोघांवरहि त्याचा दांत आहे. "

**हसनवर** चांगली नजर असूं द्या. "

" जी हुजुर. "

" आज मला ख्वाजाबागेंत जावयाचें आहे. "

" सर्व तयारी आहे. "

" पण त्या सूतिकागृहांतील बालकांची हकीगत काय आहे ? "

" तीं सर्व बालकें मुकीं निपजलीं आहेत हे हुजूरच्या नजरेस यापूर्वींच आलें आहे. "

——" तुम्ही स्वतः खात्री करून घेतली होती काय? "

" होय–सरकार ! "

" **सेलीमचा** विद्याभ्यास कसा काय चालला आहे ? "

" तें मी काय सांगायचं सरकार ? "

" पण पाठशाळेंत तो चांगल्या प्रकारें जातो काय ? "

" कारभारीसाहेबांची मुलगी गेली तर जातात. "

" तोडरमल्लची वृत्ति कशी काय दिसते ? "

" कोणाचाहि रक्ताकडे ओढा असायचाच. "

बादशहा यानंतर बराच वेळ स्वतःशींच विचार करीत राहिला. त्याची मुद्रा अत्यंत चिंताक्रांत दिसत होती. चेहऱ्यावर खिन्नता पसरली होती. आपल्या समोर **अबदुल्लाखान** हा विश्वासांतला हेर उभा आहे याचें देखील भान त्यास नव्हतें असें वाटलें. कारण विचारांच्या तंद्रींत " हं ! असा प्रकार हा घडून आला म्हणावयाचा ! " असें उद्गार त्यानें मोठ्यानें स्वतःलाच उद्देशून काढले. अबदुल्लाखानानें बादशहाची विमनस्कता ओळखली व तो जरासा खांकरला. बादशहा भानावर आला.

" शेख भावन हल्लीं कोणत्या उद्योगांत असतात ? "

" मुसलमान झालेल्या आद्य–हिंदूंस हिंदुधर्माच्या श्रेष्ठतेबद्दल सांगत असतात. "

" अस्सें ? "

" तयारी आहे निघण्याची" अबदुल्लाखानानें पुन्हा बादशहास स्मरण करून दिलें.

" हो आता तिकडे जायची वेळ होत आली. " बादशहानें उत्तर केलें.

दोघेहि बाहेर पडले. दोन घोडे बाहेर फुरफुरत होतेच.

कांहीं अंतर गेल्यावर वाटेवर उभ्या असलेल्या मोतद्दारापाशीं घोडे देण्यांत आले व ते दोघेहि काळोखांतूनच पायीं चालूं लागले.

---

# प्रकरण पस्तिसावें.

## उपसंहार.

बादशहा विचारमग्न होऊन आपल्या एकांताच्या ठिकाणीं बसला होता. रात्रीं रव्वाजा बागेंतल्या फकीरानें सांगितलेल्या भविष्यकथनाचा त्याच्या मनावर फार परिणाम झालेला होता. तो फाजलची वाट पाहत असतां फाजलनें येऊन कुर्निसात केला. बादशहाच्या तें लक्षांत आलें, पण तो बोलत नव्हता.

" फाजल " बऱ्याच वेळानें बादशहानें म्हटलें, " माझे सारे प्रयत्न निष्फळच झाले ना ? "

" कोणत्या बाबतींत हुजूर ? "

" ऋग्वेद मिळविण्यांत "

" ऋग्वेद नाहीं मिळाला, तरी गीता मिळाली ना ? महाभारत मिळालें ना ? हे दोन्ही ग्रंथ म्हणजे साररूपी वेदच होत. "

" **सेलीमच्या** बाबतींत मी खबरदारी किती घेतली तरी पुढें काय घडणार समजत नाहीं. "

" आपण असें कां म्हणतां आज ? "

" कारभारीसाहेबांच्या मुलीचा आणि सेलीमचा लागाबांधाच आहे, असें मला समजलें आहे. "

" मग भवितव्य कसें खोटें होणार ? "

" कसें होणार ? " त्वेषानें बादशहानें म्हटलें ! " पाहूं तर खरें, भवितव्याला कलाटणी देतां येते कीं नाहीं तें ! सदिच्छेनें प्रेरित होऊन सन्मार्गानें केलेले प्रयत्न यशस्वी होवोत अगर न होवोत, पण तसे प्रयत्न करणारा देवाच्या घरीं अन्यायी मात्र ठरणार नाहीं ! " फाजलचें मत ऐकण्याकरितां बादशहानें त्याच्याकडे आतुरतेनें पाहिलें.

" मुळींच अन्यायी ठरणार नाहीं ! " फाजलनें ठांसून म्हटलें. " तर मी तसा प्रयत्न करण्याचा निश्चयच केला आहे. " बादशहानें निश्चयपूर्वक स्वरांत म्हटलें, पण लगेच त्याच्या चेहऱ्यावर विषण्णतेची छटा पसरली.

" फाजल ! आद्यभाषा कोणती असावी हें उमगून घेण्याचाही माझा प्रयत्न व्यर्थ गेला ! "

" शहान्शाह ! तत्वशोधनाचे सारेच प्रयत्न सफळ होतात का ? " धीर देण्याच्या उद्देशानें फाझलनें म्हटलें.

" शिवाय माझ्याच दरबारच्या कांहीं कडव्या मुत्सद्यांच्या मी द्वेषास पात्र होऊन बसलों आहे ना ? "

" पण असे लोक शेंकडा पांच तरी भरतील कीं नाहीं कुणास ठाऊक ? आपणांला धन्यवाद देणारेच फार आहेत. "

" माझ्या भिन्नधर्मीय प्रजेला सुखी करण्याचे प्रयत्न मी शक्त्यनुसार करीत असतों "

" त्या योगानेंच आपली सुकीर्ती अजरामर होईल. "

" आणि माझें वेद साधन ? " असे केविलवाणे उद्गार काढून बादशहानें खालीं मान घातली ! बिचारा फाजल तरी काय बोलणार ?

समाप्त.